# अनुक्रमणिका.

श्रीपांडुरंग प्रसन्न.

# अपूर्व लाभ, प्रत्यक्ष दर्शन.

| नांव. | किंमत. |
|---|---|
| श्रीएकनाथाची गाथा. | ४ |
| श्रीनामदेवाची गाथा. | ३ |
| श्रीतुकारामाची गाथा सचित्र मोठी. | २॥ |
| श्रीतुकारामाची गाथा पाकेटसाइज लहान रंगीत चित्राची | १ |
| निळोबाची गाथा. | १॥ |
| ज्ञानदेवाची ,, मोठी. | २ |
| सर्वसंग्रह ,, | १ |

वरील गाथ्यांपैकीं कोणतीही गाथा मागविणारांस श्रीविठोबाचा फोटो बक्षिस देऊं. सर्व पुस्तकें माफक दरानें विकत मिळतील.

पत्ता:—बाळकृष्ण नारायण इंगळे बुक-सेलर उद्धवघाट पंढरपूर.

# विक्रीस तयार.

| पुस्तकाचें नांव. | किंमत. |
| --- | --- |
| सार्थ ज्ञानेश्वरी | २ |
| सार्थ दासबोध. | २ |
| सार्थ गीता. | ८१० |
| सार्थ ग्रहलाघव. | १ |
| सार्थ मुहूर्तमार्तंड. | १ |
| सार्थ मुहूर्तचिंतामणी. | १ |
| तुकारामाची गाथा टाईप मोठा. | ३॥ |
| एकनाथी भागवत. | ३॥ |
| रंगनाथी योगवासिष्ठ. | ३॥ |
| सटीक ज्ञानेश्वरी | १॥ |
| सटीक दासबोध | १॥। |

विष्णु नारायण गोडबोले बुकसेलर,
उद्धवघाट पंढरपूर,



छत्रपति शिवाजी महाराज

# तुकारामाच्या अभंगांची गाथा.
## भाग पहिला.



### मंगलाचरण.

१ सुंदर तें ध्यान उभें विटेवरी । कर[1] कटावरी ठेवूनियां ॥१॥ तुळशीहार गळां कासे पीतांबर । आवडे निरंतर हेंचि ध्यान ॥ २ ॥ मकरकुंडलें तळपती[2] श्रवणीं । कंठीं कौस्तुभ-

१ हात. २ प्रकाशतात.

मणि विराजत[1] ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझें हेंचि सर्व सुख । पाहीन श्रीमुख आवडीनें ॥ ४ ॥

२ समचरणदृष्टि विटेवरी साजिरी । तेथें माझी हरि वृत्ति राहो ॥ १ ॥ आणीक नलगे मायिक पदार्थ । तेथें माझें आर्त[2] नको देवा ॥ २ ॥ ब्रह्मादिक पदें दुःखाची शिराणी[3] । तेथें चित्त ह्मणी जडों देसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्याचें कळलें आह्मां वर्म । जे जे कर्मधर्म नाशवंत ॥ ४ ॥

३ राजस सुकुमार मदनाचा पुतळा । रविशशिकळा लोपलिया ॥ १ ॥ कस्तूरी मळवट चंदनाची उटी । रुळे माळ कंठीं वैजयंती ॥ २ ॥ मुगुट कुंडलें श्रीमुख शोभलें । सुखाचें ओतलें सकळही ॥ ३ ॥ कासे सोनसळा पांघरे पाटोळा । घननीळ सांवळा बाइयांनो ॥ ४ ॥ सकळही तुह्मी व्हागे एकीसवा । तुका ह्मणे जीवा धीर नाहीं ॥ ५ ॥

४ सदा माझे डोळा जडो तुझी मूर्ती । रखु-

---

१ शोभत. २ इच्छा. ३ उपभोग.

माईच्या पती सोयरिया ॥ १ ॥ गोड तुझें रूप गोड तुझें नाम । देई मज प्रेम सर्व काळ ॥२॥ विठो माउलिये हाचि वर देई । संचरोनि राही हृदयामाजीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे कांहीं न मागें आणीक । तुझे पायीं सुख सर्व आहे ॥४॥

५ धणी[3] न पुरे गुण गातां । रूप दृष्टीं न्याहाळितां ॥ १ ॥ बरवा बरवा पांडुरंग । कांति सांवळी सुरंग ॥ २ ॥ सर्व मंगळांचें सार । मुख सिद्धीचें भांडार ॥३॥ तुका ह्मणे सुखा । अंतपार नाहीं लेखा ॥ ४ ॥

६ आवडे हें रूप गोजिरें सगुण । पाहतां लोचन सुखावले ॥ १ ॥ आतां दृष्टीपुढें ऐसाचि तूं राहें । जो मी तुज पाहें पांडुरंग ॥२॥ लांचावलें मन लागलीसे गोडी । तें जीवें न सोडी ऐसें झालें ॥ ३ ॥ तुका ह्मणे आम्हीं मागावें लडिवाळीं । पुरवावी आळी मायबापा ॥ ४ ॥

७ गरुडावरि बैसोनि येतो जगजेठी । त्या-

१ प्रिय, आवडता. २ तृप्ति. ३ लाडका. ४ छंद.

चे चरणीं मिठी घालूं चला ॥ १ ॥ सांवळें रूपडें देखिलें लोचनीं । शंख चक्र दोन्ही शोभतावी ॥२॥ पीतांबर झळके हेचि त्याची खूण । वाकी रुणझुण वाजताती ॥ ३ ॥ गरुड चपेटीं येत असे नेटें । कस्तूरी मळवट शोभताहे ॥ ४ ॥ पदक एकावळी शोभताहे कंठीं । तुका ह्मणे मिठी घालूं चला ॥ ५ ॥

८ स्वामी तूंही कैसा न पडसी डोळा । सुंदर सांवळा घवघवीत ॥ १ ॥ चतुर्भुज माळा रुळे एकावळी । कस्तूरी निढळीं रेखिलीसे २ शंख चक्रगदा रुळे वैजयंती । कुंडलें तळपती श्रवणीं दोन्ही ॥ ३ ॥ तुका ह्मणे स्वामी आतां दावी पाय । पांडुरंगे माये कृपावंते॥४॥

९ राहो आतां हेंचि ध्यान । डोळां मन लंपटो ॥ १ ॥ कोंडुकोंडूनि धरीन जीवें । देहभावें पूजीन ॥ २ ॥ होईल येणें कळसा आलें । स्थिरावलें अंतरीं ॥ ३ ॥ तुका म्हणे गोजरिया । विठोबा पायां पडों द्या ॥ ४ ॥

---

१ त्वरेनें. २ कपाळीं. ३ कानांत.

# त्रोटक प्रकरणें.

—:०:—

## मत्स्यावतार.

१ ब्रह्मयाचे वेद शंखासुरें नेले । त्यासाठीं धरिलें मत्स्यरूप ॥ १ ॥ तेणें आत्मा नव्हता नेला ब्रह्मांडासी । काय ब्रह्मयासी नव्हतें ज्ञान २ परि तेणें धांवा केला आवडीनें । जाले नारायण कृपासिंधु ॥३॥ तुका ह्मणे विठोबा मी नामधारक । पोसणें सेवक भेटी देई ॥ ४ ॥

## कूर्मावतार.

२ देवीं आणि दैत्यीं सिंधु घुसळिला । भार पृथ्वीस जाला साहावेना ॥ १ ॥ जालासी कासव धरिली पाठीवरी । चिंता तुज हरी सकळांची ॥ २ ॥ तयेकाळीं देव करिताती स्तुति । कृपाळु श्रीपति ह्मणोनिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसे उदंड पवाडे । ज्यासी सहस्र तोंडें शिणला तोही ॥ ४ ॥

---

१ प्राण. २ ब्रह्मरंध्रीं.

राम-कृष्ण हरि ऐसी मारी हांक । तेणें पडे धाक बळियासी ॥३॥ असो द्या सामर्थ्यें ऐसि- या कीर्तीचीं । आवडी तुक्याची भेटी देई ॥४॥

६ वाटीभर विष दिलें प्रल्हादासी । निर्भ- य मानसीं तुझ्या बळें ॥ १ ॥ भोक्ता नारायण केलें तें प्राशन । प्रतापें जीवन[1] जालें तुझ्या २ नामाच्या चिंतनें विषाचें तें अमृत । जाहालें देखत नारायणा ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसे तुझे बडिवार । शिणला फणीवरें[2] वर्णवेना ॥ ४ ॥

७ अग्निकुंडामाजीं घातला प्रल्हाद । तरी तो गोविंद विसरेना ॥ १ ॥ पितियासी ह्मणे व्यापक श्रीहरि । नांदतो मुरारी[3] सर्वा ठायीं२ अग्निरूप माझा सखा नारायण । प्रल्हाद ग- र्जून हांक मारी ॥ ३ ॥ तुका ह्मणे अग्नि जाहा- ला शीतळ । प्रताप सबळ विठो तुझा ॥ ४ ॥

८ कोपोनियां पिता बोले प्रल्हादासी । सां- ग हृषीकेशी कोठें आहे ॥ १ ॥ येरु ह्मणे का- ष्ठीं पाषाणीं सकळीं । आहे वनमाळी जेथें

---

१ उदक. २ शेष. ३ महाविष्णु.

## वराहावतार.

३ हिरण्याक्ष दैत्य मातला जे काळीं। व-
रदानें बळी शंकराच्या ॥ १ ॥ इंद्रपदराज्य
घेतलें हिरोनी[1]। देवा चक्रपाणी ह्मणती धांव
॥ २ ॥ तई पांडुरंगा सूकर[2] जालेती । तया
दैत्यपती मारियेलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे ज्यांचीं
राज्यें त्यांसी दिलीं। ऐशी तूं माउली पांडु-
रंगा ॥ ४ ॥

## नृसिंहावतार.

४ प्रल्हादाकारणें नरसिंह जालासी। त्या-
चिया बोलासी सत्य केलें ॥ १ ॥ राम कृष्ण
गोविंद नारायण हरि। गर्जे राजद्वारीं भक्त-
राज ॥ २ ॥ विठ्ठल माधव मुकुंद केशव। ते-
णें दैत्यराव दचकला ॥ ३ ॥ तुका ह्मणे त-
याकारणें सगुण। भक्ताचें वचन सत्य केलें ४

५ नामाचें सामर्थ्य कां रे दवडिसी। कां रे
विसरसी पवाडे हे ॥ १ ॥ खणखणां हाणिती
खर्गें प्रल्हादासी। न रुपे अंगासी किंचितही

---

१ हरण करूनि. २ डुकर.

राम-कृष्ण हरि ऐसी मारी हांक। तेणें पडे धाक बळियासी॥३॥ असों द्या सामर्थ्यें ऐसि-या कीर्तीचीं। आवडी तुक्याची भेटी देई॥४॥

६ वाटीभर विष दिलें प्रल्हादासी। निर्भ-य मानसीं तुझ्या बळें ॥ १ ॥ भोक्ता नारायण केलें तें प्राशन। प्रतापें जीवन[1] जालें तुझ्या २ नामाच्या चिंतनें विषाचें तें अमृत। जाहालें देखत नारायणा ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसे तुझे बडिवार। शिणला फणीवरें[2] वर्णवेना ॥ ४ ॥

७ अग्निकुंडामाजीं घातला प्रल्हाद। तरी तो गोविंद विसरेना ॥ १ ॥ पितियासी ह्मणे व्यापक श्रीहरि। नांदतो मुरारी[3] सर्वा ठायीं२ अग्निरूप माझा सखा नारायण। प्रल्हाद ग-र्जून हांक मारी ॥ ३ ॥ तुका ह्मणे अग्नि जाहा-ला शीतळ। प्रताप सबळ विठो तुझा ॥ ४ ॥

८ कोपोनियां पिता बोले प्रल्हादासी। सां-ग हृषीकेशी कोठें आहे ॥ १ ॥ येरु ह्मणे का-ष्ठीं पाषाणीं सकळीं। आहे वनमाळी जेथें

1 उदक. 2 शेष. 3 महाविष्णु.

तेथें ॥ २ ॥ खांबावरी लाथ मारिली दुर्जनें । खांबीं नारायण ह्मणतांचि ॥ ३ ॥ तुका कैसा खांब कडाडिला । ब्रह्मा दचकला सत्यलोकीं४

९ डळमळिला मेरु आणि तो मांदार[1]। पाताळीं फणिवर[2] डोई झाडी ॥ १ ॥ लोपे तेजें सूर्य आणीक हा चंद्र । कांपतसे इंद्र थरथरा ॥ २ ॥ ऐसें रूप उग्र हरीनें धरिलें । दैत्या मारियेलें मांडीवरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे भक्तांकारणें श्रीहरि । बहु दुराचारी निर्दाळिले४

## वामनावतार.

१० बहुत कृपाळु दीनाचा दयाळू । जगीं भक्तवत्सलू नाम तुझें ॥ १ ॥ मानियेला चित्तीं बळीचा उपकार । अझूनि त्याचें द्वार राखशील ॥ २ ॥ काय त्याच्या भेणें बैसलासी द्वारीं । आहे तुज हरी कृपा बहु ॥ ३ ॥ तुका ह्मणे भक्तजनाची ममता । तुह्मांसी अनंता अलोलिक ॥ ४ ॥

---

१ मंदराचळ. २ शेष.

# दैत्यांच्या त्रासापासून दुर्वासऋषींची मुक्तता.

—— :※: ——

११ पांडुरंगा तुझे काय वाणूं गुण । पवाडे हे धन्य जगीं तुझे ॥ १ ॥ दंडिलें दुर्वासा सुरा असुरानें । तो आला गाऱ्हाणें सांगावया ॥ २ ॥ बळीचिये द्वारीं तुह्मी बैसलेति । दुर्वास विनंती करी भावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे कृपासागरा श्रीहरी । तुह्मी भक्तांवरी प्रेमछाया ॥ ४ ॥

१२ दुर्वासया स्वामी गुंतलों भाकेसी[1] । पुसा जा बळीसी निरोप द्यावा ॥ १ ॥ त्याचे आज्ञेविण आह्मां येतां नये । द्वारपाळ राहें होऊनियां ॥ २ ॥ पुसे दुर्वासया बळीसी जाऊनी । येरु ह्मणे ह्मणीं[2] बोलों नका ॥ ३ ॥ तुका ह्मणे केला अन्यत्राचा[3] त्याग । तेव्हां पांडुरंग सखा जाला ॥ ४ ॥

---

१ आणभाक, शब्द. २ अगदीं. ३ इतर विषयांचा.

१३ बळी ह्मणे आजी दुर्वासया स्वामी। मार्गों नका तुह्मी नारायणा ॥ १ ॥ बहुतां प्रयासीं जोडला श्रीहरी। बैसविला द्वारीं राखावया ॥ २ ॥ परतला दुर्वास मग हो तेथूनी। चिंतातुर मनीं उद्वेगला[1] ॥ ३ ॥ काय तूं एकाचा आहेसी अंकित। होई कृपावंत तुका ह्मणे ॥ ४ ॥

१४ त्रैलोकींचा नाथ सकळांचा आधार। बळीचें तुवां घर धरियेलें ॥ १ ॥ आह्मां मोकलिलें[2] कोणां निरोविलें[3]। कोणा हातीं दिले तिन्ही लोक ॥ २ ॥ अनाथांचा बंधु दासांचा कैवारी। ब्रिदें तुझीं हरी जाती वाया ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसें बोलिला दुर्वास। वाटला संतोष पांडुरंगा ॥ ४ ॥

१५ बोलिले ते देवऋषी दुर्वासया। जाय पुसावया मागुत्यानें ॥ १ ॥ मागुता दुर्वास पुसे बळिराया। निरोप जावया देई देवा २ बळी ह्मणे त्यासी जाय मी न ह्मणें। जाईल

१ खिन्न झाला. २ सोडलें. ३ स्वाधीन केलें.

नारायण लागलाची ॥ ३ ॥ मजपाशीं राहे कोठें तरी जाय । तुका ह्मणे पाय न सोडीं मी

१६ दुर्वासें निरोप आणिला ये रीती । मग वाढलेती नारायणा ॥ १ ॥ ठेविले चरण बळीचिये द्वारीं । शिर अंगावरी लांबविलें २ पाडियेलें द्वार द्वारावतियेसी । वरी हृषीकेशी निघालेती ॥ ३ ॥ तेथूनियां नाम पडिलें द्वारका । वैकुंठनायका तुका ह्मणे ॥ ४ ॥

१७ मुरें कुश दोन्ही मारिले असुर । दुर्वास ऋषीश्वर सुखी केला ॥ १ ॥ मारियेला मुर ह्मणोनी मुरारी । नाम तुझें हरी पडियेलें पूर्वींहुनी ऐसा भक्तप्रतिपाळ । केला त्वां सांभाळ नारायणा ॥ ३ ॥ तुका ह्मणे येत्रि वेळे काय जालें । कां सोंग धरिलें मोहनाचें ४

## पिंगळा गणिका.

१८ व्यभिचारिणी ती गणिका कुंटणी । विश्वासचि मनीं राघोबाचा ॥ १ ॥ ऐसी ही पापिणी वाहिली विमानीं । अचळ भुवनीं ठे-

---

१ महाविष्णु. २ एक दैत्य. ३ भक्तांचें रक्षण.

वियेली ॥ २ ॥ पतितपावन तिही लोकीं ठसा । कृपाळु कोंवसा[1] अनाथांचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे विठोबाची धरा सोय । आणिक उपाय नेणों किती ॥ ४ ॥

गजेंद्रमोक्ष.

१९ गजेंद्र तो हस्ती सहस्र वरुषें । नक्रें पीडिलासे जळामाजीं ॥ १ ॥ सुहृदीं[2] सांडिलें कोणी नाहीं साहे । अंतीं वाट पाहे विठो तुझी ॥ २ ॥ कृपेच्या सागरा माझ्या नारायणा । तया दोघांजणां तारियेलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे नेलें वाहूनि विमानीं । मीही आइकोनी विश्वासलों ॥ ४ ॥

---

## दामाजीपंताचें चरित्र.

२० दामाजीपंताची रसद गुदरली । लज्जा सांभाळिली देवरायें ॥१॥ तयाचें चरित्र

१ आश्रय. २ सगेसोयरे.

परिसा हो सादरें । करितों नमस्कार संत-
जनां ॥ २ ॥ मंगळवेढा असे वस्ति कुटुंबेंसी ।
व्यापारी सर्वांसी मान्य सदा ॥३॥ कर्म काय
करी ठाणाचा हवाला । तों कांहीं पडला क-
ठिण काळ ॥ ४ ॥ धान्यांचीं भांडारें होतीं
तीं फोडिलीं । पंढरी रक्षिली दुष्काळांत ॥५॥
दुबळीं अनाथ तींही वांचविलीं । राष्ट्रांत ते
जाली कीर्ति मोठी ॥ ६ ॥ मुजुम करीत हो-
ता कानडा ब्राह्मण । फिर्याद लिहून पाठवि-
ली ॥ ७ ॥ अविंदाचें राज्य बेदरीं असतां ।
कागद पाहतां तलब केली ॥ ८ ॥ दामाजी
पंतासी धरोनि चालविलें । इकडे या विठ्ठलें
माव केली ॥ ९ ॥ विकते धारणें सवाईचें
मोल । धान्याचें सकळ द्रव्य केलें ॥ १० ॥
दामाजीपंताच्या नांवें अर्जदास्त । लिहून स्व-
लेती मुद्रा केली ॥ ११ ॥ विठो पांडेवार भ-
क्तां साह्य जाला । बेदरासी गेला रायापाशीं
॥१२॥ जोहार मायबाप पुसती कोठील । तंव

१ म्लेंच्छ राजा. २ अंत्यज.

तो ह्मणे स्थळ मंगळवेढें ॥१३॥ दामाजीपंता-
नीं रसद पाठविली । खलेती ओतिली अर्ज-
दास्त ॥ १४ ॥ देखोनियां राजा संतोष पा-
वला । ह्मणे व्यर्थ त्याला तलब[1] केली ॥१५॥
काय तुझें नांव पुसती यंत्रधारी । तो ह्मणे
बेगारी विठा कीं जी ॥१६॥ पावल्याचा जाब
द्यावा मायबाप । करोनि घेतों माप ह्मणती
ते ॥ १७ ॥ पावल्याचा जाब दिधला लिहून ।
तसॆरीफ[2] देऊन पाठविला ॥ १८ ॥ छत्री घो-
डा शिबिका आभरणांसहित । दिला सर्व
दूत पाठवूनी ॥ १९ ॥ वाटे चुकामूक जाली
याची त्यांची । ते आले तैसेची मंगळवेढा
॥ २० ॥ दामाजीपंतासी बेदरासी नेलें । रा-
जा ह्मणे जालें कवतुक ॥ २१ ॥ काल गेला
विठा बेगारी देऊन । तसरीफ देऊन जाब दि-
ला ॥ २२ ॥ काय तुमचें काज सांगा जी स-
त्वर । बोला जी निर्धार वचनाचा ॥२३॥ कैंचा
विठा कोण पाठविला कधीं ॥ काढोनियां आ-

१ त्रास दिला. २ पावती.

धीं जाब दिला ॥ २४ ॥ पाहातांचि जाब हृद-
य फुटलें । नयन निडारले राजा देखे ॥२५॥
सांवळें सुकुमार रूप मनोहर । माथां तेणें
भार वाहियेला ॥ २६ ॥ दामाजीपंतासी रायें
सन्मानिलें । तो ह्मणे आपुलें कर्म नव्हे ॥२७॥
आतां तुमची सेवा पुरे जी स्वामिया । शिण-
विलें सखया विठोबासी ॥ २८ ॥ निरोप घे-
ऊनी आला स्वस्थळासी । उदास सर्वांसी
होता जाला ॥ २९ ॥ दामाजीपंतांनीं सेवि-
ली पंढरी । ऐसा त्याचा हरि निकटवृत्ति[1] ॥
॥ ३० ॥ तुका ह्मणे विठो अनाथ कैवारी ।
नुपेक्षी[2] हा हरि दासालागीं ॥ ३१ ॥

---

## पंढरीमाहात्म्य.

१ नको आतां पुसों कांहीं । लवलाहीं उ-
संती ॥ १ ॥ जाय वेगीं पंढरपुरा । तो सोय-
रा दीनांचा ॥२॥ वचनाचा न करी गोवा ।

---

१ सदा संनिध राहणारा. २ त्याग करीत नाहीं.

रिघे देवा शरण ॥ ३ ॥ तुका ह्मणे कृपावंता । बहु चिंता दीनाची ॥ ४ ॥

२ करा करा लागपाठ[1] । धरा पंढरीची वाट । जंव नाहीं चपेटे[2] । घात पडिला काळाचा ॥ १ ॥ दुजा ऐसा नाहीं कोणी । जो या काढी भयांतूनि । करा ह्मणऊनि । हा विचार ठार्यींचा ॥ २ ॥ होती गात्रें बेंबळीं । दिवस अस्तमान काळीं । हातपायटाळीं । जों मोकळीं आहेती ॥ ३ ॥ कां रे घेतला- सी सोसें । तुज वाटताहे कैसें । तुका ह्मणे ऐसें । पुढें कैं[3] लाहासी ॥ ४ ॥

३ जाय जाय तूं पंढरी । होय होय वारकरी ॥ १ ॥ सांडोनियां वाळवंट । काय इच्छिसी वैकुंठ ॥ २ ॥ खांदां पताकाचे भार । तुळशीमाळा आणि अबीर ॥ ३ ॥ साधुसंतांच्या दाटणी । तुका जाय लोटांगणीं ॥४॥

४ जा रे तुम्ही पंढरपुरा । ते सोयरा दीनांचा ॥ १ ॥ गुण दोष नाणी मना । करी

---

१ त्वरा. २ चापटी. ३ केव्हां.

आपणांसारिखें ॥ २ ॥ उभारोनि उभा कर। भवपार उतराया ॥ ३ ॥ तुका ह्मणे सांतड मोठी। जाली भेटी उद्दंड ॥ ४ ॥

५ पंढरीसी जा रे आलेनो संसारा। दीनाचा सोयरा पांडुरंग ॥ १ ॥ वाट पाहे उभा भेटीची आवडी। कृपाळू तातडी उतावीळ ॥ २ ॥ मागील परिहार पुढें नाहे शीण। जालिया दर्शन एकवेळा ॥ ३ ॥ तुका ह्मणे नेदी आणिकांचे हातीं। बैसला तो चित्तीं निवडेना ॥ ४ ॥

६ पंढरपुरींचें दैवत भजावें। काया वाचा जावें शरण त्या ॥ १ ॥ मनीं ध्यान करी अहंता धरूनी। तया चक्रपाणी दूर ठेला ॥ २ ॥ मान अभिमान सांडूनियां द्यावे। अवघ्यां नीचें व्हावें तरी प्राप्ति ॥ ३ ॥ तुका ह्मणे हेंचि कोणासी सांगावें। सादर होऊनि भावें भजे देवा ॥ ४ ॥

७ बहुतां जन्मां अंतीं जन्मलासी नरा।

१ प्रिय. २ हलकेपण, लीनता.

देव तूं सोइरा करी आतां ॥ १ ॥ करी आतां बापा स्वहिताचा स्वार्थ । अनर्थाचा अर्थ सांडी आतां ॥ २ ॥ सांडी आतां कुडी[1] कल्पनेची वाट । मार्ग आहे नीट पंढरीचा ॥ ३ ॥ पंढरीस जावें सर्व सुख घ्यावें । रूप तें पाहावें विटेवरी ॥ ४ ॥ विटेवरी उभा आनंदाचा कंद । तुका नाचे छंदें नामघोषें ॥५॥

८ पंढरीस जाऊं ह्मणती । यम थोर चिंता करि ती ॥ १ ॥ या रे नाचों ब्रह्मानंदें । विठ्ठलनामाचिया छंदें ॥ २ ॥ धरिली पंढरीची वाट । पापें रिगालीं कपाट ॥ ३ ॥ केलें भीवरेचें स्नान । यमपुरीं पडिलें खोन[2] ॥ ४ ॥ दुरोनि देखिली पंढरी । पापें गेलीं दुरच्यादुरी ॥ ५ ॥ दुरोनि देखिलें राउळ । हरुषें नाचती गोपाळ ॥ ६ ॥ तुका ह्मणे नाहीं जाणें । अखंड पंढरिये राहाणें ॥ ७ ॥

९. नव्हे आरोणूक[3] परि मनीं वाहे । होईल त्या साहे पांडुरंग ॥ १ ॥ पंढरीसी जावें उ-

---

१ वाईट. २ खणून चोरी करणारा. ३ विश्रांती.

द्वेगें मानसीं । धरिल्या पावसी संदेह नाहीं ॥ २ ॥ नसो बळ देह असो पराधीन । परि हें चिंतन टाकों नको ॥ ३ ॥ तुका ह्मणे देह पडो या चिंतनें । पुढें लागे येणें याजसाठीं ॥४॥

१० जाती पंढरीस । ह्मणे जाईन तयांस ॥ ॥ १ ॥ तया आहे संसार । ऐसें बोले तो माहार ॥ २ ॥ असो नसो भाव । जो हा देखे पंढरीराव ॥ ३ ॥ चंद्रभागे न्हाती । तुका ह्मणे भलते याती ॥ ४ ॥

११ चला पंढरीसी जाऊं । रखुमादेवीवरा पाहूं ॥ १ ॥ डोळे निवतील कान । मना तेथें समाधान ॥ २ ॥ संतां महंतां होतील भेटी । आनंदें नाचों वाळवंटीं ॥ ३ ॥ तें तीर्थांचें माहेर । सर्व सुखांचें भांडार ॥ ४ ॥ जन्म नाहीं रे आणीक । तुका ह्मणे माझी भाक ॥ ५ ॥

१२ आमुची मिरास पंढरी । आमुचें घर भीमातीरीं ॥ १ ॥ पांडुरंग आमुचा पिता ।

---

१ चिंता. २ वृत्ति, हव्यास.

रखुमाबाई आमुची माता ॥२॥ भाऊ पुंडलीक मुनि । चंद्रभागा आमुची बहिणी ॥ ३ ॥ तुका जुनाट मिरांशी[1]। ठाव दिला पायापाशीं ४

१३ पंढरीची वारी आहे माझे घरीं । आणीक न करीं तीर्थव्रत ॥ १ ॥ व्रत एकादशी करीन उपवासी । गाईन अहर्निशीं मुखीं नाम ॥ २ ॥ नाम विठोबाचें घेइन मी वाचें । बीज कल्पांतींचें तुका ह्मणे ॥ ३ ॥

१४ पावलों पंढरी वैकुंठभुवन । धन्य आजि दिन सोनियाचा ॥ १ ॥ पावलों पंढरी आनंदगजरें ॥ वाजतील तुरे शंख भेरी[2] ॥२॥ पावलों पंढरी क्षेमआलिंगनीं । संत या सज्जनीं निववीलों ॥ ३ ॥ पावलों पंढरी पार नाहीं सुखा । भेटला हा सखा मायबाप ॥ ४ ॥ पावलों पंढरी येरझार खुंटली । माउली बोळली प्रेमपान्हा ॥ ५ ॥ पावलों पंढरी आपुलें माहेर । नाहीं संसार तुका ह्मणे ॥ ६ ॥

---

१ इनामदार. २ दुंदुभि.

१५ धन्य जालों हो संसारीं । आह्मीं देखिली पंढरी ॥ १ ॥ चंद्रभागे करूं स्नान । पुंडलिकाचें दर्शन ॥ २ ॥ करूं क्षेत्रप्रदक्षिणा । भेटूं संत या सज्जनां ॥ ३ ॥ उभे राहूं गरुडपारीं । डोळे भरुनी पाहों हरी ॥ ४ ॥ तुका ह्मणे वाळवंटीं । महालाभ फुकासाठीं ॥ ५ ॥

१६ आम्ही ज्याचे दास । त्याचा पंढरीये वास ॥ १ ॥ तो हा देवांचाही देव । काय कळिकाळाचा भेव[1] ॥ २ ॥ वेद जया गाती । श्रुति ह्मणती नेति नेति ॥ ३ ॥ तुका ह्मणे निज । रूपडें हें तत्त्वबीज ॥ ४ ॥

१७ आह्मांसी सुखाचा । जवळी हाट[2] पंढरीचा । सादाविती वाचा । रामनामें वैष्णव ॥ १ ॥ घ्या रे आपुलाल्या परी । नका ठेवूं कांहीं उरी । ओसरतां भरी । तोंडवरी अंबर ॥ २ ॥ वाहे बंदर द्वारका । खेप आली पुंडलिका । उभेंचि विकिलें एका । सनकादिकां सांपडलें ॥ ३ ॥ धन्य धन्य हे भूमंडळीं । प्रगटली ना-

१ भीति. २ बाजार.

मावळी । घेती जीं दुबळीं । तीं आगळीं स-
दैव ॥ ४ ॥ माप आपुलेनि हातें । कोणी नाहीं
निवारितें । पैस करुनि चित्तें । घ्यावें हितें
आपुलिया ॥५॥ नाहीं वांटितां सरलें । आहे
तैसेंचि भरलें । तुका ह्मणे गेलें । वायाविण
न घेतां ॥ ६ ॥

१८ जातां पंढरीच्या मार्गें । काय गणूं सु-
खा मग ॥ १ ॥ घडे लाभ लक्षकोटि । परब्र-
ह्मीं होईल भेटी ॥ २ ॥ नाम गर्जत येती संत ।
त्यांच्या दर्शनें होइजे मुक्त ॥ ३ ॥ जो अल[1]-
क्ष्य ब्रह्मादिकां । आला संन्निध ह्मणे तुका ॥४॥

१९ सुखरूप ऐसें कोण दुजें सांगा । मा-
झ्या पांडुरंगा सारिखें तें ॥ १ ॥ नलगे दंडणें
मुंडणें तें कांहीं । साधनाची नाहीं आटीआटी[2]
॥ २ ॥ चंद्रभागे स्नान विधि[3] तो हरिकथा ।
समाधान चित्ता सर्वकाळ ॥ ३ ॥ तुका
ह्मणे काला वैकुंठीं दुर्लभ । विशेष हा लाभ
संतसंग ॥ ४ ॥

---

१ लक्षांत न येणारा. २ खटपट. ३ वेदविधि.

२० मूर्तिमंत देव नांदतो पंढरी। येर दिगंतरीं प्रतिमारूप ॥ १ ॥ जाऊनियां वना करावें कीर्तन । मानुनी पाषाण विठ्ठलरूप ॥२॥ तुका ह्मणे मुख्य पाहिजे हा भाव¹ । भावापाशीं देव शीघ्र उभा ॥ ३ ॥

२१ कोण येथें रिता गेला । जो जो आला या ठाया ॥ १ ॥ तातडी ते काय आतां। ज्याची चिंता तयासी ॥ २ ॥ नांवासाठीं नेघे भार । न लगे फार व्युत्पत्ति² ॥ ३ ॥ तुका ह्मणे न लगे जावें । कोठें देवें सूचनें ॥ ४ ॥

२२ सिंचन करितां मूळ । वृक्ष ओलावे सकळ ॥ १ ॥ नको पृथकाचे भरी। पडों एक मूळ धरी ॥ २ ॥ पाणघोंन्याचें दार । वरिल दाटावें तें थोर ॥ ३ ॥ वश जाला राजा । मग आपुल्या त्या प्रजा ॥ ४ ॥ एक चिंतामणी । फिटे सर्व सुख धणी³ ॥ ५ ॥ तुका ह्मणे धांवा । आहे पंढरी विसावा ॥ ६ ॥

२३ वैकुंठींचें सुख पंढरिये आलें । अवघें

---

१ श्रद्धा. २ अध्ययन. ३ तृप्ति.

सांठविलें पुंडलिकें ॥ १ ॥ आतां धांवा माझे बाप । जिव्हा घेऊनियां माप ॥ २ ॥ करा एक खेप । मग नलगे हिंडावें ॥ ३ ॥ त्रिषय गुंडूनि पसारा । धांव घ्या रे पंढरपुरा ॥ ४ ॥ आयुष्य वेचे जंव आहे । तोंचि धांवोनिया जाये ॥ ५ ॥ आळस न करी या लाभाचा । तुका विनवी कुणबियाचा ॥ ६ ॥

२४ पुराणींचा इतिहास । गोड रस सेविला ॥ १ ॥ नव्हती हे आह्मांच बोल । मोकळे फोल कवित्व ॥ २ ॥ भावें घ्या रे भावें घ्या रे । एकदा जा रे पंढरिये ॥ ३ ॥ भाग्यें आलेति मनुष्यदेहा । तो हा पहा विठ्ठल ॥ ४ ॥ पापपुण्या करील झाडा । जाईल पीडा जन्माची ॥ ५ ॥ घ्यावी हातीं टाळ दिंडी । गावे तोंडीं गुणवाद ॥ ६ ॥ तुका ह्मणे घटापटा । नलगे वाटा शोधाव्या ॥ ७ ॥

२५ धरितां पंढरीची वाट । नाहीं संकट मुक्तीचें[2] ॥ १ ॥ वंदू येती देव पदें । त्या

१ व्यर्थ. २ दुःखनाश व सुखप्राप्ति.

आनंदें उत्साहें ॥२॥ नृत्यछंदें उडती रेंज । जे सहज चालतां ॥ ३ ॥ तुका ह्मणे गरुडटके । वैष्णव निके संभ्रम ॥ ४ ॥

२६ तारूं लागलें बंदरीं । चंद्रभागेचिये तिरीं ॥ १ ॥ लुटा लुटा संतजन । अमुप हें राशी धन ॥ २ ॥ जाला हरिनामाचा तारा । शीड लागलें फरारा ॥ ३ ॥ तुका जवळी हमाल । भार चालवी विठ्ठल ॥ ४ ॥

२७ आषाढी निकट । आला कार्तिकीचा हाट ॥ १ ॥ पुरे दोन्हीच बाजार । नलगे आणीक व्यापार ॥२॥ तेंचि घ्यावें तेंचि घ्यावें । कैवल्याच्या राशी भावें ॥ ३ ॥ कांहीं कोणा नेणे । विठोबांचुनि तुका म्हणे ॥ ४ ॥

२८ जया दोषां परिहार । नाहीं नाहीं धुंडितां शास्त्र । ते हरती अपार । पंढरपुर देखिलिया ॥ १ ॥ धन्य धन्य भीमातीर । चंद्रभागा सरोवर । पद्मतीर्थी विठ्ठल वीर । क्रीडास्थळ वेणुनादीं ॥२॥ सकळ तीर्थांचें मा-

१ धूळ, २ पुष्कळ. ३ बाजार.

हेर । भूवैकुंठ निर्विकार । होतो
जर । असुर काळ कांपती ॥ २ ॥
द्यावया । सम तुल्य आणिका
भाग्य जयां । जे पंढरपुर देखती
जोनी संसारीं । एक वेळ पाहे पं
दोषां कैंची उरी । देवभक्त देखि
ऐसी विष्णूची नगरी । चतुर्भुज
सुदर्शन घरटी[1] करी । रीगं[2] न पुरे
ळा ॥ ६ ॥ तें सुख वर्णावया ग
कैंची मज मति । जे पंढरपुरा जा
वती वैकुंठ ॥ ७ ॥ तुका म्हणे या
जया विश्वास नाहीं साचा । अध
रिंचा । तया पंढरी नावडे ॥ ८ ॥

२९. आवडे पंढरी भीमा पांडुरं
भागा लिंग पुंडलीक ॥ १ ॥ कामधे
तरु चिंतामणी । आवडीची धणी पु
तुका म्हणे जीवा थोर जालें सुख ।
भूक ताहान कांहीं ॥ ३ ॥

१ भोंवतीं फिरे. १ शिरकाव.

३० पंढरीचा वारकरी । खेपा वैकुंठ बं-
दरीं ॥ १ ॥ तया नाहीं आणखी येणें । सदा वैकुंठीं राहणें ॥२॥ आला गेला केल्या यात्रा । उद्धरिलें कुळा सर्वत्रा ॥३॥ तुका म्हणे नाहीं । यासि संदेह कल्पांतींही ॥ ४ ॥

३१ पंढरीची वारी जयाचिये घरीं । पायधुळी शिरीं वंदिन त्यांची ॥ १ ॥ दासाचा मी दास पोसणा डिंगर[1] । आतां बहु फार काय बोलों ॥ २ ॥ जातीचें मी हीन न कळे भजन । म्हणोनि संतचरण इच्छितसें ॥ ३ ॥ तुका म्हणे मज म्हणावें आपुलें । बहुतां तारिलें संतजनीं ॥ ४ ॥

३२ पंढरीचे वारकरी । ते अधिकारी मोक्षाचे ॥ १ ॥ पुंडलिका दिला वर । करुणाकरें विठ्ठलें ॥ २ ॥ मूढ[2] पापी जैसे तैसे । उतरी कासे लावुनी ॥ ३ ॥ तुका म्हणे खरें जालें । एका बोलें संतांच्या ॥ ४ ॥

३३ आलें भरा केणें[3] । येरझार चुके जेणें

१ लेंकरूं. २ देहाभिमानी. ३ माल.

॥ १ ॥ उभें केलें विटेवरी । पेंठ इनाम पंढरी ॥ २ ॥ वाहती मारग । अवघें मोहोरलें जग ॥ ३ ॥ तुका म्हणे माप । खरें आणा माझे बाप ॥ ४ ॥

३४ उठाउठीं अभिमान । जाय ऐसें स्थळ कोण ॥ १ ॥ तें या पंढरीस घडे । खळां पाझर रोकडे ॥ २ ॥ नेत्रीं अश्रूचिया धारा । उठे रोमांच शरीरा ॥ ३ ॥ तुका म्हणे काला । कोठें अभेद देखिला ॥ ४ ॥

३५ अवघें जेणें पाप नासे । तें हें असे पंढरीसी ॥ १ ॥ गात जागा गात जागा । प्रेम मागा विठ्ठला ॥ २ ॥ अवघी सुखाचीच राशी । पुंडलिकासी वोळली ॥ ३ ॥ तुका म्हणे जवळी आलें । उभें ठेलें समचरणीं ॥४॥

३६ अवघींच तीर्थें घडती एकवेळा । चंद्रभागा डोळां देखिलिया ॥ १ ॥ अवघींच पापें गेलीं दिगंतरीं । वैकुंठ पंढरी देखिलिया ॥२॥ अवघिया संतां एकवेळा भेटी । पुंडलीक

१ भरून गेलें. २ तत्काळ.

दृष्टी देखिलिया ॥ ३ ॥ तुका म्हणे जन्मा आ-
ल्याचें सार्थक । विठ्ठलची एक देखिलिया ४

३७ उदार चक्रवर्ती । वैकुंठींचा भूपति ।
पुंडलिकाचिया प्रीति । विटे उभा राहिला ॥१
सर्वसिद्धींचा दातार । सवें आणिला परि-
वार । भक्ता अभयकर । घ्या घ्या ऐसें म्हण-
तसे ॥ २ ॥ जेणें हें विश्व निर्मिलें । महर्षी दे-
वा संस्थापिलें । एकवीस स्वर्गांतें धरिलें ।
सत्तामात्रें आपुलिया ॥ ३ ॥ तुका म्हणे कृ-
पावंत । इच्छिले पुरवी मनोरथ । रिद्धिसि-
द्धिमुक्ति देत । शेखीं संग आपुला ॥ ४ ॥

३८ नातुडे जो कवणे परी । उभा केला
विटेवरी ॥ १ ॥ भला भला पुंडलिका । मा-
नलासी जनलोकां ॥ २ ॥ कोण्या काळें सु-
खा । ऐशा कोण पावता ॥ ३ ॥ अवघा आणि-
ला परिवार । गोपी गोपाळांचा भार ॥ ४ ॥
तुका म्हणे धन्य जालें । भूमी वैकुंठ आणिलें

३९ ॥ धन्य पुंडलिका बहु बरें केलें । नि-

१ सार्वभौम राजा. २ शेवटीं.

धान आणिलें पंढरिये ॥ १ ॥ न करी आळस आलिया संसारीं । पाहे पा पंढरी भूवैकुंठ ॥ २ ॥ न पविजे केल्या तपांचिया राशी । तें जनलोकांसी दाखविलें ॥ ३ ॥ सर्वोत्तम तीर्थ क्षेत्र आणि देव । शास्त्रांनीं हा भाव निवडिला ॥ ४ ॥ विष्णुपद गया रामधाम काशी । अवघीं पायांपाशीं विठोबाच्या ॥५॥ तुका ह्मणे मोक्ष देखिल्या कळस । तात्काळ या नाश अहंकाराचा ॥ ६ ॥

४० कां रे पुंड्या मातलासी । उभें केलें विठ्ठलासी ॥ १ ॥ ऐसा कैसा रे तूं धीट । मागें भिरकाविली[2] वीट ॥ २ ॥ युगें जालीं अठ्ठावीस । अजुनी न ह्मणसी बैस ॥ ३ ॥ भाव देखोनि निकट । देवें सोडिलें वैकुंठ ४ तुका ह्मणे पुंडलिका। तूंचि बळिया एक निका५

४१ पुंडलिक भक्तराज । तेणें साधियलें काज । वैकुंठींचें निज । परब्रह्म आणिलें ॥१॥ पांडुरंग बाळमूर्ति । गाईगोपाळांसंगती । येऊ-

---

१ सुखाचा ठेवा. २ फेकिली.

नियां प्रीति । उभें समचि राहिलें ॥ २ ॥ ए-
का आगळें अक्षरें । भूवैकुंठचि दुसरें । ह्मण-
विती येरें । परि तीं ऐशीं नव्हेती ॥ ३ ॥ पा-
प पंचक्रोशीमधीं । येऊं न सकेचि कधीं । कैं-
ची तेथें विधि । निषेधाची वसति ॥ ४ ॥ पु-
राणें वदती ऐसें । चतुर्भुज तीं माणसें । सु-
दर्शनावरी वसे । रीग न घडे कल्पांतीं ॥ ५ ॥
महाक्षेत्र हें पंढरी । अनुपम्य[1] इची थोरी ।
धन्य धन्य वारकरी । तुका ह्मणे तेथींचे ॥ ६ ॥

४२ भूत नावरे कोणासी । पुंडलीकें खि-
ळिलें त्यासी ॥ १ ॥ समचरण असे विटे ।
कटीं कर उभें नीट ॥ २ ॥ वाळुवंटीं नाचती
संत । प्रेमामृतें डुल्लत ॥ ३ ॥ तुका ह्मणे पुंड-
लिका । भक्तिबळें तूंचि निका ॥ ४ ॥

४३ वैकुंठा जावया तपाचे सायास । कर-
णें जीवनाश न लगे कांहीं ॥ १ ॥ तया पुंड-
लिकें केला उपकार । फेडावया भार पृथ्वी-
वचा ॥ २ ॥ तुका ह्मणे सोपी केली पायवा-

१ उपमारहित.

ट । पंढरी वैकुंठ भूमीवरी ॥ ३ ॥

४४ वैकुंठींचा देव आणिला भूतळा । ध
न्य तो आगळा पुंडलिक ॥ १ ॥ धारिष्ट धै
र्यांचा वरिष्ठ भक्तांचा । पवित्र पुण्याचा प
कनिष्ठ ॥ २ ॥ पितृसेवापुण्यें[1] लाधला निध
न । ब्रह्म सनातन अंगसंगें ॥ ३ ॥ अंगसं
रंगें क्रीडा करी जाणा । ज्या घरीं पाहुण
वैकुंठींचा ॥ ४ ॥ धन्य त्याची शक्ति भक्तीच
हे ख्याति । तुका ह्मणे मुक्ति पायीं लोळे ॥५

४५ पंढरीचें भूत मोठें । आल्या गेल्य
झडपी वाटे ॥ १ ॥ तेथें जाऊं नका कोणी
नाहीं आले परतोनि ॥ २ ॥ तुका पंढर
सी गेला । पुन्हां जन्मा नाहीं आला ॥ ३ ।

४६ मैंद आला पंढरीस । हातीं घेऊ
प्रेमपाश ॥ १ ॥ पुढें नाडियलें जग । ने
लागों नेदी माग ॥ २ ॥ उभारोनि बाहे ।
ष्टादृष्टी वेधीताहे ॥ ३ ॥ वैकुंठीहुनि पेणें[2]
केलें पंढरीकारणें ॥ ४ ॥ पुंडलिकें थारा

१ आईबापांची सेवा. २ मुक्काम.

देउनि आणिलें या चोरा ॥ ५ ॥ तुका ह्मणे चला । तुह्मी आह्मी धरूं त्याला ॥ ६ ॥

४७ पंढरीचा महिमा । देतां आणीक उपमा ॥ १ ॥ ऐसा ठाव नाहीं कोठें । देव उभाउभीं भेटे ॥ २ ॥ आहेति सकळ । तीर्थें काळें देती फळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे पेंठ । भूमीवरी हे वैकुंठ ॥ ४ ॥

४८ पंढरी पंढरी । ह्मणतां पापाची बोहरी ॥ १ ॥ धन्य धन्य जगीं ठाव । होतो नामाचा उत्सव ॥ २ ॥ रिद्धिसिद्धी लोटांगणीं । प्रेमसुखाचिया खाणी ॥ ३ ॥ अधिक अक्षरानें एका । भूवैकुंठ ह्मणे तुका ॥ ४ ॥

४९ पंढरीसी जाय । तो विसरे बापमाय ॥ १ ॥ अवघा होय पांडुरंग । राहे धरूनिया अंग ॥ २ ॥ न लगे धन मान । देहभावें उदासीन ॥ ३ ॥ तुका ह्मणे मळ । नासी तात्काळ तें स्थळ ॥ ४ ॥

५० पंढरीस दुःख न मिळे ओखदीं । प्रे-

१ प्रत्यक्ष. २ नाश. ३ दोष. ४ औषधाला.

मसुख सदा सर्वकाळ ॥ १ ॥ पुंडलिकें हाट[1] भरियेली पेंठ । अवघें वैकुंठ आणियेलें ॥ २ ॥ उदमासी तुटी नाहीं कोणा हानि । घेऊनि-यां धणी लाभ घेती ॥ ३ ॥ पुरलें देशासी भरलें सिगेसी । अवघी पंचक्रोशी दुमदु-मीत ॥ ४ ॥ तुका ह्मणे संतां लागलीसे धणी[2] । बैसले राहोनि पंढरीस ॥ ५ ॥

५१ पंढरीचा वास धन्य तेचि प्राणी । अमृताची वाणी दिव्य देह ॥ १ ॥ मूढ मति-हीन दुष्ट अविचारी । ते होती पंढरीं दया-रूप ॥ २ ॥ शांति क्षमा अंगीं विरक्ति[3] सक-ळ । नैराश्य निर्मळ नारी नर ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं वर्ण अभिमान । अवघे जीवनमु-क्त लोक ॥ ४ ॥

५२ भीमातीरवासी । तेथें निश्चयेंसी काशी ॥ १ ॥ मुख्य मुक्तीचें माहेर । ऐसें जाणा पंढरपुर ॥ २ ॥ घडे भींवरेशीं स्नान । त्या-सी पुन्हां नाहीं जन्म ॥ ३ ॥ भावें धरोनी ने-

---

१ बाजार. २ आवडी. ३ वैराग्य. ४ श्रद्धा.

टकों । मोक्ष जवळी ह्मणे तुका ॥ ४ ॥

५३ धन्य ते पंढरी धन्य भीमातीर । आणियेलें सार पुंडलिकें ॥ १ ॥ धन्य तोही लोक अवघा दैवांचा । सुकाळ प्रेमाचा घरोघरीं ॥ २ ॥ धन्य तेहि भूमी धन्य तरुवर । धन्य सरोवर तीर्थरूप ॥ ३ ॥ धन्य त्या नरनारी मुखीं नाम ध्यान । आनंदें भवन गर्जतसे ॥४॥ धन्य पशु पक्षी कीटक पाषाण । अवघा नारायण अवतरलासे ॥ ५ ॥ तुका ह्मणे धन्य संसारातें आलीं । हरिरंगीं रंगलीं सर्वभावें ६

५४ धन्य तो ग्राम जेथें हरिदास । धन्य तोचि वास[१] भाग्य तया ॥ १ ॥ ब्रह्मज्ञान तेथें असे घरोघरीं । धन्य त्या नरनारी चतुर्भुज २ नाहीं पापा रिघ काळाचें जीवन । हरिनामकीर्तन घरोघरीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे तींहीं तारिलें सकळां । आपल्या कोटिकुळांसाहित जीव ॥ ४ ॥

५५ धन्य धन्य जयास पंढरीसी वास ।

---

१ शुद्ध. २ झाडें. ३ वस्ती. ४ शिरकाव.

धन्य ते जन्मास प्राणी आले ॥ १ ॥ चहू खाणींमध्यें होत कोणी एक । त्रिगुण कीटक पक्षिराज ॥ २ ॥ उत्तम चांडाळ नर नारी बाळ । अवघेचि सकळ चतुर्भुज ॥ ३ ॥ अवघा विठ्ठल तेथें दुजें नाहीं । भरला अंतर्बाहीं सदोदित ॥ ४ ॥ तुका ह्मणे तेथें होउनी राहेन । सांडोवा पाषाण पंढरीचा ॥ ५ ॥

५६ सकळतीर्थांहूनि । पंढरीनाथ मुगुटमणी ॥ १ ॥ धन्यधन्य पंढरी । जे मोक्षाची अक्षय पुरी ॥ २ ॥ विश्रांतीचा ठाव । तो हा माझा पंढरीराव ॥ ३ ॥ तुका ह्मणे सांगें स्पष्ट । दुजी पंढरी वैकुंठ ॥ ४ ॥

५७ सकळतीर्थांहुनि । पंढरी हे मुगुटमणी ॥ १ ॥ काय सांगों तेथिल शोभा । रमावल्लभ जेथें उभा ॥ २ ॥ न लभे व्रततीर्थदानीं । तें या विठ्ठलदर्शनीं ॥ ३ ॥ साधु संत गाती नाम । सकळ भूतांचा विश्राम ॥ ४ ॥ तुका ह्मणे स्तुती । करूं काय सांगों किती ५

१ उद्भिज, जरायुज, स्वेदज, अंडज. २ निपयोगी.

५८ सुरवर येती तीर्थें नित्य काळ । पैठ त्या निर्मळ चंद्रभागा ॥ १ ॥ साक्षीभूत नव्हे सांगितली मात । महिमा अत्यद्भुत वर्णवेना ॥ २ ॥ पंचक्रोशीमाजी रीघ नाहीं दोघां । जळती आपैसा अघोर ते ॥३॥ निर्विषय नर चतुर्भुज नारी । अवघा घरोघरीं ब्रह्मानंदु ॥ ॥ ४ ॥ तुका ह्मणे ज्यांपें नाहीं पुण्यलेश । जा रे पंढरीस घेई कोटि ॥ ५ ॥

५९ जंववरी नाहीं देखिली पंढरी । तोंवरी वर्णिसी थोरी वैकुंठींची ॥ १ ॥ मोक्षसिद्धि तेथें हिंडे दारोदारीं । होऊनि कामारी दीनरूप ॥ २ ॥ वृंदावन सडे चौक रंगमाळा । अभिनव सोहोळा घरोघरीं ॥ ३ ॥ नामघोष कथापुराणकीर्त्तनीं । ओंविया कांडणीं पांडुरंग ॥ ४ ॥ सर्व सुख तेथें असे सर्वकाळ । ब्रह्म तें केवळ नांदतसे ॥ ५ ॥ तुका ह्मणे जें न साधे सायासें । तें हें प्रत्यक्ष दिसे विटेवरि ॥ ६ ॥

---

१ प्रत्यक्ष. २ सहज. ३ ज्यापाशीं. ४ दासी.

६० तीर्थें केलीं कोटिवरी । नाहीं देखिली पंढरी ॥ १ ॥ जळो त्याचें ज्यालेपण[1] । न देखेचि समचरण ॥ २ ॥ योग याग अनंत केले । नाहीं समचरण देखिले ॥ ३ ॥ तुका ह्मणे विठ्ठलपायीं । अनंत तीर्थें घडलीं पाहीं ॥४॥

६१ काशीयात्रा पांच द्वारकेच्या तीन । पंढरीची जाण एक यात्रा ॥ १ ॥ काशी देह विटंबणें[2] द्वारके जाळणें । पंढरीसी होणें ब्रह्मरूप ॥ २ ॥ अठरापगडयाती सकळहि वैष्णव । दुजा नाहीं भाव पंढरीसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे असो अथवा नसो भाव[3] । दर्शनें पंढरीराव मोक्ष देतो ॥ ४ ॥

६२ जो या गेला पंढरपुरा । आणीक यात्रा न मनी तो ॥ १ ॥ सुलभ माय पंढरीराणा । पुरवी खुणा अंतरींच्या ॥ २ ॥ जन्मांतरींच्या पुण्यराशी । वारी त्यासी पंढरीची ॥ ३ ॥ बाहेर येतां प्राण फुटे । रडे दाटे गहिवरें ॥ ४ ॥ दधिमंगळ भोजन सारा । ह्म-

१ जगणें. २ क्षौर करणें इत्यादि. ३ श्रद्धा.

णती करा मुरडींव[1] ॥ ५ ॥ मागुता हा पाहो
ठाव । पंढरिराव दर्शनें ॥ ६ ॥ तुका ह्मणे भू-
वैकुंठ । वाळुवंट भींवरा ॥ ७ ॥

६३ करोत तपादि साधनें । कोणी सा-
धोत गोरांजनें[2] ॥ १ ॥ आम्ही न वजों तया
वाटा । नाचूं पंढरी चोहटां ॥ २ ॥ पावोत
आत्मस्थिति । कोणी म्हणोत उत्तम मुक्ति ॥
॥ ३ ॥ तुका म्हणे छंद । आम्हां हरिच्या दा-
सां निंद्य ॥ ४ ॥

६४ कासया करावे तपाचे डोंगर । आ-
णीक अपार दुःखरासी ॥ १ ॥ कासया फि-
रावे अनेक ते देश । दावितील आस पुढें ला-
भ ॥ २ ॥ कासया पुजावीं अनेक दैवतें । पो-
टभर तेथें लाभ नाहीं ॥ ३ ॥ कासया करावे
मुक्तीचे सायास । मिळे पंढरीस फुकासा-
ठीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे करीं कीर्तन पसारा ।
लाभ येईल घरा पाहिजे तो ॥ ५ ॥

६५ जनाचिया मना जावें कासियेसी । माझी

---

१ करंज्या. २ योगाचें एक साधन.

वाराणसी पांडुरंग ॥ १ ॥ तेथें भागीरथी ये-
थें भीमरथी । अधिक ह्मणती चंद्रभागा ॥२॥
तेथें माधवराव[1] येथें यादवराव । जाणोनि-
यां भाव पुंडलिकाचा ॥ ३ ॥ विष्णुपद गया
तेंचि येथें आहे । प्रत्यक्ष हे पाय विटेवरी ॥४
तुका ह्मणे हेंचि प्रपंच उद्धरी । आतां पंढर-
पुरी घडो बापा ॥ ५ ॥

६६ पंढरीसी जावें ऐसें माझे मनीं । वि-
ठाई जननी भेटे केव्हां ॥ १ ॥ न लगे त्यावि-
ण सुखाचा सोहळा । लागे मज ज्वाळा अ-
ग्नीचिया ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याचे पाहिलीया
पाय । मग दुःख जाय सर्व माझें ॥ ३ ॥

६७ पंढरीस जाते निरोप आइका । वैकुं-
ठनायका क्षेम[2] सांगा ॥ १ ॥ अनाथांचा नाथ
हें तुझें वचन । धांवे नको दीन गांजों देऊं २
ग्रासिलें भुजंगें सर्पें महाकाळें । न दिसे हें
जाळें उगवतां ॥ ३ ॥ कामक्रोधसुनीं[3] श्वापदीं
बहुतीं । वेढलों आवर्तीं मायेचिये ॥ ४ ॥ मृ-

---

१ बिंदुमाधव. २ कुशल समाचार. ३ कुतीं.

233785

गजलनदी बुडविना तरी। आणूनियां वरी तळा नेते ॥ ५ ॥ तुका ह्मणे तुवां धरिलें उदास। तरी पाहों वास कवणाची ॥ ६ ॥

६८ संपदा सोहळा नावडे मनाला। करी तें टकळा पंढरीचा ॥ १ ॥ जावें पंढरीसी आवडी मनासी। कधीं एकादशी आषाढी हे ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें आर्त ज्याचे मनीं। त्यासी चक्रपाणी वाट पाहे ॥ ३ ॥

६९ साधन संपत्ति हेंचि माझें धन। सकळ चरण विठोबाचे ॥ १ ॥ शीतळ हा पंथ माहेराची वाट। जवळीच नीट सुखरूप ॥ २ वैष्णवांचा संग रामनाम गाणें। मंडित भूषणें अळंकार ॥ ३ ॥ भवनदी आड नव्हतीसी जाली। कोरडीच चाली जावें पायीं ॥४ मायबाप दोघे पाहातील वाट। ठेवूनियां कटीं कर उभीं ॥ ५ ॥ तुका ह्मणे केव्हां देखेन कळस। पळाली आळस निद्रा भूक ॥ ६ ॥

७० सुखें घेऊं जन्मांतरें। एक बरें इहलो-

---

१ आसुरी संपत्ति. २ लय, लक्ष. ३ इच्छा.

[redacted]

कीं ॥ १ ॥ पंढरीचे वारकरी । होतां थोरी जोडी हे ॥ २ ॥ हें तों आलें अनुभवा । पाहावें जीवावरूनि ॥ ३ ॥ तुका ह्मणे केला त्याग । सर्वसंग म्हणऊनि ॥ ४ ॥

७१ संतोषें माउली आरुषां[1] वचनीं । वोरसोनि स्तनीं लावी बाळा ॥ १ ॥ तैसें प्रेमळाचें अवघेंचि गोड । पुरवितो कोडें[2] पांडुरंग ॥ २ ॥ सेवा करी साहे निष्ठुर उत्तर । त्याचें वाहे बरें तेंच मनीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे इच्छावसें खेळ खेळे । चिंता ते सकळ कांहीं नेणें ॥ ४ ॥

७२ सांवळें रूपडें चोरटें चित्ताचें । उभें पंढरीचें विटेवरी ॥ १ ॥ डोळियांची धणी पाहतां न पुरे । तयालागीं झुरे मन माझें ॥ आन गोड कांहीं न लगे संसारीं । राहिले अंतरीं पाय तुझे ॥ ३ ॥ प्राण निघों पाहे कुडी हे सांडुनी । श्रीमुख नयनीं न देखतां ॥ ॥ ४ ॥ चित्त मोहियेलें नंदाच्या नंदनें । तु-

---

१ वेडींवांकडीं भाषणें. २ मनोरथ.

का ह्मणे येणें गरुडध्वजें ॥ ५ ॥

७३ इमानाची भरली पेठ । वाहाती दाट मारग ॥ १ ॥ अवघेची येती वाण । अवघे शकुन लाभाचे ॥ २ ॥ अडचणी त्यां केल्या दुरी । देण्या उरी घेण्याच्या ॥ ३ ॥ तुका ह्मणे जोडी जाली । ते आपुली आपणा ॥ ४ ॥

७४ द्वारकेचें[1] केणें आलें याचि ठाया । पुढें भक्तराया चोजवीत ॥ १ ॥ गोंविलें विसारें माप केलें खरें । न पाहे माघारें अद्याप[2]वरी ॥ २ ॥ वैष्णव मापारी नाहीं जाली संळे । पुढेंही न कळे पार त्याचा ॥ ३ ॥ लाभ जाला त्यांनीं धरिला विचार । आहिक्य परत्र[3] सांठविलें ॥ ४ ॥ तुका ह्मणे मज मिळाली मजूरी । विश्वास या घरीं संतांचिया ॥ ५ ॥

७५ तुझे पाय माझी काशी । कोण जाय माझें काशी ॥ १ ॥ तुझें रूप तेंचि ध्यान । तेंचि माझें अनुष्ठान ॥ २ ॥ तुझे चरण तेंचि

१ निधान, ठेवा. २ कष्ट. ३ स्वर्ग.

गया । जालें गयावर्जन देहा ॥ ३ ॥ तुका ह्म-
णे सकळ तीर्थें । तुझे पायीं वसती येथें ॥४॥

७६ दोन्ही हात ठेवुनि कटीं । उभा भीव-
रेच्या तटीं । कष्टलासी साठीं । भक्तिकाजें
विठ्ठला ॥ १ ॥ भागलासी[1] मायबापा । बहु
श्रम केल्या खेपा । आह्मालागीं सोपा । दै-
त्या काळ कृतांतें[2] ॥ २ ॥ होतासी क्षीरसाग-
रीं । मही दाटली[3] असुरीं । म्हणोनियां घरीं ।
गौळियांचे अवतार ॥ ३ ॥ केला पुंडलिकें
गोवा । तुज पंढरीसी देवा । तुका ह्मणे भा-
वा । साठीं हातीं सांपडसी ॥ ४ ॥

७७ दुःखाचिये साठीं तेथें मिळे सुख ।
अनाथाची भूक दैन्य जाय ॥ १ ॥ उदाराचा
राणा पंढरीस आहे । उभारोनि बाहे पाल-
वितो ॥२॥ जाणतियाहूनि नेणत्याची गोडी ।
आलिंगी आवडी करूनिया ॥ ३ ॥ शीण घे-
ऊनियां प्रेम देतो साटी । न विचारी तुटी
लाभा कांहीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे असो अनाथ

---

१ श्रमलासी. २ यम. ३ भारयुक्त झाली.

दुबळीं । आम्हांसी तो पाळी पांडुरंग ॥ ५ ॥

७८ धरियेलीं सोंगें । येणें अवघीं पांडुरंगें ॥ १ ॥ तें हें ब्रह्म विटेवरी । उभें चंद्रभागे तिरीं ॥ २ ॥ अंतर्व्यापी बाही । धांडोळितां कोठें नाहीं ॥ ३ ॥ योगयागतपें । ज्याकारणें दानजपें ॥ ४ ॥ दिले नेदीजती । भोग सकळ ज्या होती ॥ ५ ॥ अवघी लीळा पाहे । तुका म्हणे दासां साहे ॥ ६ ॥

७९ जो भक्तांचा विसावा । उभा पाचारितो धांवा ॥ १ ॥ हातीं प्रेमाचें भातुकें । मुखीं घाली कवतुकें ॥ २ ॥ भवसिंधु सुखें । उतरी कासे लावूनि ॥ ३ ॥ थोर भक्तांची आस । पाहे भोंवतालीं वास ॥ ४ ॥ तुका म्हणे कृपादानी । फेडी आवडीची धणी ॥५॥

८० तिन्ही लोक ऋणें बांधिले जयानें । सर्वसिद्धि केणें तये घरीं ॥ १ ॥ पंढरीच्योहाटां घातला दुकान । मांडियेलें वान आवडीचें २ आषाढी कार्तिकी भरियेले हाट । इनाम हे

१ बाहेर. २ खाद्य. ३ वसतिस्थान. ४ माल.

पेंठ घेतां देतां ॥ ३ ॥ मुक्ति कोणी तेथें हात नेघे फुका । लुटितील सुखा प्रेमाचिया ॥४॥ तुका म्हणे संतसज्जन भाग्याचे । अनंता जन्मींचे सांठेकरी ॥ ५ ॥

८१ तीर्थांचें जें मूळ व्रतांचें जें फळ । ब्रह्म तें केवळ पंढरिये ॥ १ ॥ तें आम्हीं देखिलें आपुल्या नयनीं । फिटलीं पारणीं डोळियांचीं ॥२॥ जीवांचें जीवन सुखाचें सेजार । उभें कटीं कर ठेवूनियां ॥ ३ ॥ जगाचा जेंनिता कृपेचा सागर । दीनां लोभापर दुष्टां काळ ॥ ४ ॥ सुरवरां चिंतनीं मुनिवरां ध्यानीं । आकार निर्गुणीं तेंचि असे ॥ ५ ॥ तुका म्हणे नाहीं श्रुती आतुडलें । आम्हां सांपडलें गीती गातां ॥ ६ ॥

८२ नागरगोंडें बाळरूप । तें स्वरूप कोंळीचें ॥ १ ॥ गाईगोपाळांच्या संगें । आलें लागें पुंडलिका ॥ २ ॥ तें हें ध्यान दिगंबर । कटीं कर मिरविती ॥ ३ ॥ नेणपणें उगेंचि

---

१ हौस. २ बाप. ३ मिळालें. ४ सुंदर. ५ जुनाट.

उभें । भक्तिलोभें राहिलें ॥ ४ ॥ नेणे वरदळा-
चा मान । विटे चरण सम उभे ॥ ५ ॥ सह-
ज कटावरी हात । दहीं भात शिदोरी ॥ ६ ॥
मोहरी पांवा गांजिवा पाठीं । धरिली काठी
ज्या काळें ॥ ७ ॥ रम्य स्थळ चंद्रभागा ।
पांडुरंगा क्रीडेसी ॥ ८ ॥ भीमा दक्षणमुख
वाहे । दृष्टी पाहे समोर ॥ ९ ॥ तारावेंसे मू-
ढ लोकां । दिली भाक[1] पुंडलिका ॥ १० ॥ तु-
का म्हणे वैकुंठवासी । भक्तांपासीं राहिला ११

८२ आणिकांची सेवा करावी शरीरें । तीं
येथें उत्तरें कोरडींच ॥ १ ॥ ऐसा पांडुरंग
सुलभ सोपारा । नेघे येरझारा[2] सेवकाच्या २
आणिकांचे भेटी आडकाठी[3] पडे । येथें तें न
घडे वचनही ॥ ३ ॥ आणिकांचें देणें काळीं
पोट भरे । येथील न सरे कल्पांतींही ॥ ४ ॥
आणिकें दंडिती चुकलिया सेवा । येथें सोस
हेवा नाहीं दोन्ही ॥ ५ ॥ तुका म्हणे करी
आपणासारिखें । उद्धरी पारिखें उंच निंच ६

१ आणभाक. २ येणेंजाणें. ३ अडचण.

८४ आपुलिया लाजा। धांवे भक्तांचिया काजां[1] ॥ १ ॥ नाम धरिलें दीनानाथ। सत्य करावया व्रत ॥ २ ॥ घात आघात निवारी। छाया पीतांबरें करी ॥ ३ ॥ उभा कर कटीं। तुका म्हणे याजसाठीं ॥ ४ ॥

८५ आलिया संसारीं देखिली पंढरी। कीर्ति महाद्वारीं वाणूं तुझी ॥ १ ॥ पताकांचे भार नामाचे गजर। देखिल्या संसार सफळ जाला ॥ २ ॥ साधुसंतांचिया धन्य जाल्या भेटी। सांपडली लुटी मोक्षाची हे ॥३॥ तुका ह्मणे आतां हेंचि पैं मागणें। पुढती नाहीं येणें संसारासी ॥ ४ ॥

८६ आह्मी आळीकरें[2]। प्रेमसुखाचीं लेंकुरें ॥ १ ॥ पायीं गोंविली[3] वासना। तुच्छ केलें ब्रह्मज्ञाना ॥ २ ॥ येतां पाहे मुळा। वाटे पंढरीच्या डोळां ॥ ३ ॥ तुका म्हणे स्थळें। मग मी पाहेन सकळें ॥ ४ ॥

८७ इंद्रियाचें पुरे कोड। तेंचि गोड पुढ-

---

१ कार्याकरितां. २ छंद घेणारीं. ३ गुंतविली.

तीही ॥ १ ॥ जावें म्हणती पंढरपुरा । हाचि बरा संसार ॥ २ ॥ बैसलें तें मनामुळीं । सुख डोळीं देखिलें ॥ ३ ॥ तुका म्हणे देती कान । वाणावाण[1] निवडुनी ॥ ४ ॥

८८ किती चोंग्राचारें । येथें गोंविलीं वेव्हारें ॥ १ ॥ असे बांधविले गळे । होऊं न सकती निराळे ॥ २ ॥ आपलें आपण । केलें कां नाहीं जतन ॥ ३ ॥ तुका म्हणे खंडदंडें । येरझारीं[2] लपती लंडें ॥ ४ ॥

८९. जाली हरिकथा रंग वोरसला । उचितासी आला पांडुरंग ॥ १ ॥ वांटितो हें प्रेम उचिताचा दाता । घेई रे तूं आतां धणीवेरी ॥ २ ॥ प्रेम देऊनियां अवघीं सुखी केलीं । जीं होतीं रंगलीं विठ्ठलीं तीं ॥ ३ ॥ तुकें हें दुर्बळ देखियेलें संतीं । ह्मणऊनि पुढती आणियेलें ॥ ४ ॥

९० जुनाट हें धन अंत नाहीं पार । खात आले फार सरलें नाहीं ॥ १ ॥ नारद हा मुनि

१ चांगलें वाईट. २ जन्ममरण खेपा. ३ दसीवर.

शुकसनकादिक । उरलें अमूप[1] तुह्मां आह्मां ॥ २ ॥ येथूनियां धना खाती बहुत जन । वाल गुंज उणें जालें नाहीं ॥ ३ ॥ तुका म्हणे धना नाहीं अंतपार । कुंठित हे चार वांचा[2] तेथें ॥ ४ ॥

९१ जो का निर्गुण निराकार । तेणें धरियेले अवतार ॥ १ ॥ निर्गुण तो सगुणासी आला । भक्तीसाठीं प्रगटला ॥ २ ॥ जो का त्रिभुवनचाळक । तो हा नंदाचा बाळक ॥३ सोडविलें वसुदेवदेवकीसी । अवतार धरिला तिचे कुशीं ॥ ४ ॥ मारियेला कंसराणा । राज्यीं स्थापिलें उग्रसेना ॥ ५ ॥ तुका म्हणे देवाधिदेव । तो हा उभा पंढरीराव ॥ ६ ॥

९२ पांडुरंगा ऐसा सांडुनि वेव्हारा । आणिकांची करा आस वाया ॥ १ ॥ बहुतांसी दिला उद्धार उदारें । निवडीना खरें खोटें कांहीं ॥ २ ॥ याचिया अंकिता वैकुंठ बंदर । आणीक वेव्हार चालतीना ॥ ३ ॥ तुका म्हणे

१ पुष्कळ. २ परा, पश्यंति, मध्यमा, वैखरी या चार वाणी.

माझे हातींचें वजन । यासी बोल कोण ठेवूं सके ॥ ४ ॥

९३ पुंडलिकाचे निकटसेवे । कैसा धांवे बराडी ॥ १ ॥ आपुलें थोरपण । नारायण विसरला ॥ २ ॥ उभा कटीं ठेवूनि कर । न ह्मणे पर[1] बैससें ॥ ३ ॥ तुका म्हणे जगदीशा । करणें आशा भक्तांची ॥ ४ ॥

९४ बाप माझा दीनानाथ । वाट भक्तांची पाहात ॥ १ ॥ कर ठेवूनियां कटीं । उभा चंद्रभागे तटीं ॥ २ ॥ गळां वैजयंतीमाळा । रूपें डोळस सांवळा ॥ ३ ॥ तुका म्हणे भेटावया । सदा उभारिल्या बाह्या ॥ ४ ॥

९५ ब्रह्मज्ञान जेथें आहे घरोघरीं । सर्व निरंतरीं चतुर्भुज ॥ १ ॥ पापा नाहीं रीग काळाचें खंडण । हरिनामकीर्तन परोपरीं[2] २ तुका म्हणे हाचि भाव माझ्या चित्तीं । नाहीं आणिकां गती चाड[3] मज ॥ ३ ॥

९६ ब्रीद ज्याचें जगदानी । तोचि मनीं

---

१ परंतु. २ अनंत प्रकारांनीं. ३ इच्छा.

स्मरावा ॥ १ ॥ सम पाय कर कटीं । उभा तटीं भींवरेच्या ॥२॥ पाहिलिया वेध[1] लावी । बैसे जीवीं जडोनि ॥ ३ ॥ तुका म्हणे भक्ति-काजा । धांवे लाजा लवलाहें ॥ ४ ॥

९७ भक्तवत्सल दीनानाथ । तिहीं लोकीं ज्याची मात[2] ॥ १ ॥ तो हा पुंडलिकासाठीं । आला उभा वाळवंटीं ॥ २ ॥ गर्भवास धरी । अंबऋषीचा कैवारी ॥ ३ ॥ सकळां देवां अ-धिष्ठान । एका मंत्रासी कारण ॥ ४ ॥ तुका म्हणे ध्यानीं । ज्यासि ध्यातो शूळपाणी[3] ॥५॥

९८ लाघवी सूत्रधारी । दोरी नाचवी कुसरी । उपजवी पाळूनि संहारी । नानापरीचीं लाघवें ॥ १ ॥ पुरोनि पंढरिये उरलें । भक्तिसुखें लांचावलें । उभेंचि राहिलें । कर कटीं न बैसे ॥ २ ॥ बहु काळें ना सावळें । बहु कठिण ना कोंवळें । गुणत्रया वेगळें । बहुबळें आथिलें ॥ ३ ॥ असोनि नसे सकळां-मधीं । मना अगोचर बुद्धी । स्वामी माझा

---

१ अंतःकरणवृत्तीचा लय. २ ख्याति. ३ शंकर.

कृपानिधि । तुका म्हणे श्रीविठ्ठल ॥ ४ ॥

९९ लाभ खरा नये तुटी[1] । नाहीं आडख-ळा भेटी ॥ १ ॥ जाय अवघिया देशा । येथें संचलासी तैसा ॥ २ ॥ मग नलगे पारखी । अवघीं सकट सारखीं ॥ ३ ॥ तुका म्हणे वो-ळे । रूपें भुलविले डोळे ॥ ४ ॥

१०० वाचेचिया आळा कवळिलें ब्रह्म । चुकविला श्रम पृथक तो ॥ १ ॥ सुलभ तें जालें सुलभ तें जालें । जवळी तें आलें पंढ-रीये ॥ २ ॥ नामरूपाचें बांधलें मोटळें । एक एका वेळे सारियेलें ॥ ३ ॥ तुका म्हणे वाटे चुकली वसती । उद्धार तो हातीं आणि-येला ॥ ४ ॥

१०१ पंढरीस घडे अतित्यागी[2] मृत्यु । तो जाय पतित अधःपाता ॥१॥ दुराचाऱ्या मोक्ष सुखाची वसति । भोळी बाळमूर्ति पांडुरंग २ केला न सहावे तीर्थ उपवास । कथेविण दोष साधन तें ॥ ३ ॥ कालियापापें भेद मा-

१ नुकसान. २ अविचारानें विष खाऊन मरणें.

निता निवडे। श्रोत्रियांसी[1] जोडे अंत्यजता ४ माहेरीं सलज्ज ते जाणा सिंदळी। काळिमा काजळी पावविते ॥ ५ ॥ तुका ह्मणे तेथें विश्वास जतन। पुरे भीमास्नान सम पाय ६

१०२ उमा रमा एकी सरी[2]। वाराणसी ते पंढरी ॥ १ ॥ दोघे सारिखे सारिखे। विश्वनाथ विठ्ठल सखे ॥ २ ॥ तेथें असे भागीरथी। येथें जाणा भीमरथी ॥ ३ ॥ वाराणसी त्रिशुळावरी। सुदर्शनावरि पंढरी ॥ ४ ॥ मनकर्णिका मनोहर। चंद्रभागा सरोवर ॥ ५ ॥ वाराणसी भैरवकाळ। पुंडलीक क्षेत्रपाळ ६ धुंडिराज दंडपाणी। उभा गरुड कर जोडुनी ॥ ७ ॥ गया तेचि गोपाळपुर। प्रयाग निरानरसिंगपुर ॥ ८ ॥ तेथें असती गयावळ। येथें गाई आणि गोपाळ ॥ ९ ॥ शमीपत्र पिंड देती। येथें काला निजसुखप्राप्ति ॥१०॥ संतसज्जनीं केला काला। तुका प्रसाद लाधला ११

१०३ कार्तिकीचा सोहळा[3]। चला जाऊं

---

१ वैदिक ब्राह्मण. २ एकसारख्या. ३ उत्सवसमारंभ.

पाहूं डोळां । आलें वैकुंठ जवळां । पंढरीये सन्निध ॥ १ ॥ पीक पिकलें घुमरी । प्रेम न समाये अंबरीं[1] । अवघी मातली पंढरी । घरो-घरीं सुकाळ ॥ २ ॥ चालती स्थिर स्थिर । गरुडटकयांचे भार । गर्जती गंभीर । टाळ श्रुति मृदंग ॥ ३ ॥ मिळालिया भद्रजाती[2] । कैशा आनंदें डुलती । शूर उठावती । एका एक आगळे ॥ ४ ॥ नामामृत कल्लोळ । वृंदें कोंदलीं सकळ । आलें वैष्णवदळ । कळि-काळ कांपती ॥ ५ ॥ आस करिती ब्रह्मादिक । देखुनि वाळवंटींचें सुख । धन्य धन्य मृत्यु लोक । ह्मणती भाग्याचा कैसा ॥ ६ ॥ मरण मुक्ति वाराणसी । पितृऋण गया नासी । उ-धार नाहीं पंढरीसी । पायापाशीं विठोबा-च्या ॥ ७ ॥ तुका ह्मणे आतां । काय करणें आह्मां चिंता । सकळ सिद्धींचा दाता । तो सर्वथा नुपेक्षी[3] ॥ ८ ॥

---

१ आकाशांत. २ हत्ती. ३ त्याग करीत नाहीं.

# नाटाचे अभंग.

---:०:---

१ प्रथमारंभीं लंबोदर[1]। सकळ सिद्धींचा दातार। चतुर्भुज फरशधर। न कळे पार वर्णितां ॥ १ ॥ तो देव नटला गौरीबाळें। पायीं बांधोनी घागऱ्या घोळ। नारदतुंबरसहित मेळ। सुटला पळ विघ्नांसी ॥ २ ॥ नटारंभीं थाटियला रंग। भुजा नाचवी हालवी अंग। शेंदुरविलेपनें चांग। मुगुटीं नाग मिरविला ३ जया मानती देवऋषी मुनी। पाहातां न पुरे डोळियां धणी। असुर जयाच्या चरणीं। आदि अवसानीं तोचि एक ॥ ४ ॥ सकळां सिद्धींचा दातार। जयाच्या रूपा नाहीं पार। तुका ह्मणे आमुचा दातार। भवसागर तारील हा ५

२ श्रीअनंता मधुसूदना। पद्मनाभा[2] नारायणा। जगव्यापका जनार्दना। आनंदघना अविनाशा ॥ १ ॥ सकळदेवाधिदेवा। कृपाळुवा जी केशवा। महानंदा महानुभवा। स-

---

१ गणपती. २ कमल आहे नाभीच्या ठायीं ज्याच्या.

दाशिवा सहजरूपा ॥ २ ॥ चक्रधरा विश्वंभरा । गरुडध्वजा करुणाकरा । सहस्रपादा सहस्रकरा । क्षीरसागरा शेषशायना ॥ ३ ॥ कमलनयना कमळापती[1] । कामिनीमोहना मदनमूर्ती । भवतारका धरित्या क्षिती[2] । वामनमूर्ती त्रिविक्रमा ॥ ४ ॥ अगा ये सगुणा निर्गुणा । जगज्जनित्या जगज्जीवना । वसुदेवदेवकीनंदना । बाळरांगणा बाळकृष्णा ॥ ५ ॥ तुका आला लोटांगणीं । मज ठाव द्यावा जी चरणीं । हेचि करीतसें विनवणी । भवबंधनीं[3] सोडवावें ॥ ६ ॥

२ अगा ये सांवळ्या सगुणा । गुणनिधि नाम नारायणा । आमची परिसा विज्ञापना । सांभाळी दीना आपुलिया ॥ १ ॥ बहु या उदराचे कष्ट । आह्मांसी केलें कर्मभ्रष्ट । तुमची चुकविली वाट । करीं वटवट या निमित्त्यें ॥ २ ॥ जालों पांगिला जनासी । संसाराची आनंदणी दासी । न कळे कधीं सोडविसी । दृढ-

---

१ लक्ष्मीपती. २ पृथ्वी. ३ संसारबंधांतून.

पाशीं बहु बांधलों ॥ ३ ॥ येथें तों नये आठव कांहीं । विसावा तो क्षण एक नाहीं । पडिलों आणिके प्रवाहीं । हित तों कांहीं दिसेचि ना ॥ ४ ॥ जीवित्व वेंचिलें वियोगें । हिंडतां प्रवास वाउगे । कांहीं व्याधि पीडा रोगें । केलियाभोगें तडातोडी ॥ ५ ॥ माझा मीच जालों शत्रु । कैंचा पुत्र दारा कैंचा मित्रु । कासया घातला पसरु । अहो जगद्गुरु तुका ह्मणे ॥ ६ ॥

४ क्षीराब्धिवासा[1] शेषशायना । लीळाविग्रहा गोपिकारमणा । सगुणस्वरूप भक्तभूषणा । गुणनिधाना गुप्तरूपा ॥ १ ॥ अनंत अवतार धरितिया । अखंडस्वरूपा करुणालया । अमरपाळका देवराया । हरी भवभया भक्तांचिया ॥ २ ॥ सर्वव्यापका सर्वातीता । गजेंद्ररक्षका वैकुंठनाथा । भोळ्या भक्तांसी सौख्यदाता । तुजविण सर्वथा असेचि ना ॥ ३ ॥ चित्तचातका चैतन्यघना[2] । भक्त-

१ क्षीरसमुद्रीं वस्ती करणारा. २ चैतन्यरूप मेघ.

कैवारी असुरमर्दना । भक्ताभिमानी नाराय-
णा । जगज्जीवना पांडुरंगा ॥ ४ ॥ ब्रह्मादि-
कांचा निजजनिता । सकळकारण अकर्ता ।
अणुरेणुव्याप्यभरिता । पावन पतिता तुका
ह्मणे ॥ ५ ॥

५ वासुदेवा दीनानाथा । कमललोचना
श्रीअच्युता । निजभक्तांसी सौख्यदाता । तु-
जविण सर्वथा असेचि ना ॥ १ ॥ विठ्ठला
अनंता विश्वपती । विराट्स्वरूपा वामनमू-
र्ती । ब्रह्मादिकर्ता वैकुंठपती । अगम्यस्थिति
वेदशास्त्रां ॥ २ ॥ अद्वैतअखंडभरिता । विश्व-
बाहु अपरिमिता । विश्वचक्षु विश्वदेवता ।
आदिपिता ब्रह्मयाचा ॥ ३ ॥ भक्ताधीना भव[1]-
भयभंगा । परमपुरुषा पांडुरंगा । अनादि अ-
खिलअंतरंगा । संगा असंगा वेगळाचि ॥४॥
हें विराट्स्वरूप भोळिया भक्तांसी । सर्वथा
न कळे हृषीकेशी[2] । सगुणरूप धरूनी त्यांसी ।
लावो भजनासी तुका ह्मणे ॥ ५ ॥

---

१ संसारभय नाश करणारा. २ इंद्रियांचा नियंता.

६ देवा तूं आमचा कृपाळ। भक्तप्रतिपाळ दीनवत्सल। माय तूं माउली स्नेहाळ। भार सकळ चालविसी॥ १॥ तुज लागली सकळ चिंता। राखणें लागे वांकडें जातां। पुढती निरविसी[1] संता। नव्हे विसंबतां धीर तुज॥२॥आह्मां भय चिंता नाहीं धाक। जन्म मरण कांहींएक। जाला इहलोकीं परलोक। आलें सकळैक वैकुंठ ॥ ३ ॥ न कळे दिवस कीं राती। अखंड लागलीसे ज्योति। आनंदलहरींची गति। वर्णूं किती तया सुखा॥४॥ तुझिया नामाचीं भूषणें। तीं यें मज लेवविलीं लेणें[2]। तुका ह्मणे तुझिया गुणें। काय तें उणें एक आह्मां॥ ५॥

७ देवा तूं कृपाकरुणासिंधु। होसी मायबाप आमचा बंधु। जीवनसिद्धि साधनसिंधु। तोडिसी भवबंधु काळपाश॥ १॥ शरणागता वज्रपंजर। अभयदाना तूं उदार। सकळां देवा तूं अगोचर। होसी अविकार

---

१ स्वाधीन करितोस. २ अलंकार.

अविनाश ॥२॥ भागलीं[1] स्तुति करितां फार। तेथें मी काय तें गव्हार[2]। जाणावया तुझा हा विचार। नको अंतर देऊं आतां ॥ ३ ॥ नेणें भाव परि ह्मणवीं तुझा। नेणें भक्ति परि करितों पूजा। आपुल्या नामाचिया काजा। तुज केशीराजा[3] लागे धांवणें ॥ ४ ॥ तुझिया बळें पंढरीनाथा। जालों निर्भर तुटली व्यथा। घातला भार तुझिया माथां। न भीं सर्वथा तुका ह्मणे ॥ ५ ॥

८ ऐसी हे गर्जवूं वैखरी। केशव मुकुंद मुरारी। राम कृष्ण नामें बरीं। हरी हरी दोष सकळ ॥ १ ॥ जनार्दना जगजीवना। विराट्स्वरूपा वामना। महदादि मधुसूदना। भवबंधना तोडितिया ॥ २ ॥ चक्रपाणी गदाधरा। असुरमर्दना वीर्यवीरा। सकळांमुगुटमणि शूरा। अहो दातारा जगदानिया॥ ३ ॥ मदनमूर्ती मनमोहना। गोपाळगोपिकारमणा। नटनाट्यकौशल्य कान्हा। अहो संपन्ना

---

१ श्रमलीं. २ अज्ञानी. ३ केशी नामक दैत्य मारणारा.

सर्वगुणें ॥ ४ ॥ गुणवंता आणि
र्वसाक्षी आणि सर्वजाणा[1] । करो
आपणा । नेदी अभिमाना आतळों
सयानें घडे याची सेवा । काय
या देवा । वश्य तो नव्हे वांचू
पाय जीवावेगळे न करी तुका ॥

९ विठ्ठल भीमातीरवासी । विठ्ठ
निवासी । विठ्ठल पुंडलिकापाशीं
नाशीं उदार ॥ १ ॥ विठ्ठल स्मर
ळा । विठ्ठल गौरवीं[2] आगळा । आ
डा सकळा । विठ्ठल लीला[3]विग्रही
भाचि परि न मानी शीण । नाहीं
भिन्न । समर्थाचे घरीं एकचि अन्न
ता क्षणोक्षणा सांभाळी ॥ ३ ॥ रुच
र । आणिताती आदरें । कोठेंही
तर । थोरां थोर धाकुट्यां धाकुट
करितां बळ धरितां नये । झोंबतां
नेंच होय । आपुल्या उद्देशाची सो

---

१ सर्व जाणणारा सर्वज्ञ. २ श्रेष्ठपणा. ३ ली

हृदयनिवासी ॥ ५ ॥ पान्हा तरी आल्या अंतर तेथें । तों नाहीं भरिलें रितें । करितों सेवन आइतें । तुका चित्तें चित्त मेळवूनी ॥६॥

१० तुळसीमाळा घालुनी कंठीं । उभा विटेवरी जगजेठी । अवलोकोनी पुंडलीका दृष्टी । असे भीमातटीं पंढरीराय ॥ १ ॥ भुक्तिमुक्ति जयाच्या कामारी[1] । रिद्धिसिद्धि वोळंगती द्वारीं । सुदर्शन घरटी करी । काळ कांपे दुरी धाकें तया ॥ २ ॥ जगज्जननी असे वामभागीं[2] । भीमकी शोभली अर्धांगीं । जैसी विद्युल्लता झळके मेघीं । दरुषणें भंगी महा दोष ॥ ३ ॥ सुखसागर परमानंदु । गोपीगोपाळां गोधनां छंदु । पक्षिश्वापदां जयाचा वेधु[3] । वाहे गोविंदु पांवा छंदें ॥ ४ ॥ मुखमंडित चतुर्भुजा । मनमोहन गरुडध्वजा । तुका ह्मणे स्वामी माझा । पावे भक्तकाजा लवलाहीं ॥ ५ ॥

११ बरवें जालें आलों जन्मासी । जोड

१ दासी. २ डाव्या भागीं. ३ घ्यास.

जोडिली मनुष्य देहा ऐसी । महालाभाची उत्तम रासी । जेणें सर्व सुखासी पात्र होइजे ॥ १ ॥ दिलीं इंद्रियें हात पाय कान । डोळे मुख बोलावया वचन । जेणें तूं जोडसी नारायण । नासे जीवपण भवरोग ॥ २ ॥ तिळें-तिळ पुण्य सांचा पडे । तरी हें बहुतां जन्मीं जोडे । नाम तुझें वाचेसी आतुडे[1] । समागम घडे संतांचा ॥ ३ ॥ ऐसिये पावविलों ठायीं । आतां मी काई होऊं उतराई[2] । येवढा जीव ठेवीन पायीं । तूं माझे आई पांडुरंगे ॥ ४ ॥ फेडियेला डोळियांचा कवळ । धुतला गुण-दोषांचा मळ । लावूनि स्तनीं केलों शीतळ । निजविलों बाळ निजस्थानीं ॥ ५ ॥ नाहीं या आनंदासी जोडा । सांगतां गोष्टी लागती गोडा । आलासी आकारा आमुच्या चाडों[3] । तुका ह्मणे भिडा भक्ताचिया ॥ ६ ॥

१२ बरें जालें आजीवरी । नाहीं पडिलों मृत्यूचे आहारीं । वांचोन आलों एथवरी ।

---

१ येतें. २ प्रत्युपकार करणें. ३ गरजेनें.

उरलें तें हरी तुह्मां समर्पण ॥ १ ॥ दिला या काळें अवकाश । नाहीं पावलें आयुष्य नाश । कार्या कारण उरलें शेष । गेलें तें भूस जावो परतें ॥ २ ॥ बुडणें खोटें पावतां थडी । स्वप्नीं जाली ओढाओढी । नासली जागृतीची घडी। साच जोडी शेवटीं गोड घास ॥३॥ तुह्मांसी पावविली हांक । तेणें निरसला धाक । तुमचें भातें हें कवतुक । जें शरणागत लोक रक्षावे ॥ ४ ॥ रवीच्या नांवें निशीचा नाश । उदय होतांचि प्रकाश । आतां कैंचा आह्मां दोष । तूं जगदीश कैवारी ॥ ५ ॥ आतां जळो देह सुख दंभ मान । न करी यांचें साधन । तूं जगदीश नारायण । आलों शरण तुका ह्मणे ॥ ६ ॥

१३ मागुता हाचि जन्म पावसी । भोगिलें सुखदुःख जाणसी । हें तों न घडे रे सोंयासीं । कां रे अंध होसी जाणोनियां ॥ १ ॥ लक्ष चौऱ्यांशी न चुके फेरा । गर्भवासीं या-

१ भीति. २ रात्रीचा. ३ कष्टांनीं.

तना थोरा । येऊनी पडसी संदेहपुरीं । वों-
ळसा थोरा मायाजाळीं ॥ २ ॥ पशु काय
पापपुण्य जाणती । उत्तम मध्यम भोग भोगि-
ती । कांहीं एक उपजतां मरती । बहिरीं अं-
ध होतां पांगुळ मुकीं ॥ ३ ॥ नरदेह निधान
लागलें हातीं । उत्तम सार उत्तम गति ।
होईन देवचि ह्मणती ते होती । तरि कां चि-
त्तीं न धरावें ॥ ४ ॥ क्षण एक मन स्थिर क-
रूनी । सावध होई डोळे उघडोनी । पाहे वे-
द बोलिले पुराणीं । तुका विनवणी करी-
तसे ॥ ५ ॥

१४ जंव हें सकळ सिद्ध आहे । हात चा-
लावया पाये । तंव तूं आपुलें स्वहित पाहे ।
तीर्थयात्रे जायें चुकों नको ॥१॥ जंव काळ असे
दुरी ठेला । तंव तूं हरिगुण गाये आइक व-
हिलों । मनीं भाव धरूनि भला । न वचे त्या-
ला चुकों नको ॥ २ ॥ जोडोनी धन न घा-
लीं माती । ब्रह्मवृंदें पूजना येती । सत्य आचरण

१ संशय. २ ठेवा. ३ सर्वभूतीं देव. ४ त्वरेनें.

दया भूतीं । करी सांगाती चुकों नको ॥ ३ ॥ दशा यौवेन बाणली अंगीं । पांगिला नव्हे विषयसंगीं । काम क्रोध लोभ मोह त्यागीं । राहे संतसंगीं चुकों नको ॥ ४ ॥ मग तेथें न चले कांहीं । सत्ता संपदा राहेल ठायींच्या ठायीं । पुढें संचित जाईल ग्वाही । तुका ह्मणे तेही यमआज्ञा ॥ ५ ॥

१५ शरीर दुःखांचें कोठार । शरीर रोगांचें भांडार । शरीर दुर्गंधीची थांर । नाहीं अपवित्र शरीरा ऐसें ॥ १ ॥ शरीर उत्तम चांगलें । शरीर सुखाचें घोसुलें । शरीरें साध्य होय केलें । शरीरें साधलें परब्रह्म ॥२॥ शरीर विटाळाचें आळें । मायामोहपाशजाळें । पतन शरीराच्या मुळें । शरीर काळें व्यापिलें ॥ ३ ॥ शरीर सकळही शुद्ध । शरीर निधींचाही निध । शरीरें तुटे भवबंधें । वसे मध्यभागीं देव शरीरा ॥ ४ ॥ शरीर अविद्येचा बांधा । शरीर अवगुणांचा रांधा ।

१ समागम. २ तारुण्य. ३ आश्रय. ४ संसारबंध.

शरीरीं वसे बहुत बाधा । नाहीं गुण सुधा[1] एक शरीरीं ॥ ५ ॥ शरीरा सुख नेदावा भोग । न द्यावें दुःख न करी त्याग । नव्हे वोखटें[2] ना चांग । तुका ह्मणे वेग करी हरिभजनीं ॥ ६ ॥

१६ बहुत जाचलों संसारीं । वसें गर्भीं मातेच्या उदरीं । लक्ष चौऱ्याशी योनिद्वारीं । जालों भिकारी याचक ॥ १ ॥ जिणें पराधीन आणिकां हातीं । दृढ पाशीं बांधलों संचितीं । प्रारब्ध क्रियमाण सांगातीं[3] । भोवंडिती सत्ता आपुलिया ॥ २ ॥ न भरे पोट नाहीं विसांवा । नाहीं नेम एक ठाव गांवा । नाहीं सत्ता न फिरे ऐसी देवा । लाही जीवा खापरीं तडफडी ॥ ३ ॥ काळ बहुत गेले ऐसिया रीती । आणीक पुढेंही नेणों किती । खंडणा[4] नाहीं पुनरावृत्ति । मज कल्पांतीं तरी वेगळें ॥ ४ ॥ ऐसें दुःख कोण हरील माझें । कोणा भार घालूं आपुलें ओझें । भव-

१ चांगला. २ वाईट. ३ सोबती. ४ नाश.

सिंधुवारक नाम तुझें । धांवसी काजें आड-
लिया ॥ ५ ॥ आतां धांव घालीं नारायणा ।
मजकारणें रंका दीना । गुण न विचारी अ-
वगुणा । तुका करुणा भाकीतसे ॥ ६ ॥

१७ संसारसिंधु हा दुस्तर । नुल्लंघवे उ-
ल्लंघितां पार । बहुत वाहाविले दूर । न लगे-
चि तीर पैलथडी ॥ १ ॥ किती जन्म जाला
फेरा । गणित नाहीं जी दातारा । पडिलों
आवर्ती भोंवरा । बहुता थोरा वोळसिया २
वाढलों परि नेणती बुद्धि । नाहीं परतली
धरिली शुद्धि । मग म्यां विचारावें कधीं ।
ऐसी संधि सांडूनियां ॥ ३ ॥ अनेक खाणीं
आहार निद्रा । भयमैथुनाचाचि थारा । बा-
ळत्व तारुण्य जरा । प्रधान पुरा भोग तेथें ४
ऐसीं उल्लंघूनि आलों स्थळें । बहु भोंवांडिलों
काळें । आतां हें उगवावें जाळें । उजेडाचे
बळें दिवसाच्या ॥ ५ ॥ सांडीन या संसारा-
ची वाट । येणें भोगविलें बहु कष्ट । दावीसत्या

---

१ तारणारें. २ ह्मातारपण. ३ फिरलों.

ऐसें नष्ट । तुका ह्मणे भ्रष्ट जालों देवद्रोही ६

१८ विषयओढीं भुलले जीव । आतां यां-
ची कोण करील कींव । नुपजे नारायणीं
भाँव । पावोनी ठाव नरदेह ॥ १ ॥ कोण सु-
ख धरिलें संसारीं । पडोनी काळाचे आहा-
रीं । माप या लागलें शरीरीं । जालियावरी
सळे ओढिती ॥ २ ॥ बापुडीं होतील शेवटीं ।
आयुष्यासवें जालिया तुटी । भोगिलीं मागें
पुढेंही कोटी । होईल भेटी जन्मासी ॥ ३ ॥
जुंतिले घाणां बांधोनि डोळे । मागें जोडी
आर तेणेंही पोळे । चालिलों किती तें न क-
ळे । दुःखें आरंबळे भूक तान्हें ॥ ४ ॥ एवढें
जयाचें निमित्त । प्रारब्ध क्रियमाण संचित ।
तें हें देह मानूनी अनित्यं । न करिती नित्य
नामस्मरण ॥५॥ तुका ह्मणे न वेंचतां मोल ।
तो हा यांसी महाग विठ्ठल । वेंचितां फुकाचेचि
बोल । केवढें खोल अभागिया ॥ ६ ॥

१९ इतुलें करीं भलत्या परी । परद्रव्य

---

१ भक्ति, श्रद्धा. २ जुंपले. ३ होरपळे. ४ नाशिवंत.

परनारी । सांडुनी अभिलाष अंतरीं । वर्ते वेव्हारीं सुखरूप ॥ १ ॥ न करी दंभाचा सायास । शांति राहे बहुवस । जिव्हे सेवी सुगंधरस । न करी आळस रामनामीं ॥ २ ॥ जनमित्र होई सकळांचा । अशुभ न बोलावी वाचा । संग न धरावा दुर्जनाचा । करी संतांचा सायासें ॥ ३ ॥ करिसी देवाविण आसें । अवघी होईल निरास । तृष्णा वाढविसी बहुवस । कधीं सुखास न पवसी ॥४॥ धरूनी विश्वास करी धीर । कर्ता देव हाचि निर्धार । तयाचा वाहे योगक्षेमभार । नाहीं अंतर तुका ह्मणे ॥ ५ ॥

२० कैसी करूं तुझी सेवा । ऐसें सांगावें जी देवा । कैसा आणूं अनुभवा । होशी ठावा कैशापरी ॥ १ ॥ कर्मभ्रष्ट माझें मन । नेणें जप तप अनुष्ठान । नाहीं इंद्रियांसी दमन । नव्हे मन एकविध ॥ २ ॥ नेणें यातीचा आचार । नेणें भक्तीचा विचार । मज नाहीं सं-

---

१ धर्माचा ध्वज लावणें. २ आशा.

तांचा आधार। नाहीं स्थिर बुद्धि माझी ॥ ॥ ३ ॥ न सुटे मायाजाळ। नाहीं वैराग्याचें बळ। न जिंकवती सबळ[1]। काम क्रोध शरीरीं ॥ ४ ॥ आतां राख कैसें तरी। नुपेक्षावें[2] हरी। तुझीं ब्रीदें चराचरीं। तैसीं साच करीं तुका ह्मणे ॥ ५ ॥

२१ काय आह्मी भक्ति करणें कैसी। काय एक वाहावें तुह्मांसी। अवघा भरोनी उरलासी। वांणीं[3] खाणीं रसीं रूपीं गंधीं ॥ १ ॥ कैसें करूं इंद्रियां बंधन। पुण्यपापाचें खंडण। काय व्रत करूं आचरण। काय तुजविण उरलें तें ॥ २ ॥ काय डोळे झांकूनियां पाहूं। मंत्रजप काय ध्याऊं। कवणे ठायीं धरूनि भाव। काय तें वांव[4] तुजविण ॥ ३ ॥ काय हिंडों कवण दिशा। कवणे ठायीं पाय ठेवूं कैसा। काय तूं नव्हेसी न कळे ऐसा। काय मी कैसा पाहों आतां ॥ ४ ॥ तुझिया नामाची सकळ। पूजा अर्चन मंत्र माळ। धूप

१ बलवान. २ न त्यागावें. ३ शब्दांत ४ व्यर्थ.

दीप नैवेद्य फळ तांबूल । वाहूं पुष्पांजुळ तु-
का ह्मणे ॥ ५ ॥

२२ आले हो संसारा तुह्मी एक करा ।
मुक्तिमारग हळूचि धरा । काळदंड कुंभया-
तना थोरा । कां रे अघोरा द्चकेसी ना ॥
॥ १ ॥ नाहीं त्या यमासी करुणा । बाहेर का-
ढितां कुंडी प्राणा । ओढाळ सांपडे जैं धा-
न्या । चोर यातना धरिजेतां ॥ २ ॥ नाहीं दि-
लें पावेल कैसा । चालतां पंथ तेणें बळसा ।
नसेल ठाऊकें ऐकतो कैसा । नेती बंद जैसा
धरोनियां ॥ ३ ॥ क्षण एक नागीवों पायीं ।
न चलवे तया करितां कांहीं । ओढिती कांटे-
वणा सोई । अग्निस्तंभीं बाहीं कवटाळविती
॥ ४ ॥ देखोनी अंगें कांपती । तेथें नदीमाजीं
चालविती । लागे ठाव न लगे बुडविती ।
वरी मारिती यमदंड ॥५॥ ताहानभूक न सा-
हावे वेळ। तो राखिती कितीएक काळ । पिंड
पाळुनी कैसा सीवळ । तो तप्तभूमीं ज्वाळ

१ भीत नाहींस. २ देह. ३ नग्न. ४ कांट्यांतून.

लोळविती ॥ ६ ॥ ह्मणउनी करा कांहीं सा-
यास । व्हावेल तर व्हारे उदास । करवेल
तर करा नामघोष । सेवा भक्तिरस तुका
ह्मणे ॥ ७ ॥

२३ हेंचि भव[1]रोगाचें औषध । जन्म जरा
तुटे व्याध । आणीक कांहीं नव्हे बाध । क-
रील वध षड्वर्गा[2] ॥ १ ॥ सांवळे रूप ल्यावें
डोळां । सा चौ अठरांचा मोळा । पद्र ला-
गों नेदी खळा । नाममंत्रमाळा विष्णुसहस्र
॥ २ ॥ भोजना न द्यावें अन्न । जेणें चुके अनु-
पान । तरीच घेतल्याचा गुण । होईल जाण
सत्यभाव ॥ ३ ॥ नये निघों आपुलिया घरा ।
बाहेर लागों नये वारा । बहु बोलणें तें सारा ।
संग दुसरा वर्जावा ॥ ४ ॥ यास तें एक द्या-
वें वरी । नवनीताची होईल परी । होईल घु-
सळिलें तें निवारी । सार भीतरीं नाहीं त-
या ॥ ५ ॥ न्हाये अनुतापीं पांघरे दिशा । स्वे-
द निघों दे अवघी आशा । होसील मागें हो-

१ संसार. २ काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर.

तासी तैसा । तुका ह्मणे दशा भोगी वैराग्य६

२४ अवघ्या दशा येणें साधती । मुख्य उपासना सगुणभक्ति । प्रगटे हृदयींची मूर्ति । भावशुद्धि[1] जाणोनियां ॥ १ ॥ बीज आणि फळ हरीचें नाम । सकळ पुण्य सकळ धर्म । सकळां कळांचें हें वर्म । निवारी श्रम सकळही ॥ २ ॥ जेथें कीर्तन हें नामघोष । करिती निर्लज्ज हरीचे दास । सकळ वोथंबले[2] रसें[3] । तुटती पाश भवबंधाचे ॥ ३ ॥ येती अंगा वसती लक्षणें । अंतरीं[4] देवें धरिलें ठाणें । आपणाचि येती तयाचे गुणें । जाणें येणें खुंटे वस्तींचें ॥ ४ ॥ न लगे सांडावा आश्रम । उपजले कुळींचे धर्म । आणीक न करावे श्रम । एक पुरे नाम विठोबाचें ॥ ५ ॥ वेदपुरुष नारायण । योगियांचें ब्रह्म शून्य । मुक्ता आत्मा परिपूर्ण । तुका ह्मणे सगुण भोळ्या आह्मां ॥ ६ ॥

२५ होतों तें चिंतीत मानसीं । नवस फ-

१ चित्तशुद्धि. २ भरलें. ३ शांतरस. ४ अंत:करणांत.

ळले नवसीं । जोडिते नारायणा ऐसी । अविट ज्यासी नाश नाहीं ॥ १ ॥ धरिले जीवीं[1] न सोडी पाय । आलें या जीवित्वाचें काय । कैं हे पाहिजेती ठाय । लाविली सोय संचितानें ॥ २ ॥ मज तों पडियेली होती भुली[2] । चित्ताची अपसव्य चाली । होती मृगजळें गोंवी केली । दृष्टि उघडली बरें जालें ॥ ३ ॥ आतां हा सिद्धी पावो भाव । मध्यें चांचल्यें न व्हावा जीव । ऐसी तुह्मां भाकीतसें कींव । कृपाळुवा जगदानिया ॥ ४ ॥ कळों येतें आपुलें बुद्धी । ऐसें तों न घडतें कधीं । केवढे आघात ते मधीं । लज्जा रिद्धी उभी आड ठाके[3] ॥ ५ ॥ कृपा या केली संतजनीं । माझी अळंकारिली वाणी । प्रीति हे लाविली कीर्तनीं । तुका चरणीं लोळतसे ॥ ६ ॥

२६ चांगलें नाम गोमटें[4] रूप । निवती डोळे हरती ताप । विठ्ठल विठ्ठल हा जप । प्रगट स्वल्प अति सार ॥ १ ॥ शस्त्र हें निर्वाणींचा

१ अंतःकरणांत. २ भ्रांती. ३ राही. ४ सुंदर.

बाण । निकट समय अवसान । कोठें योजेल दशदान । खंडी नारायण दुःख चिंतनें ॥ २ ॥ सकळ श्रेष्ठांचें मत । पावे सिद्धी पाववी अनंत । ह्मणोनी व्हावें शरणागत । आहे उचित पवर्डेच्चि ॥ ३ ॥ ह्मणोनी रुसलों संसारा । सर्प विखार हा पांढरा । तुजशीं अंतर रे दातारा । याच्चि दावेदारानिमित्त ॥ ४ ॥ येणें मज भोगविल्या खाणी । नसता छंद लाविला मनीं । माजलों मी माझे भ्रमणीं । जाली बोडणी विटंबना ॥ ५ ॥ पावलों केलियाचा दंड । खाणी भोगिल्या उदंड । आतां केला पाहिजे खंड । तुका दंडवत घाली देवा ॥ ६ ॥

२७ अखंडक्षीराब्धी भरितें आलें । अध्यात्मविद्येचें भांडार उघडिलें । सूर्यकोटीस तेज फांकलें । ध्यानीं प्रगटलें भक्तांच्चिया ॥ १ ॥ अनादि ब्रह्मज्ञानाचें गुज । श्रवणीं अवचित पडिलें सहज । परम निर्वाणाचें बीज । गुंडाळिलें निज सर्वभाग्यं ॥ २ ॥ मंत्र महामंत्र

१ योग्य. २ झाड, पक्षी, पशु, मनुष्य. ३ फजिती.

मंगळनिधि । सत्संगदर्शन प्रगटलें आधीं । वैराग्यविवेकाची बुद्धि । नामामृतसिद्धी साधिलें तें ॥ ३ ॥ क्षमा दया शांतीचें निजसुख । सच्चित्सुखें वोळला[1] पुंडलीक । अनंतसुखाचा हारिख । उगवला देख पंढरिये ॥ ४ ॥ नेणें भावभक्तीची निरपेक्षता[2] । नेणें भूतदयेची ममता । तुका ह्मणे पंढरीनाथा । संग साधुसंतां देई आतां ॥ ५ ॥

२८ हरि तैसे हरीचे दास । नाहीं तयां भय मोह चिंता आस । होऊनि राहाती उदास । बळकट कांस भक्तीची ॥ १ ॥ धरूनि पाय त्यजिलें जन । न लगे मान मृत्तिका धन । कंठीं नामामृताचें पान । न लगे आन ऐसें जालें ॥ २ ॥ वांव[3] तरी उदंडच पोटीं । धीर सिंधु ऐसे जगजेठी । कामक्रोधा न सुटे मिठी । गि-हे तरी वेठीं राबविती ॥ ३ ॥ बळें तरी नागवती काळा । लीन तरी सकळांच्या तळा । उदार देहासी सकळां । जाणोनी कळा सर्व

१ प्राप्त झाला. २ निराशा, निरिच्छा. ३ मोकळी जागा.

नेणते ॥ ४ ॥ संसार तो तयांचा दास । मोक्ष तो पाहातसे वास[1] । रिद्धिसिद्धि देशवटा त्रास । न शिवती यास वैष्णवजन ॥ ५ ॥ जन्ममृत्युस्वप्नांसारिखें । आप[2] त्यां न दिसे पारखें । तुका ह्मणे अखंडित सुखें । वाणी वदे मुखें प्रेमामृताची ॥ ६ ॥

२९. मज ते हांसतील संत । जींहीं देखिलेती मूर्तिमंत । ह्मणोनी उद्वेगलें[3] चित्त । आहाच भक्त ऐसा दिसें ॥ १ ॥ ध्यानीं त्यां वर्णावेती कैसे । पुढें एकीं स्तुति केली असे । तेथूनी जीव निघत नसे । ऐसिये आसे लागलोंसें ॥ २ ॥ कासया पाडिला जी धडा । उगाचि वेडा आणि वांकडा । आह्मां लेंकरांसी पीडा । एक मागें जोडा दुसऱ्याचा ॥ ३ ॥ सांगा कोणाचा अन्याय । ऐसें मी धरीतसें पाय । तूं तंव समेंचि[4] सकळां माय । काय अन्याय एक माझा ॥ ४ ॥ नये हा जरी कारणा । तरी कां व्यालेती नारायणा । वच-

1 स्थान. २ आपण. ३ खिन्न झालें. ४ सारखी.

न द्यावें जी वचना । मज अज्ञाना समजावी ॥ ५ ॥ बहुत दिवस केला बोभाट । पाहतां श्रमलों ते वाट । तुका ह्मणे विस्तारलें ताट । काय वीट आला नेणों स्वामी ॥ ६ ॥

३० कां हो माझा मानियेला भार । ऐसा दिसतसे फार । अनंत पावविलीं उद्धार । न्हेचि थार[1] मज शेवटीं ॥ १ ॥ पाप बळिवंत गाढें । तुजही राहो सकतें पुढें । मागील कांहीं राहिलें ओढें । नवल केवढें देखियेलें ॥ २ ॥ काय मानिती संतजन । तुमचे हीनत्ववचन । कीं वृद्ध[2] जाला नारायण । न चले पण आधीलें[3] तो ॥ ३ ॥ आतां न करावी चोरी । बहुत न धरावें दुरी । पडदा काय घरच्या घरीं । धरिलें दुरी तेव्हां धरिलें ॥ ४ ॥ नको चाळवूं अनंता । कासया होतोसी नेणता । काय तूं नाहीं धरीत सत्ता । तुका ह्मणे आतां होई प्रगट ॥ ५ ॥

३१ दास्य करी दासाचें । उणें न साहे

१ आश्रय. २ ज्ञातारा. ३ अधीर.

तयाचें । वाढिलें ठायींचें । भाणें टाकोनिया धांवे ॥ १ ॥ ऐसा कृपेचा सावर । विटे उभा कटीं कर । सर्वस्वें उदार । भक्तांलागीं प्रगटे ॥ २ ॥ हृदयीं श्रीवत्सलांछन । मिरवी भक्तांचें भूषण । नाहीं तयाचा शीण । सुख धरिलें लातेचें ॥ ३ ॥ सत्यभामा दान करी । हुजुर नाहीं अंगीकारी । सेवकाच्या शिरीं । धरूनी चाले पादुका[2] ॥ ४ ॥ राखे दारवंटा[3] बळीचा । सारथी जाला अर्जुनाचा । दास सेवकांचा । होय साचा अंकित ॥५॥ भिडे न बोलवे पुंडलीकाशीं । उभा मर्यादा पाठीशीं । तुका ह्मणे ऐसी । कां रे न भजा माउली ॥ ६ ॥

३२ चांगला तरी पूर्णकाम । गोड तरी याचेंचि नाम । दयाळू तरी अवघा धर्म । भला तरी दासा श्रम होऊं नेदी ॥ १ ॥ उदार तरी लक्ष्मीयेसी । झुंझार तरी कळीकाळासी । चतुर तरी गुणांचीच्च रासी । जाणता तयासी तो एक ॥ २ ॥ जुनाट तरी बहु काळा ।

---

१ अन्नानें युक्ताट. २ खडावा. ३ द्वार.

न कळे जयाची लीळा। नेणता गोवळी गो-
वळा। लाघवी अबळा भुलवणा[1] ॥ ३ ॥ गां-
ढ्या तरी भावाचा अंकित। बराडी तरी उच्छि-
ष्टाची प्रीत। ओंगळ तरी कुब्जेशीं रत।
भ्याड अनंत बहु पापा ॥ ४ ॥ खेळ तो येणें-
चि खेळावा। नट तो येणेंचि अवगावा।
लपोनि जीवीं न कळे जीवा। धरितां देवा
नातुडसी ॥ ५ ॥ उंच तरी बहुतची उंच।
नीच तरी बहुतची नीच। तुका ह्मणे बोलि-
लों साच। नाहीं अहाचें[2] पूजा केली॥ ६ ॥

३३ तूंचि अनाथाचा दाता। दुःख मोह
नासावया चिंता। शरण आलों तुज आतां।
तारीं कृपावंता मायबापा ॥ १ ॥ संतसंगति
देईं चरणसेवा। जेणें तुझा विसर न पडावा।
हाच भाव[3] माझिया जीवा। पुरवीं देवा मनो-
रथ ॥ २ ॥ मज भाव प्रेम देईं प्रीति। गुण
नाम वर्णावया स्तुति। विघ्ना सोडवूनी हा-
तीं। विनंति माझी परिसावी हे ॥ ३ ॥ आ-

१ भुलवणारा. २ व्यर्थ. ३ इच्छा.

णीक कांहीं नाहीं मागणें । सुखसंपत्तिराज्य-
चाड धनें । सांकडें न पडे तुज जेणें । दुजें
भक्तीविण मायबापा ॥ ४ ॥ जोडोनिया कर
पायीं ठेविला माथा । तुका विनवी पंढरीना-
था । रंगीं वोडवावी रंगकथा । पुरवी मनो-
रथा माझिया ॥ ५ ॥

३४ तुझिया पार नाहीं गुणां । माझी अ-
ल्प मति नारायणा । भवतारका जी सुजाणा[1]
एक विज्ञापना पायांपाशीं ॥ १ ॥ काय जा-
णावें म्यां दीनें । तुझिये भक्तीचीं लक्षणें । घ-
ड तें तोंड धुऊं नेणें । परि चिंतनें काळ सा[2]-
रीं ॥ २ ॥ न लवी आणीक कांहीं पिसें । मा-
झिया मना वांयां जाय ऐसें । चालवी आपु-
ल्या प्रकाशें । हातीं सरिसें धरोनियां ॥ ३ ॥
तुज समर्पिली काया । जीवेंभावें पंढरीराया।
सांभाळी समविषमें[3] डाया । करी छाया कृपे-
ची ॥ ४ ॥ चतुर तरी चतुरां राव । जाणता
तरी जीवांचा जीव । न्यून तो कोण एक ठा-

---

१ चांगला ज्ञाता. २ घालवीं. ३ चांगला वाईट प्रसंग.

व । आरुष[1] भाव परि माझा ॥ ५ ॥ होतें तें माझें भांडवल । पायांपें निवेदिलें बोल । आदरा ऐसें पाविजे मोल । तुका ह्मणे साच फोल तूं जाणसी ॥ ६ ॥

३५ बरवें जालें लागलों कारणीं । तुमचे राहिलों चरणीं । फेडीन संतसंगती धणी[2] । गर्जईल गुणीं वैखरी ॥ १ ॥ न वंचे शरीर सेवेसी । काया वाचा आणि मनेंसीं । जालों संतांची आंदणी दासी । केला याविशीं निर्धार ॥ २ ॥ जीवनीं राखिला जिव्हाळा । जालों मी मजसी निराळा । पंचभूतांचा पुतळा । सहज लीळा वर्ततसे ॥ ३ ॥ जयाचें तया होईल ठावें । लौहो[3] या साधियेला भावें । ऐसें होतें राखियलें जीवें । येथूनी देवें भोवडिलें ॥ ४ ॥ आस निरसली ये खेपे । अवघे पंथ जाले सोपे । तुमचे दीनबंधु कृपें । दुसरें कांपे सत्ताधाकें ॥ ५ ॥ अंकिलेपणें आनंदरूप । आतळों[4] नये पुण्य पाप । सारूनि

१ भोळा भाव. २ तृप्ती. ३ इच्छा. ४ गुंतों नये.

ठेविले संकल्प । तुका ह्मणे आपेआप एका-एकीं ॥ ६ ॥

३६ न पवे सन्निध वाटते चिंता । वरि या बहुतांची सत्ता । नुगवे पडत जातो गुंता । कर्मी बळिवंता सांपडलों ॥ १ ॥ बहु भार प-डियेला शिरीं । मी[1] हें माझें मजवरी । उघ-ड्या नागविलों[2] चोरीं । घरिंच्याघरीं जाणत जाणतां ॥ २ ॥ तुज मागणें इतुलें आतां । म-ज या निरवावें[3] संतां । जाला कंठस्फोट आ-ळवितां । उदास आतां न करावें ॥ ३ ॥ अ-ति हा निकट समय । मग म्यां करावें तें का-य । दिवस गेलिया टाकील छाय । उरील हाय रातीकाळीं ॥ ४ ॥ होईल संचिताची सत्ता । अंगा येईल पराधीनता । ठाव तो न दिसे लपतां । बहुत चिंता प्रवर्तली ॥ ५ ॥ ऐसी या संकटाचे संधी । धांव घालावी कृ-पानिधी । तुका ह्मणे माझी बळबुद्धि । सक-ळ सिद्धि पाय तुझे ॥ ६ ॥

---

१ अहंता व ममता. २ लुटला गेलों. ३ स्वाधीन करावें.

३७ सर्व सुखाचिया आशा जन्म गेला । क्षण एक मुक्ती यत्न नाहीं केला। हिंडतां दिशा शीण पावला । माया वेष्टिला जीव माझा १ माझें स्वहित नेणती कोणी । कांहीं न करितां मजवांचूनी । सज्जन तंव सुखमांडणी । नेणती कोणी आदि अंत ॥ २ ॥ काय सांगों गर्भींची यातना । मज भोगितां नारायणा । मांस मळमूत्र जाणा । तुज क्षणक्षणा ध्यात असे ॥ ३ ॥ मज चालतां प्रयाणकाळीं[1] । असतां न दिसती जवळी । मृत्तिके मृत्तिका कवळी । एकले मेळीं संचिताचे ॥ ४ ॥ आतां मज ऐसें करी गा देवा । कांहीं घडे तुझी चरणसेवा । तुका विनवितसे केशवा । चालवी दावा[2] संसारें ॥ ५ ॥

३८ तरि म्यां आळवावें[3] कोणा । कोण पुरवील वासना । तुजवांचूनी नारायणा । लावी स्तना कृपावंते ॥ १ ॥ आपुला न विचारी शीण । न धरी अंगसंगें भिन्न । अंगी-

१ मरणप्रसंगीं. २ वैर. ३ धांवा करणें.

कारिलें राखे दीन । देई जीवदान आवडीचें ॥ २ ॥ माझिया मनासीं हे आस । नित्य सेवावा ब्रह्मरस[1] । अखंड चरणींचा वास । पुरवी आस याचकाची ॥ ३ ॥ माझिया संचिताचा ठेवा । तेणें हे वाट दाविली देवा । एवढ्या आदराचा हेवा । मागें सेवादान आवडीनें ॥ ४ ॥ आळवीन करुणावचनीं । आणीक गोड न लगे मनीं । निद्रा जागृति आणि स्वप्नीं । धरिलें ध्यानीं मनीं रूप ॥ ५ ॥ आतां भेट न भेटतां आहे । किंवा नाहीं ऐसें विचारूनि पाहें । लागला झरा अखंड आहे । तुका ह्मणे साहे केलें अंतरीं ॥ ६ ॥

३९ कोण सुख धरोनी संसारीं । राहों सांग मज बा हरी । अवघ्या नाशिवंता पैरी[2] । थिता दुरी तूंही अंतरसी ॥ १ ॥ प्रथम केला गर्भी वास । काय ते सांगावे सायास । दुःख भोगिलें नवही मास । आलों जन्मास येथवरी ॥ २ ॥ बाळपण गेलें नेणतां[3] । तारुण्यद-

१ भगवंताचें नाम. २ प्रमाणें. ३ अज्ञानांत.

शे विषयव्यथा। वृद्धपणीं प्रवर्तली चिंता। मरें मागुता जन्म धरीं ॥ ३ ॥ क्षण एक तो-ही नाहीं विसावा। लक्ष चौऱ्याशीं घेतल्या धांवा। भोवंडिती पाठीं लागल्या हांवा। लागो आगी नांवा माझ्या मीपणा ॥ ४ ॥ आतां पुरे ऐसी भरोवरी। रंक होऊनि राहे-न द्वारीं। तुझा दास मी दीन कामारी। तु-का ह्मणे करीं कृपा आतां ॥ ५ ॥

४० कैं मी उद्धार पावेन। काय कृपा करील नारायण। ऐसें तुह्मी सांगा संतजन। करा समाधान चित्त माझें ॥ १ ॥ काय हें खंडईल कर्म। पारुषतील धर्माधर्म। कास-यानें तें कळे वर्म। ह्मणऊनी श्रम वाटतसे २ काय हो स्थिर राहेल बुद्धि। कांहीं अरिष्ट न येल मधीं। धरिली जाईल ते शुद्धि। शे-वट कधीं तो मज न कळे ॥ ३ ॥ काय ऐसें पुण्य होईल गांठीं। घालीन पायीं देवाचे मिठी। मज तो कुरवाळील जगजेठी। दाट-

१ वासना. २ खटपट. ३ मरणसूचक चिन्ह.

ईन कंठीं सद्गदित ॥ ४ ॥ काय हे निवतील डोळे । सुख तें देखोनी सोहळे । संचित कैसें तें न कळे । होतील डोहळे वासनेसी ॥५॥ ऐसी चिंता करीं सदा सर्वकाळ । रात्रीदिवस होंचि तळमळ । तुका ह्मणे नाहीं आपुलें बळ । जेणें फळ पावें निश्चयेंसी ॥ ६ ॥

४१माझा तंव खुंटला उपाव[1]। जेणें तुझे आतुडती पाव[2]। करूं भक्ति तरि नाहीं भाव । नाहीं हातीं जीव कवणेविशीं ॥१॥ धर्म करूं तरि नाहीं चित्त । दान देऊं तरि नाहीं वित्त[3]। नेणें पुजों ब्राह्मण अतीत । नाहीं भूतदया पोटा हातीं ॥ २ ॥ नेणें गुरुदास्य संतसेवन । जप तप अनुष्ठान । नव्हे वैराग्य वनसेवन । नव्हे दमन इंद्रियासी ॥ ३ ॥ तीर्थ करूं तरि मन नये सवें । व्रत करूं तरि विधि नेणें स्वभावें । देव जरि आहे ह्मणों मजसवें । तरि आपपरावें[4] न वंचे ॥ ४ ॥ ह्मणोनि जालों शरणागत । तुझा दास मी अंकित । यास कांहीं

---

१ प्रयत्न. २ सांपडती. ३ धन. ४ आपला परावा.

न लगे संचित । जालों निश्चित

४२ न बोलसी तेंही कळलें दे
आपुलिया नांवा । तुज मी न
गोंवा । भीड केशवा कासयासी
री आपुला हा भार । मजशीं बो
माझा तुज नव्हे अंगीकार । मग
रीन मी ॥ २ ॥ दात्या आणि
धर्मनीति तरी बोलिली ऐसी ।
ठाकेल तैसी । बाधी दोघांसी वि
ह्मणोनी करितों मी आस । तुझि
ची वास । धीर हा करूनि साय
नेमास आपुलिया ॥ ४ ॥ तुझें म
वांचून । न वंचे येथूनी वचन । ह
नेम सत्य जाण । आहे नाहीं ह्मण

४३ ऐक पांडुरंगा एक मात ।
ह्मणें आहे एकांत । आह्मां जरी
चित । तरी उचितें काय तुझें ॥
फेडितां धर्म तो कोण । काय तय

१ गुतवीत नाहीं. २ जात नाहीं. ३

जन । काय गा मिरवूनि भूषण । वाया थोरपण जनांमध्यें ॥ २ ॥ अन्न जरी न मिळे तयासी देणें । आगांतुक पात्र उचित दान । उपकार तरी धनवंत्रीपणें । जरी देणें घेणें नाहीं आशा ॥ ३ ॥ शूर तों तयासी बोलिजे जाणा । पाठीशीं घालूनी राखे दीना । पार पुण्या नाहीं त्या भूषणा । ऐक नारायणा वचन हें ॥ ४ ॥ आतां पुढें बोलणें तें काई । मज तारिसील तरीच सही । वचन आपुलें सिद्धी नेई । तुका ह्मणे तेंई मज कळसी ॥५॥

४४ सुख या संतसमागमें । नित्य दुणावे तुझिया नामें । दहनें होती सकळ कर्मे । सर्वकाळ प्रेमें डुल्लतसों ॥ १ ॥ ह्मणोनी नाहीं कांहीं चिंता । तूंचि आमुची मातापिता । बहिणी बंधु आणि चुलता । आणिकां गोतां सर्वांठायीं ॥ २ ॥ ऐसा हा कळला निर्धार । माझा तुज न पडे विसर । असती देऊनियां धीर । बाह्य अभ्यंकर मजजवळी ॥३॥ दुःख

१ बरें होणें. २ त्या वेळेस. ३ जळून जाती.

न लगे संचित। जालों निश्चिंत तुका ह्मणे ५

४२ न बोलसी तेंही कळलें देवा। लाजसी आपुलिया नांवा। तुज मी नाहीं घालीत गोंवा[1]। भीड केशवा कासयासी ॥ १ ॥ उतरी आपुला हा भार। मजशीं बोलोनी उत्तर। माझा तुज नव्हे अंगीकार। मग विचार करीन मी ॥ २ ॥ दात्या आणि मागत्यासी। धर्मनीति तरी बोलिली ऐसी। यथानुशक्ति ठाकेल तैसी। बाधी दोघांसी विन्मुखता ३॥ ह्मणोनी करितों मी आस। तुझिया वचनाची वास। धीर हा करूनि सायास। न ढळें नेमास आपुलिया ॥ ४ ॥ तुझें म्यां घेतल्यावांचून। न वंचे[2] येथूनी वचन। हाचि माझा नेम सत्य जाण। आहे नाहीं ह्मण तुका ह्मणे ५

४३ ऐक पांडुरंगा एक मात। कांहीं बोलणें आहे एकांत। आह्मां जरी तारील संचित। तरी उचितें[3] काय तुझें ॥ १ ॥ उसनें फेडितां धर्म तो कोण। काय तया मानवेल

१ गुतवीत नाहीं. २ जात नाहीं. ३ योग्य.

जन । काय गा मिरवूनि भूषण । वाया थोरपण जनानध्यें ॥ २ ॥ अन्न जरी न मिळे तयासी देणें । आगांतुक पात्र उचित दान । उपकार तरी धनवंत्रीपणें । जरी देणें घेणें नाहीं आशा ॥ ३ ॥ शूर तों तयासी बोलिजे जाणा । पाठीशीं घालूनी राखे दीना । पार पुण्या नाहीं त्या भूषणा । ऐक नारायणा वचन हें ॥ ४ ॥ आतां पुढें बोलणें तें काई । मज तारिसील तरीच सही[1] । वचन आपुलें सिद्धी नेई । तुका ह्मणे तेंई[2] मज कळसी ॥५॥

४४ सुख या संतसमागमें । नित्य दुणावे तुझिया नामें । दहनें[3] होती सकळ कर्में । सर्वकाळ प्रेमें डुल्लतसों ॥ १ ॥ ह्मणोनी नाहीं कांहीं चिंता । तूंचि आमुचीं मातापिता । बहिणी बंधु आणि चुलता । आणिकां गोतां सर्वांठायीं ॥ २ ॥ ऐसा हा कळला निर्धार । माझा तुज न पडे विसर । असली देऊनियां धीर । बाह्य अभ्यंकर मजजवळी ॥३॥ दुःख

१ बरें होणें. २ त्या वेळेस. ३ जळून जाती.

तें कैसें नये स्वप्नासी । भुक्तिमुक्ति जाल्या कामारी दासी । त्याचें वर्म तूं आह्मापाशीं । सुखें राहिलासी प्रेमाचिया ॥ ४ ॥ जेथें तुझ्या कीर्तनाचा घोष । जळती पापें पळती दोष । काय तें उणें आह्मां आनंदास । सेवूं ब्रह्मरस[1] तुका ह्मणे ॥ ५ ॥

४५ अल्प भाव अल्प मति । अल्प आयुष्य नाहीं हातीं । अपराधाची वोळिलों मूर्ति । अहो वेदमूर्ति परियेसा ॥ १ ॥ किती दोषा देऊं परिहार । गुणदोषें मळिलें अंतर । आदि वर्तमान भविष्याकार । गेला अंतपार ऐसें नाहीं ॥२॥ विविध कर्म चौऱ्याशी फेरा । त्रिविधें[2] भोग या शरीरा । कर्मकोठार पांजरा । जन्मजरामरणसांठवण ॥ ३ ॥ जीवा नाहीं कुडीचें लाहातें । ये भिन्न भिन्न पंचभूतें । रचतें खचतें संचितें । असार रितें फलकट ॥ ॥ ४ ॥ पुत्र पत्नी सहोदर । मायबाप गोताचा पसर । मिळती काष्ठें लोटतां पूर । आ-

---

१ नामस्मरण करूं. २ सात्विक, राजस, तामस.

दळीं दूर होती खल्लाळीं ॥ ५ ॥ ह्मणोनी नासावें अज्ञानें[1] । इतुलें करी कृपादान । कृपाळु तूं जनार्दन । धरूनि चरण तुका विनवी६

४६ जेणें हा जीव दिला दान । तयाचें करीन चिंतन । जगज्जीवन[2] नारायण । गाईन गुण तयाचे ॥ १ ॥ जो या उभा भींवरेच्या तिरीं । कट धरूनियां करीं । पाउलें समचि साजिरीं । अंतरीं धरोनी राहेन ॥ २ ॥ जो या असुरांचा काळ । भक्तजनप्रतिपाळ । खेळे हा लाघवें सकळ । तयाच्या भाळ पायांवरी ॥ ३ ॥ जो या गोपाळांच्या मेळीं । खेळु खेळे वनमाळी । रसातळा नेला बळी । राहे पाताळीं स्वामी माझा ॥ ४ ॥ जो हा लावण्यपुतळा । जयाचे अंगीं सकळ कळा । जयाचे गळां वैजयंतीमाळा । तया वेळोवेळां दंडवत ॥ ५ ॥ जयाचें नाम पाप नासी । लक्ष्मी ऐसी जयाची दासी । तो हा तेजःपुंज रासी । सर्व भावें त्यासी तुका शरण ॥ ६ ॥

---

१ आत्मरूपाची विस्मृति. २ जगाचें जीवन.

४७ आतां येणें बळें पंढरीनाथ। जवळी राहिला तिष्ठत। पाहतां न कळे जयाचा अंत। तोचि हृदयांत घालूं आतां ॥ १ ॥ विसरोनी आपुला देहपणभाव। नामेंचि भुलविला पंढरीराव। न विचारी याती कुळ नांव। लागावया पाव संतांचे ॥ २ ॥ बरें वर्म आलें आमुचिया हातां। हिंडावें धुंडावें न लागतां। होय अविनाश सहाकारी दाता। चतुर्भुज संतां परि धाके ॥ ३ ॥ होय आवडी साना थोर। रूप सुंदर मनोहर। भक्तिप्रिय लोभापर। करी आदर याचकपणें ॥ ४ ॥ तें वर्म आलें आमुच्या हाता। ह्मणोनी शरण रिघालों संतां। तुका ह्मणे पंढरीनाथा। न सोडीं आतां जीवें भावें ॥ ५ ॥

४८ आतां माझा नेणों परतों भाव। विसावोनि पायीं ठेविला जीव। सकळां लाभांचा हा ठाव। पैला भाव जाला चित्ताठायीं ॥ १ ॥ भांडवल गांठीं तरि विश्वास। जालों

१ शोधावें २ साह्य करणारा. ३ समीप जवळ.

तों जालों निश्चयें दास । न पाहें मागील ते वास । पुढती सोसं सेवेचाचि ॥२॥ आहे तें निवेदिलें सर्व । मी हें माझें मोडियला गर्व । अकाळीं काळ अवघे पर्व । जाला भरंवसा कृपेलाभाचा ॥ ३ ॥ वेव्हारीं वेव्हार अनंत । नाहीं यावांचून जाणत । तरी हें समाधान चित्त । लाभ हानि नाहीं येत अंतरा ॥ ४ ॥ करूनि नातळों संसारा । अंग भिन्न राखिला पसारा । कळवळा तो जीवनीं खरा । बीआचा थारा दुरी आघात ॥ ५ ॥ बहुमतांपासूनि निराळा । होऊनी राहिलों सोंवळा । बैसला रूपाचा कळवळा । तुका ह्मणे डोळां लेईल तें ॥ ६ ॥

४९ आतां धर्माधर्मी कांहीं उचित । माझें विचारावें हित । तुज मी ठाउका पतित । शरणागत परि जालों ॥ १ ॥ येथें राया रंका एकी सरी । नाहीं भिन्नाभिन्न तुमच्या घरीं । पावलों पाय भलत्यापरी । अंग बाहेरी

---

१ इच्छा. २ गुंतत नाहीं. ३ चार्वाकादिक वेदबाह्य मतें.

न घालावें ॥ २ ॥ ऐसें हें चालत आलें मागें । नाहीं मी बोलत वाउगें । आपुलिया पडिल्या प्रसंगें । कीर्ति हे जगें वाणिजेते[1] ॥ ३ ॥ घालोनियां माथां बैसलों भार । सांडिला लौकिक वेव्हार । आधीं हे विचारली थार । अविनाशपर पद ऐसें ॥ ४ ॥ येथें एक वर्म पाहिजे धीर । परि ग्यां लेखिलें असार । देह हें नाशिवंत जाणार । धरिलें सार नाम तुझें ॥ ५ ॥ केली आरोणूक[2] सकळां हातीं । धरावें धरिलें तें चित्तीं । तुका ह्मणे सांगितलें संतीं । देईं अंतीं ठाव मज देवा ॥ ६ ॥

५० आतां तुज कळेल तें करीं । तारिसी तरी तारीं मारीं । जवळी अथवा दुरी धरीं । घालीं संसारीं अथवा नको ॥ १ ॥ शरण आलों नेणतपणें । भाव आणि भक्ति कांहींच नेणें । मतिमंदें[3] सर्वज्ञानें । बहु रंक उणें रंकाहुनी २ मन स्थिर नाहीं माझिये हातीं । इंद्रियें धांवतां नावरती । सकळ खुंटलिया युक्ति । शां-

---

१ वर्णिली जाते. २ विश्रांति. ३ मंदबुद्धी.

ति निवृत्ति जवळी नाहीं ॥ ३ ॥ सकळ निवेदिलों भाव । तुझिये पायीं ठेविला जीव । आतां करी कळेल तो उपाव । तूंचि सर्व ठाव माझा देवा ॥ ४ ॥ राहिलों धरूनि विश्वास । आधार नेहटीं तुझी कास । आणीक नेणें मी सायास । तुका ह्मणे यास तुझें उचित ॥ ५ ॥

५१ आतां मी न पडे सायासीं । संसारदुःखाचिये पाशीं । शरण रिघेन संतांसी । ठाव पायापाशीं मागेन त्यां ॥ १ ॥ न कळे संचित होतें काय । कोण्या पुण्यें तुझे लाधलें पाय । आतां मज न विसंबे माय । मोकलूनि धाय विनवितसें ॥ २ ॥ बहुत जाचलों संसारें । मोहमायाजाळाच्या विखारें । त्रिगुण येतलि लहरें । तेणें दुःखें थोर आक्रंदलों ॥ ३ ॥ आणीक दुःखें सांगों मी किती । सकळ संसारस्थिति । न साहे पाषाण फुटती । भय कांप चित्तीं भरलासे ॥ ४ ॥ आतां मज न साहवे सर्वथा । संसारगंधीची हे वार्ता । जालों वे-

१ कथन केला. २ विसरूं नका. ३ सर्प.

डा असोनी जाणता। पावे अनंता तुका ह्मणे॥५॥

५२ आतां मज धरवावी शुद्धि। येथूनि परतवावी बुद्धि। घ्यावें सोडवूनि कृपानिधी। सांपडलों संधीं काळचक्रीं॥१॥ करिसील तरी नव्हे काई। राईचा डोंगर पर्वत राई। आपुले करुणेची सांई[1]। करी वो आई मजवरी॥२॥ मागील काळ अज्ञानपणें। सरला स्वभावें त्या गुणें। नेणें आयुष्य जालें उणें। पुढील पेणें[2] अंतरलें॥३॥ आतां मज वाटतसे भय। दिवसेंदिवस चालत जाय। येथें म्यां येउनी केलें काय। नाहीं तुझे पाय आठविले॥४॥ करूनि अपराध क्षमा। होतील केले पुरुषोत्तमा। आपुले नामीं द्यावा प्रेमा। सोडवी भ्रमापासूनिया॥५॥ हृदय वसो तुमच्या गुणीं। ठाव हा पायापें चरणीं। करूं हा रस[3] सेवन वाणी। फिटे तों धणी तुका ह्मणे॥६॥

५३ आतां पावेन सकळ सुखें। खादलें

१ छाया. २ मिळणारा ठेवा. ३ ब्रह्मरस.

कदा तें न देखें । अवघें सरलें पारिखें । सक-
ळ देखें माहियेर ॥ १ ॥ जवळी विठ्ठलरखु-
माई । बहिणी बंधु बाप आई । सकळ गो-
तांचीच सोई । पारिखें काई ऐसें नेणिजे ॥२॥
जगदाकारीं जाली सत्ता । वारोनी गेली प-
राधीनता । अवघें आपुलेंचि आतां । लाज
आणि चिंता दुऱ्हावली ॥ ३ ॥ वावरे इच्छा-
बसें घरीं । आपुले सत्तेचे माहेरीं । करवी
तैसें आपण करीं । भीड न धरीं चुकल्याची
॥ ४ ॥ सोसिला होता सासुरवास । बहुतां-
चा बहुत दिवस । बहु कामें पुरविला सोस ।
आतां उदास आपुल्यातें ॥ ५ ॥ करिती कव-
तुक लाडें । मज बोलविती कोडें । मायबाप
उत्तरें गोडें । बोले बोबडें पुढें तुका ॥ ६ ॥

१ दुसरेपणा. २ मंडळी. ३ दूर गेली. ४ कौतुकानें.

# नामपर अभंग.

—:*:—

१ नामसंकीर्तन साधन पैं सोपें । जळतील पापें जन्मांतरींचीं ॥१॥ न लगे सायांस जावें वनांतरा । सुखें येतो घरा नारायण ॥ २ ॥ ठायींच बैसोनि करा एकचित्त । आवडी अनंत आळवावा ॥ ३ ॥ रामकृष्णहरिविठ्ठलकेशवा । मंत्र हा जपावा सर्वकाळ ॥ ४ ॥ याविण आणीक नाहीं पैं साधन । वाहातसें आण विठोबाची ॥ ५ ॥ तुका ह्मणे सोपें आहे सर्वांहूनि । शहाणा तो धणी घेतो तेथें ६

२ नाम उच्चारितां कंठीं । पुढें उभा जगजेठी ॥ १ ॥ ऐसें धरोनियां ध्यान । मनें करावें चिंतन ॥ २ ॥ ब्रह्मादिकां ध्याना नये । तो हा कीर्तनाचे सोये ॥ ३ ॥ तुका ह्मणे सार घ्यावें । मनें हरिरूप पहावें ॥ ४ ॥

३ नाम तारक भवसिंधु । विठ्ठल तारक

---

प्रयत्न, श्रम. २ तृप्ती. ३ योगानें.

233785.

भवसिंधु ॥१॥ नामधारक तया अरि[1] मित्रु । समता त्यागूनियां क्रोधु ॥ २ ॥ नामधारक तया । कदापि न घडे विषयाचा बाधु ॥ ३ ॥ ज्या नामें तरले शुकादिक । नारद संत मुनिजन साधु ॥ ४ ॥ जाणूनियां जें नसरे । तें नेणती जैसा गज अंधु ॥ ५ ॥ सहज तुकया । नामचि जपतां स्वरूपीं वेधु[2] ॥ ६ ॥

४ नाम पावन पावन । त्याहून पवित्र आहे कोण ॥ १ ॥ शिव हलाहलें[3] तापला । तोही नामें शीतळ जाला ॥ २ ॥ शिवास नामाचा आधार । केला कळिकाळ किंकर ३ मरण जालें काशीपुरीं । तेथें नामचि उद्धरी ॥ ४ ॥ तुका ह्मणे अवघीं चोरें । एक हरिनाम सोइरें ॥ ५ ॥

५ नाम घेतां न लगे मोल । नाममंत्र नाहीं खोल ॥ १ ॥ दोंचि अक्षरांचें काम उच्चाराचें राम राम ॥ २ ॥ नाहीं वर्णधर्मयाती । नामीं अवघींचि सरतीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाम ।

१ शत्रु. २ अनुसंधान. ३ विषें.

चैतन्य निजधाम[1] ॥ ४ ॥

६ नामाचा डांगोरा फिरवीं घरोघरीं । ह्मणा हरी हरी सर्व भावें ॥ १ ॥ नामें हरती कर्मैं वैकुंठींची पैं वस्ति । संनिध श्रीपति सदोदित ॥ २ ॥ नामाचा महिमा बहुतां कळला । नामें उद्धरिला अजामेळ ॥ ३ ॥ गजेंद्राची स्थिति पुराणीं बोलती । नामेंचि श्रीपति पावलासे ॥ ४ ॥ तुका ह्मणे नाम घेतां मुक्ति आहे । नामें सर्व पाहे आकळिलें[2] ॥ ५ ॥

७ नामें स्नानसंध्या केलें क्रियाकर्म । त्याचा भवश्रम निवारला ॥ १ ॥ आणिकें दुरावलीं करितां खटपट । वाउगे बोभाट वर्माविण २ रामनामीं जींहीं धरिला विश्वास । तींहीं भवपाश तोडियेले ॥ ३ ॥ तुका ह्मणे केलें कळिकाळ ठेंगणें । नामसंकीर्तनें भाविकांनीं[3] ४

८ हरि ह्मणतां गति पातकें नासती । कळिकाळ कांपती हरि ह्मणतां ॥ १ ॥ हरि ह्मणतां भुक्ति हरि ह्मणतां मुक्ति । चुके याता-

१ आत्माराम. २ प्राप्त झालें. ३ श्रद्धावंतांनीं.

थाती हरि ह्मणतां ॥ २ ॥ तपें अनुष्ठानें न लगती साधनें । तुटती बंधनें हरि ह्मणतां ॥३॥ तुका ह्मणे भावें जपा हरिचें नाम । मग काळयम शरण तुह्मां ॥ ४ ॥

९ यालागीं आवडी ह्मणा रामकृष्ण । जोडा नारायण सर्वकाळ ॥ १ ॥ सोपें हें साधन लाभ येतो घरा । वाचेसी उच्चारा राम हरि ॥ २ ॥ न लगती कष्ट न लगे सायास । करावा अभ्यास विठ्ठलाचा ॥ ३ ॥ न लगे तप तीर्थ करणें महादान । केल्या एक मनें जोडे हरि ॥ ४ ॥ तुका ह्मणे कांहीं न वेंचितां धन । जोडे नारायण नामासाठीं ॥ ५ ॥

१० लागोनियां पायां विनवितों तुह्माला । करें टाळी बोला मुखें नाम ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल ह्मणा वेळोवेळां । हा सुखसोहळा स्वर्गीं नाहीं ॥ २ ॥ कृष्ण विष्णु हरि गोविंद गोपाळ । मार्ग हा प्रांजळ वैकुंठींचा ॥ ३ ॥ सकळांसी येथें आहे अधिकार । कलयुगीं उद्धार हरिनामें ॥ ४ ॥ तुका ह्मणे नामापा-

---

१ श्रद्धेनें. २ चित्ताची एकाग्रता.

र्शी चारी मुक्ति । ऐसें बहुग्रंर्थीं बोलियेलें ५
११ रामनामाचे पवाडे । अखंड ज्याची वाचा पढे ॥ १ ॥ धन्य तो एक संसारीं । रामनाम जो उच्चारी ॥ २ ॥ रामनाम गर्जे वाचा । काळ आज्ञाधारक[1] त्याचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे रामनामीं । कृतकृत्य[2] जालों आह्मी ॥४॥
१२ नाम घेतां वायां गेला । ऐसा कोणें आईकिला ॥ १ ॥ सांगा विनवितों तुह्मांसी । संत महंत सिद्ध ऋषी ॥ २ ॥ नामें तरला नाहीं कोण । ऐसा द्यावा निवडून ॥ ३ ॥ सलगीच्या[3] उत्तरा । तुका ह्मणे क्षमा करा ॥४॥
१३ कामामध्यें काम । कांहीं ह्मणा रामराम । जाईल भवश्रम । सुख होईल दुःखाचें ॥१॥ कळों येईल अंतकाळीं । प्राणप्रयाणाचे वेळीं । राहाती निराळीं । रांडापोरें सकळ ॥२॥ जीतां जीसी जैसातैसा । पुढें आहे रे वोळसा । उगवूनि फांसा । काय करणें तें करी ३ केलें होतें याचि जन्में । अबघें विठोबाच्या

१ आज्ञा मानणारा. २ कृतार्थ. ३ धिटाई.

नामें । तुका ह्मणे कर्मे । जाळोनियां तरसी ४

१४ ब्राह्मणा न कळे आपुलें तें वर्म । गं-
वसे परब्रह्म नामें एका ॥ १ ॥ लहानथोरां-
सी करितों प्रार्थना । दृढ नारायणा मनीं ध-
रा ॥ २ ॥ सर्वांप्रति माझी हेचि असे विनं-
ती । आठवा श्रीपती मनामाजी ॥ ३ ॥ के-
शव नारायण करितां आचमन । तेचि सं-
ध्या स्नान कर्म क्रिया ॥ ४ ॥ नामें करा नि-
त्य भजन भोजन । ब्रह्मकर्म ध्यान याचे पा-
यीं ॥ ५ ॥ तुका ह्मणे हेंचि निर्वाणींचें[1] शस्त्र ।
ह्मणोनि सर्वत्र स्मरा वेगीं ॥ ६ ॥

१५ जयजय ह्मणा राम । हातें टाळी वा-
चें नाम ॥ १ ॥ आटाआटी[2] नाहीं ज्यास । न
वेंचे मोल न पडे खांस[3] ॥ २ ॥ आपण ह्मणे
आणिकां हातीं । यज्ञादिकीं नये ते गति ॥३॥
आसन भोजन करितां काम । ध्यानसमाधि
ह्मणतां राम ॥ ४ ॥ मंत्र जपा हाचि सार
वर्णां याती जयजयकार ॥ ५ ॥ ह्मणतां राम

---

१ अंतकालींचें. २ खटपट. ३ खाच.

ह्मणे तुका । वेळोवेळां चुकों नका ॥ ८ ॥

१६ विठ्ठल विठ्ठल येणें छंदें । ब्रह्मानंदें गर्जावें ॥ १ ॥ वाहे टाळ टाळ्याटाळी । होय होळी विघ्नाची ॥ २ ॥ विठ्ठल आदि अवसानीं[1] । विठ्ठल मनीं स्मरावा ॥ ३ ॥ तुका ह्मणे विठ्ठलवाणी । वदा कानीं आईका ॥ ४ ॥

१७ ऐसे पुढती मिळतां आतां । नाहीं सत्ता स्वतंत्र ॥ १ ॥ ह्मणऊनि फावलें तें घ्यावें । नाम गावें आवडीं ॥ २ ॥ संचित प्रारब्ध गाढें । धांवे पुढें क्रियमाण ॥ ३ ॥ तुका ह्मणे घुबडा ऐसें । जन्म सरिसें सूकरांचें[2] ४

१८ तया घडले सकळ नेम । मुखीं विठोबाचें नाम ॥१॥ कांहीं न लगे शिणावें । आणिक वेगळाल्या भावें ॥ २ ॥ वाचे उच्चारावें । रामकृष्ण गोविंदा ॥ ३ ॥ फळ पावाल अवलिळां[3] । भोग वैकुंठ सोहळा ॥ ४ ॥ तुका ह्मणे त्याच्या नांवें । तोचि होइजे स्वभावें ५

१९ पडतां जड भारी । दासीं आठवावा

१ शेवटीं. २ डुकराचे. ३ सहज.

हरी ॥ १ ॥ मग तो होऊं नेदी शीण । आड घाली सुदर्शन ॥ २ ॥ नामाच्या चिंतनें । बारा वाटां पळती विघ्नें ॥ ३ ॥ तुका ह्मणे प्राण । करा देवासी अर्पण ॥ ४ ॥

२० उभाउभी[1] फळ । अंगीं मंत्राचे या बळ १ ह्मणा विठ्ठल विठ्ठल । गोड आणि स्वल्प बोल ॥ २ ॥ कळिकाळाची बाधा । नव्हे उच्चारितां कदा ॥ ३ ॥ तुका ह्मणे रोग । वारे भवा ऐसा भोग ॥ ४ ॥

२१ ब्रह्मरस घेईं काढा । जेणें पीडा वारेल ॥ १ ॥ पथ्य नाम विठोबाचें । आणीक वाचें न सेवीं ॥ २ ॥ भवरोगाऐसें जाय । आणीक काय क्षुल्लकें ॥३॥ तुका ह्मणे नव्हे बाधा । आणीक कदा भूताची ॥ ४ ॥

२२ भक्तिभाव आह्मीं बांधिलासे गांठीं । सादावितों[2] हाटीं[3] घ्या रे कोणी ॥ १ ॥ सुखाचिया पेंठे घातला दुकान । मांडियेलें वान रामनाम ॥ २ ॥ सुखाचें फुकाचें सकळाचें

१ तत्काळ. २ उपदेश करितों. ३ बाजार.

सार । तरावया पार भवसिंधु ॥ ३ ॥ मागें भाग्यवंत[1] जाले थोर थोर । तींहीं केला फार हाचि सांठा ॥ ४ ॥ खोटें कुडें तेथें नाहीं घातपात । तुका ह्मणे चित्त शुद्ध करी ॥ ५ ॥

२३ स्वल्प वाटे चला जाऊं । वाचे गाऊं विठ्ठल ॥ १ ॥ तुह्मी आह्मी खेळीमेळीं । गदारोळी आनंदें ॥ २ ॥ ध्वजा कुंचे गरुडटके । शृंगार निके करोनि ॥ ३ ॥ तुका ह्मणे हेंचि नीट । जवळी वाट वैकुंठा ॥ ४ ॥

२४ संध्या कर्म ध्यान जप तप अनुष्ठान । अवघें घडे नाम उच्चारितां । न वेंचे[2] मोल कांहीं लागती न सायास । तरी कां आळस करिसी ह्मणी ॥ १ ॥ ऐसें हें सार कां नघेसी फुकाचें । काय तुझें वेंचे मोल तया ॥ २ ॥ पुत्रस्नेहें[3] शोक करी अजामेळ । तंव तो कृपाळ जवळी उभा । अनाथाच्या नाथें घातला विमानीं । नेला उचलूनि परलोका ॥ ३ ॥ अंतकाळीं गणिका पक्षियाच्या छंदें । राम रा-

---

१ वैराग्यवान्. २ खर्चत नाहीं. ३ मुलाच्या मोहानें.

म उच्चारिलें । तंव त्या दीनानाथा कृपा आली । त्यानें तियेसि वैकुंठा नेलें ॥ ४ ॥ अवचिता[1] नाम आलिया हे गती । चिंतितां चित्तीं जवळी असे । तुका ह्मणे भावें स्मरतां राम राम । कोण जाणे तये दशे ॥ ५ ॥

२६ सरळीं हीं नामें उच्चारावीं सदा । हरि बा गोविंदा रामकृष्णा ॥ १ ॥ पुण्य पर्वकाळ तीर्थेंही सकळ । कथा सिंधुजळ न्हाऊं येती ॥ २ ॥ अवघेचि लाभ बैसलिया घरा । येती भाव[2] धरा एके ठायीं ॥ ३ ॥ शेळ्या मेंढ्या गाई सेवा घेती ह्मसी । कामधेनु तैसी नव्हे एक ॥ ४ ॥ तुका ह्मणे सुखें पाविजे अनंता । हें वर्म जाणतां सुलभचि ॥ ५ ॥

२६ ऐसी जोडी करा राम कंठीं धरा । जेणें चुके फेरा गर्भवास ॥ १ ॥ नाशिवंत आटी[3] प्रियापुत्रधन । बीज ज्याचा शीण तेंचि फळ ॥ २ ॥ नाव धड करा सहस्रां नामांची । जे भवसिंधूची थडी पावे ॥ ३ ॥ तु-

१ अकस्मात. २ श्रद्धा. ३ खटपट.

का ह्मणे काळा हाता तोंडावरी । भाता भरा हरिनाम बाणीं ॥ ४ ॥

२७ सेवा ते आवडी उच्चारावें नाम । भेदाभेदकाम निवारूनि ॥ १ ॥ न लगे हालावें चालावें बाहेरी । अवघेंचि घरीं बैसलिया २ देवाचींच नामें देवाचिये शिरीं । सर्व अळंकारीं समर्पावीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे होय भावेंचि संतोषी । वसे नामापाशीं आपुलिया ४

२८ रामकृष्णनाम मांडीं पां वोळी । तेणें होईल होईल होळी पापा धुणी ॥ १ ॥ ऐसा मना छंद लावी रे अभ्यास । जया नाहीं नास ब्रह्मरसा ॥ २ ॥ जोडी तरी ऐसी करावी न सरे । पुढें आंस नुरे मागुताली ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसें धरा कांहीं मनीं । यातायाती खाणी चुकतील ॥ ४ ॥

२९ गायें नाचें वाहें टाळी । साधन कळी उत्तम हें ॥ १ ॥ काय जाणों तरले किती । नाव आइती या बैसा ॥ २ ॥ सायासाचें नाहीं

---

१ बाण ठेवण्याची पिशवी. २ आशा इच्छा.

काम । घेतां नाम विठोबाचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे निर्वाणींचें[1] । शस्त्र साचें हें एक ॥ ४ ॥

३० नाशवंत देह नासेल हा जाणा । कां रे उच्चाराना वाचें नाम ॥ १ ॥ नामेंचि तारिले कोट्यान हे कोटी । नामें हे वैकुंठीं बैसविले ॥ २ ॥ नामापरतें सार नाहीं त्रिभुवनीं । तें कां तुह्मी मनीं आठवाना ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाम वेदांसी आगळें[2] । तें दिलें गोपाळें फुकासाठीं ॥ ४ ॥

३१ जवळी मुखापाशीं । असतां नेघे अहर्निशीं ॥ १ ॥ भवनिर्दाळण नाम । विठ्ठल विठ्ठल नाशी काम ॥ २ ॥ सुखाचें शेजार । करूं कां नावडे घर ॥ ३ ॥ तुका ह्मणे ठेवा । कां हा न करीचि बरवा ॥ ४ ॥

३१ काय नव्हे केलें । एका चिंतितां विठ्ठलें ॥ १ ॥ सर्वसाधनांचें सार । भवसिंधु[3] उतरी पार ॥ २ ॥ योगयागतपें । केलीं तयानें अमुपें ॥ ३ ॥ तुका ह्मणे जपा । मंत्र त्रिअक्षरीं सोपा ॥ ४ ॥

---

१ अंतकालींचें. २ अधिक मोठें. ३ संसारसमुद्र.

३३ चाल केलासी मोकळा । बोल विठ्ठल वेळोवेळां ॥ १ ॥ तुज पापचि नाहीं ऐसें । नाम घेतां जवळी वसे ॥ २ ॥ पंच पातकांच्या कोडी । नामें जळतां न लगे घडी ॥ ३ ॥ केलीं मागें नको पाहों । तुज जमा[1]न आह्मी आहों ॥ ४ ॥ करीं तुज जीं करवती । आणिक नामें घेऊं किती ॥ ५ ॥ तुका ह्मणे काळा । री[2]गे नाहीं निघती ज्वाळा ॥ ६ ॥

३४ युक्ता[3]हार न लगे आणिक साधनें । अल्प नारायणें दाखविलें ॥ १ ॥ कलियुगामाजीं करावें कीर्तन । तेणें नारायण देइल भेटी ॥ २ ॥ न लगे हा लौकिक सांडावा वेव्हार । घ्यावें वनांतर भस्म दंड ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज आणिक उपाव । दिसती ते वा[4]व नामाविण ॥ ४ ॥

३५ चारी वेद जयासाठीं । त्याचें नाम धरा ॥१॥ न करी कंठीं आणीक साधन । कष्टसी कां वायांविण ॥२॥ अठरा पुराणांचे पोटीं । ना-

---

१ जमीन, २ शिरकाव ३ मितभोजन ४ व्यर्थ.

माविण नाहीं गोठी ॥ ३ ॥ गीता जेणें उपदेशिली । ते ही विटेवरी माउली ॥४॥ तुका ह्मणे सार धरीं । वाचे हरिनाम उच्चारी ॥५॥

३६ फुकाचें तें लुटा सार । व्हा रे अमर[1] सदैव ॥ १ ॥ नाहीं गर्भवास पुढती । डोंगर जळती दोषांचे ॥ २ ॥ उदंड भावें उदंड घ्यावें । नाम गावें आवडी ॥ ३ ॥ तुका ह्मणे घरिच्या घरीं । देशा उरीं न शिणिजे ॥ ४ ॥

३७ फेळकट[2] तो संसार । येथें सार भगवंत ॥ १ ॥ ऐसें जागवितों मना । सरसें जनांसहित ॥ २ ॥ अवघें निरसूनि काम । घ्यावें नाम विटोबाचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवाविण । केला शीण तो मिथ्या ॥ ४ ॥

३८ न कळे तें कळों येईल उगलें[3] । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥ १ ॥ न दिसे तें दिसों येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥ २ ॥ न बोले तें बोलों येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥ ३ ॥ न भेटे तें

१ देव, जन्ममृत्यु रहित. २ खोटा. ३ सहज.

३३ चाल केलासी मोकळा । बोल विठ्ठल वेळोवेळां ॥ १ ॥ तुज पापचि नाहीं ऐसें । नाम घेतां जवळी वसे ॥ २ ॥ पंच पातकांच्या कोडी । नामें जळतां न लगे घडी ॥ ३ ॥ केलीं मागें नको पाहों । तुज जमानें[1] आह्मी आहों ॥ ४ ॥ करीं तुज जीं करवती । आणिक नामें घेऊं किती ॥ ५ ॥ तुका ह्मणे काळा । रीगे[2] नाहीं निघती ज्वाळा ॥ ६ ॥

३४ युक्ताहार[3] न लगे आणिक साधनें । अल्प नारायणें दाखविलें ॥ १ ॥ कलियुगामाजीं करावें कीर्तन । तेणें नारायण देइल भेटी ॥ २ ॥ न लगे हा लौकिक सांडावा वेव्हार । घ्यावें वनांतर भस्म दंड ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज आणिक उपाव । दिसती ते वांव[4] नामाविण ॥ ४ ॥

३५ चारी वेद जयासाठीं । त्याचें नाम धरा ॥१॥ न करी कंठीं आणीक साधन । कष्टसी कां वायांविण ॥२॥ अठरा पुराणांचे पोटीं । ना-

१ जमीन. २ शिरकाव ३ मितभोजन ४ व्यर्थ.

माविण नाहीं गोठी ॥ ३ ॥ गीता जेणें उप-
देशिली । ते ही विटेवरी माउली ॥४॥ तुका
ह्मणे सार धरीं । वाचें हरिनाम उच्चारी ॥५॥

३६ फुकाचें तें लुटा सार । व्हा रे अमर[1]
सदैव ॥ १ ॥ नाहीं गर्भवास पुढती । डोंगर
जळती दोषांचे ॥ २ ॥ उदंड भावें उदंड ध्या-
वें । नाम गावें आवडी ॥ ३ ॥ तुका ह्मणे घ-
रिच्या घरीं । देशा उरीं न शिणिजे ॥ ४ ॥

३७ फळकट[2] तो संसार । येथें सार भग-
वंत ॥ १ ॥ ऐसें जागवितों मना । सरसें ज-
नांसहित ॥ २ ॥ अवघें निरसूनि काम । ध्या-
वें नाम विटोबाचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवावि-
ण । केला शीण तो मिथ्या ॥ ४ ॥

३८ न कळे तें कळों येईल उगलें[3] । नामें
या विठ्ठलें एकाचिया ॥ १ ॥ न दिसे तें दि-
सों येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचि-
या ॥ २ ॥ न बोले तें बोलों येईल उगलें ।
नामें या विठ्ठलें एकाचिया ॥ ३ ॥ न भेटे तें

---

१ देव, जन्ममृत्यु रहित. २ खोटा. ३ सहज.

भेटीं येईल आपण । करितां चिंतन विठोबाचें ॥ ४ ॥ अलभ्य[1] तो लाभ होईल अपार । नाम निरंतर ह्मणतां वाचें ॥ ५ ॥ तुका ह्मणे आसक्त[2] जीव सर्वभावें । तरतील नावें विठोबाच्या ॥ ६ ॥

४० गर्जत जावी नामावळी । प्रेमें टाळी वाहोनि ॥ १ ॥ येणें सुखें पुढती धांवे । भेटी सवें गोपाळा ॥ २ ॥ लोटांगण घाला तळीं । वंदा धुळी संतांची ॥ ३ ॥ तुका ह्मणे विठ्ठल लाहो । ऐसा बाहो उभारा ॥ ४ ॥

४१ उमटती वाणी । वाटे नामाचिया ध्वनी ॥ १ ॥ बरें सेवन उपकारा । घ्यावें द्यावें या उत्तरा ॥ २ ॥ सरळ आणि मृद । कथा-पाहावी ते ऊर्ध्व ॥ ३ ॥ गातो जातो तुका । हाचि उपदेश आइका ॥ ४ ॥

४२ समुद्रवळयांकित पृथ्वीचें दान । करितां समान नये नामा ॥ १ ॥ ह्मणऊनि कोणी न करावा आळस । ह्मणा रात्रंदिवस राम-

१ न प्राप्त होणारा. २ विषयासक्त.

राम ॥ २ ॥ सकळही शास्त्रें पठण करितां वे-द । सरी[1] नये गोविंदनामें एकें ॥ ३ ॥ सकळ ही तीर्थें प्रयागादी काशी । करितां नामाशीं तुळेचि ना ॥४॥ कर्वतीं कर्मरीं देहासी दंड-ण । करितां समान नये नामा ॥५॥ तुका ह्मणे ऐसा आहे श्रेष्ठाचार । नाम हेंचि सार विठो-बाचें ॥ ६ ॥

४३ हित तें हें एक राम कंठीं राहे । नाठ-विती देहभाव देहीं ॥ १ ॥ हाचि एक धर्म निज बीजवर्म । हेंचि जाळी कर्में केलीं म-हा ॥ २ ॥ चित्त राहे पायीं रूप वैसे डोळां । जीवें कळवळा आवडीचा ॥ ३ ॥ अखंड न खंडे अभंग न भंगे । तुका ह्मणे गंगे मिळणी सिंधु ॥ ४ ॥

४४ न पालटे एक । भोळा भक्तचि भावि[2]-विक ॥ १ ॥ येरां नास आहे पुढें । पुण्य सर-तां उघडें ॥ २ ॥ नेणे गर्भवास । एक विष्णू-चाचि दास ॥ ३ ॥ तुका ह्मणे खरें । नाम विठोबाचें बरें ॥ ४ ॥

१ बरोबरी. २ श्रद्धावान, विश्वासु.

४५ काय देवें खातां घेतलें हातींचें । आलें हें तयाचें थोर भय ॥ १ ॥ ह्मणतां गजरें राम एकसरें । जळती पापें थोरें भयधाकें[1] २ काय खोळंबले हात पाय अंग । नाशिलें हें सांग रूप काय ॥ ३ ॥ कोण लोकीं सांग घातला बाहेरी । ह्मणतां हरि हरि तुका ह्मणे ४

४६ न धरी प्रतिष्ठा कोणाचीहि यम । ह्मणतां कां रे राम लाजा ह्मणी ॥ १ ॥ सांपडे हातींचें सोडवील काळा । तो कां वेळोवेळां नये वाचें ॥ २ ॥ कोण लोक जो हा सुटला तो एक । गेले कुंभपाक रवरवांत ॥ ३ ॥ तुका ह्मणे हित तों ह्मणा विठ्ठल । न ह्मणे तो भोगील कळेल तें ॥ ४ ॥

४७ झाडें वोरपोनि खाऊनियां पाला । आठवी विठ्ठला वेळोवेळां ॥ १ ॥ वल्कलें[2] नेसुनि चिंधीया वेढूनी । सांडी जवळुनी देहभान ॥ २ ॥ लोकमान वमनासमान मानणें । एकांतीं राहणें विठोसाठीं ॥ ३ ॥ सहसा क-

१ भीतीनें, धाकानें. २ झाडाच्या साली.

रूं नये प्रपंचीं सौजन्यें । सेवावें अरण्य ए-
कांतवास ॥ ४ ॥ ऐसा हा निर्धार करी जो
मनाचा । तुका ह्मणे त्याचा पांग फिटे ॥ ५ ॥

४८ झांकूनियां नेत्र काय जपतोसी । जों
नाहीं मानसीं प्रेमभाव ॥ १ ॥ रामराम ह्मणा
उघड मंत्र जाणा । चुकती यातना गर्भवास
॥ २ ॥ मंत्र यंत्र कांहीं करिसी जडीबुटी ।
तेणें भूतसृष्टी पावसील ॥ ३ ॥ तुका म्हणे
ऐक सुंदर मंत्र एक । भवसिंधुतारक राम-
नाम ॥ ४ ॥

४९ काय सुख आहे वांउगें[2] बोलतां । ध्या-
तां पंढरीनाथा कष्ट नाहीं ॥ १ ॥ सर्वकाळ
वाचें उच्चारितां हरि । तया सुखा सरी पा-
ड नाहीं ॥ २ ॥ रामकृष्णरंगीं[1] रसना रंगली ।
अमृताची उकळी नाम तुझें ॥ ३ ॥ तुका ह्म-
णे धन्य तयाचें वदन । जया नारायण ध्या-
नीं मनीं ॥ ४ ॥

५० संसारीं असतां हरिनाम घेसी । तरी-

---

१ सरळ वृत्ति. २ व्यर्थ बडबड करतां.

च उद्धरसी पूर्वजेंसी ॥ १ ॥ अवघींच इंद्रियें न येतील कामा । जिव्हे रामनामा उच्चारी वेगीं ॥ २ ॥ शरीरसंपत्ति नव्हे रे आपुली । भ्रांतीची साउली अवघी व्यर्थ ॥ ३ ॥ तुका ह्मणे सार हरिनाम उच्चार । येव्हवीं येरझ्झार हरीविण ॥ ४ ॥

५१ गाबाळाचे ग्रंथीं कां रे पडां सदा । मिथ्या भेदवादा वागवितां ॥ १ ॥ संसारगाबाळीं पडसी निवळ । जालासी तूं खळ तेणें मानें ॥ २ ॥ साधनसंकटीं गुंतसी कासया । व्यर्थ गा अपायामाजीं[2] गुंती ॥ ३ ॥ निर्मळ फुकाचें नाम गोविंदाचें । अनंतजन्मांचे[1] फेडी मळ ॥ ४ ॥ तुका ह्मणे नको करूं कांहीं कष्ट । नाम वाचें स्पष्ट हरि बोले ॥ ५ ॥

५२ विठोबाचें नाम ज्याचे मुखीं नित्यें[3] । त्या देखिल्या पतित उद्धरती ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल भावें म्हणे वाचें । तरी तो काळाचे दांत ठेंची ॥ २ ॥ बहुत तारिले सांगों किती

१ जन्ममरण. २ दुःखामाजीं. ३ सदोदित.

आतां । ऐसा कोणी दाता दुजा नाहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे म्यांही ऐकोनियां कीर्ती । धरि-
ला एकांतीं हृदयामाजीं ॥ ४ ॥

५३ विटेवरी समचरण । तो हा रुक्मिणी-
रमण ॥ १ ॥ वेदशास्त्रां माहेर । केले दासा
उपकार ॥ २ ॥ नामापाशीं चारी मुक्ति[1] । प-
हा हृदयीं प्रतीति ॥ ३ ॥ तुका म्हणे कळा ।
अंगीं जयाच्या सकळा ॥ ४ ॥

५४ काळ सार्थक केला त्यांणीं । धरिला
मनीं विठ्ठल ॥ १ ॥ नाम वाचें श्रवण कीर्ति ।
पाउलें चित्तीं समान ॥ २ ॥ कीर्तनाचा स-
मारंभ । निर्दंभ सर्वदा ॥ ३ ॥ तुका म्हणे
स्वरूपसिद्धि । नित्य समाधि हरिनामीं ॥४॥

५५ तरी कां पवाडे गर्जती पुराणें । अस-
ता नारायण शक्तिहीन ॥ १ ॥ कीर्तीविण
नाहीं नामाचा डांगोरा । येर कां इतरां वा-
णीत ना ॥ २ ॥ तरीच ह्मणा तो आहे चिरं-
जीव । केलियाचा जीव सुखी गुण ॥ ३ ॥

---

१ सरूपता, समीपता, सलोकता, सायुज्यता या ४ मुक्ति.

चांगलेंपण हें निरुपमता[1] अंगी । बाणलें श्रीरं-गीं ह्मणऊनी ॥ ४ ॥ तरीच हा थोर सांगितलें करी । अभिमान हरीपाशीं नाहीं ॥ ५ ॥ तुका म्हणे तरी करिती याची सेवा । देवापाशीं हेवा[2] नाहीं कुडें ॥ ६ ॥

५६ जन्मा येणें घडे पातकाचे मूळें । संचिताचें फळ आपुलिया ॥ १ ॥ मग वायांविण दुःख वाहों नये । रुसोनियां काय देवावरी ॥ २ ॥ ठाउकाची आहे संसार दुःखाचा । चित्तीं शीण याचा वाहों नये ॥ ३ ॥ तुका म्हणे त्याचें नाम आठवावें । तेणें विसरावें जन्मदुःख ॥ ४ ॥

५७ नाम न वदे ज्याची वाचा । तो लेंक दों[3] बापांचा ॥ १ ॥ हेचि ओळख तयाची । खूण जाणा अभक्ताची ॥ २ ॥ ज्यासि विठ्ठल नाहीं ठावा । त्याचा संग न करावा ॥ ३ ॥ ठावा नाहीं पांडुरंग । जाणा जातीचा तो मांग ॥ ४ ॥ नाम न म्हणे ज्याचें तोंड । तेंचि

१ उपमाराहित्य. २ मत्सर. ३ दोन.

चर्मकांचें[1] कुंड ॥ ५ ॥ तुका म्हणे त्याच दि-
वशीं । रांड गेली माहारापाशीं ॥ ६ ॥

५८ नामाविण काय वाउगी चावट । वांया वटवट हरीविण ॥ १ ॥ फुकटची[2] सांगे लोकांचिया गोष्टी । राम जगजेठी वाचे नये ॥ २ ॥ मेळवूनि चोंट करी सुरापान । विषयांच्या गुणें माततसे ॥ ३ ॥ बैसोनि टवाळी करी दुजयाची । नाहीं गोविंदाची आठवण ॥ ४ ॥ बळें यम दांत खाय तयावरी । जंव भरे दोरी आयुष्याची ॥ ५ ॥ तुका म्हणे तुला सोडवील कोण । नाहीं नारायण आठविला ॥ ६ ॥

५९ नामधारकासी नाहीं वर्णावर्ण । लोखंड प्रमाण नाना जात ॥ १ ॥ शस्त्र अथवा गोळे भलता प्रकार । परिसीं संस्कार सकळ हेमं[3] ॥ २ ॥ पर्जन्य वर्षतां जीवना वाहवट । तें समसकट गंगे मिळे ॥ ६ ॥ सर्व तें हें जाय गंगाचि होऊन । तैसा वर्णावर्ण नाहीं

१ चांभाराचें. २ हलकट. ३ सोनें.

नामीं ॥ ४ ॥ महापुरीं जैसें जातसे उदक । मध्यें तें तारक नाव जैसी ॥ ५ ॥ तये नावे संगें ब्राह्मण तरती । केवीं तें बुडती अंना[1]मिक ॥ ६ ॥ नाना कष्टजात पडतां हुताशनीं[2] । ते जात होऊनी एकरूप ॥ ७ ॥ तेथें निवडे-ना घुरे[3] कीं चंदन । तैसा वर्णावर्ण नामीं नाहीं ॥ ८ ॥ पूर्वानुवोळख तेंचि पैं मरण । जरि पावे जीवन नामामृत ॥ ९ ॥ नामामृतें जालें मुळींचें स्मरण । सहज साधन तुका ह्मणे ॥ १० ॥

६० नाम दूषी त्याचें नको दरुषण । विष तें वचन वाटे मज ॥ १ ॥ अमंगळ वाणी नायकवे कानीं । निंदेची पोहणी उठे तेथें ॥ २ ॥ काय साच लभ्य त्याचिये वचनीं । कोणत्या पुराणीं दिली ग्वाही ॥ ३ ॥ काय आड लावूं त्याचिया तोंडासी । आतां या जिभेसी काय करूं ॥ ४ ॥ तुका ह्मणे संत न मनिती त्यांस । घेऊं पाहे ग्रास यमदूत ॥ ५ ॥

१ अंत्यजादिक. २ अग्नींत. ३ इतर झाडाचें लांकूड.

६१ तुटे मायाजाळ विघडे भवसिंधु । जरी लागे छंदु हरिनामें ॥ १ ॥ येर कर्म धर्म करितां ये कळी । माजीं तरला बळी कोण सांगा ॥ २ ॥ न पढवे वेद नव्हे शास्त्रबोध । नामाचे प्रबंध पाठ करा ॥ ३ ॥ न साधवे योगें न करवे वैराग्य । साधा भक्तिभाग्य संतसंगें ॥ ४ ॥ नव्हे अनुष्ठान न कळे ब्रह्मज्ञान । करावी सोपान कृष्णकथा ॥ ५ ॥ तुका ह्मणे वर्म दाविये‌लें संतीं । यापरती विश्रांति आणिक नाहीं ॥ ६ ॥

६२ प्रपंचाची पीडा सोसी तो अघोरी । जया क्षणभरी नाम नये ॥ १ ॥ नाम नाठवितो आत्मया रामाचें । धिगें जिणें त्याचें भवमूळ ॥ २ ॥ मूळ तें पापाचें आचरण तयाचें । नाहीं राघवाचें स्मरण त्या ॥ ३ ॥ स्मरण भजन नावडे जयासी । आंदणीया दासी यमदूतां ॥ ४ ॥ चिंतन रामाचें न करी तो दोषी । एकांत तयासी बोलों नये ॥ ५ ॥ नये त्याचा

१ कलीयुग. २ चित्तवृत्ति निरोध ३ सोपी. ४ व्यर्थ.

संग धरूं ह्मणे तुका। धरितां पातका वांटे[1]-
करी ॥ ६ ॥

६३ ह्मणवितां हरी न ह्मणे तयाला। दर-
वडा पडिला देहामाजीं ॥ १ ॥ आयुष्यधन
त्याचें नेलें यमदूतीं। भुलविला निश्चितीं का-
मरंगें ॥ २ ॥ नावडे ती कथा देउळासी जा-
तां। प्रियधनसुता लक्ष तेथें ॥ ३ ॥ कोण
नेतो तयां घटिका दिवसा एका। कां रे ह्मणे
तुका नागवसी ॥ ४ ॥

६४ मंत्र चळे पिसें[2] लागतें सत्वर। अब-
द्ध ते फार तरले नामें ॥ १ ॥ अशौचें[3]तो बा-
धी आणिकां अक्षरां। नाम निदसुरा घेतां
तरे ॥ २ ॥ रागज्ञानघात चुकतां होय वेळ।
नाम सर्वकाळ शुभदायक ॥ ३ ॥ आणिकां
भजना बोलिला निषेध। नाम तें अभेद स-
कळां मुखीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे तपें घालिती
घालणीं। वेश्या उद्धरूनि नेली नामें ॥ ५ ॥

६५ वेदाचें गव्हार न कळे पाठकां। अधि-

१ हिस्सेदार. २ वेड. ३ अपवित्रता.

कार लोकां नाहीं येरां ॥ १ ॥ विठोबाचें नाम सुलभ सोपरें । तारी एकसरें भवसिंधु २ जाणल्या असाध्य मंत्र तंत्र काळ । येर तो सकळ मूढ लोक ॥ ३ ॥ तुका ह्मणे विधिनिषेध लोपला । उच्छेद[2] या जाला मारगाचा ४

६६ वाचें विठ्ठल नाहीं । तोचि प्रेतरूप पाही ॥ १ ॥ धिग त्याचें ज्यालेपण[3] । भार न साहे मेदिन ॥ २ ॥ न बैसे कीर्तनीं । गुण नाइके जो कानीं ॥ ३ ॥ जातां कांटाळे देउळा । तोचि सुना[4] मुखकाळा ॥ ४ ॥ हरिभक्तीविण । त्याचें जळो शाहापण ॥ ५ ॥ तुका ह्मणे तेणें । वंशा आणियेलें उणें ॥ ६ ॥

६७ विठ्ठलनामाचा नाहीं ज्या विश्वास । तो वसे उदास नरकामध्यें ॥१॥ तयासी बोलतां होईल विटाळ । नव जाये तो जळस्नान करितां ॥ २ ॥ विठ्ठल नामाची नाहीं ज्या आवडी । त्याची काळ घडी लेखिताहे ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज विठोबाची आण । जरी प्रतिवचन करिन त्यासी ॥ ४ ॥

---

१ शूद्रादिकांना. २ नाश. ३ जन्माला येणें. ४ कुत्रा.

६८ कर्म धर्म नव्हती सांग । उण्या अंगें पतन[1] ॥ १ ॥ भलत्या काळें नामावळी । सुलभ भोळी भाविकां ॥ २ ॥ प्रायश्चितें पडती पायां । गाती तयां वैष्णवां ॥ ३ ॥ तुका ह्मणे नुपजे दोष । करा घोष आनंदें ॥ ४ ॥

६९ अनुहात ध्वनि वाहे सकळां पिंडीं[2] । राम नाहीं तोंडीं कैसा तरे ॥ १ ॥ सकळां जीवांमाजीं देव आहे खरा । देखिल्या दुसरा विण न तरे ॥ २ ॥ ज्ञान सकळांमाजीं आहे हें साच । भक्तीवीण तेंच ब्रह्म नव्हे ॥ ३ ॥ काय मुद्रा कळल्या कराव्या सांगतां । दीप न लागतां उन्मनीचा[3] ॥ ४ ॥ तुका ह्मणे नका पिंडाचें पाळण । स्थापूं नारायण आतुडेना ५

७० नाम आहे जयापाशीं । जेथें राहे तेथेंचि काशी ॥१॥ ऐसा नामाचा महिमा । जाणे वाल्मीक शंकर उमा ॥२॥ नाम जाणे प्रल्हाद बाळ । जाणे पापी अजामेळ ॥ ३ ॥ नाम जाणे तो नारद । नामें ध्रुवा अक्षय पद ॥ ४ ॥ ना-

१ नरकप्राप्ति. २ देहांत. ३ पांचवी अवस्था.

म गणिकेतें तारी । पशु गजेंद्र उद्धरी ॥ ५ ॥ नाम जाणे हनुमंत । जाणताती महासंत ॥६॥ नाम जाणे शुकमूर्ति । जाणे राजा परिक्षिती ॥ ७ ॥ नाम जाणे तुका । नाहीं संसाराचा धोका[1] ॥ ८ ॥

७१ भोळे भक्त भाव धरिती मानसीं । त्यांसी हृषीकेशी[2] जवळीच ॥ १ ॥ भाव नाहीं मनीं अभाविक सदा । त्याचिया मी खेदा काय सांगों ॥ २ ॥ गणिकेसारिखीं नामें उद्धरिलीं । सज्ञानें पडिलीं खटाटोपीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे काय शुद्ध माझी जाती । थोर केली ख्याती हरिनामें ॥ ४ ॥

७२ हाकेसरसी उडी । घालूनियां स्तंभ फोडी ॥ १ ॥ ऐसी कृपावंत कोण । माझे विठाईवांचून ॥ २ ॥ करितां आठव । धांवोनियां घाली कव ॥ ३ ॥ तुका ह्मणे गीतीं गातां । नामें द्यावी सायुज्यता[3] ॥ ४ ॥

७३ नाम साराचेंही सार । शरणागत य-

१ भीति. २ परमात्मा. ३ चवथी मुक्ति.

मार्किंकर ॥ १ ॥ नाम उत्तम उत्तम । वाचें बोला पुरुषोत्तम ॥ २ ॥ नाम जपतां चंद्रमौळी । नामें तरला वाल्हाकोळी ॥ ३ ॥ तुका ह्मणे वर्णूं काय । तारक विठोबाचे पाय ॥४॥

७४ नामाचे पवाडे बोलती पुराणें । हो-ऊनि कीर्तन तूंचि ठेला ॥ १ ॥ आदिनाथा कंठीं आगळा[1] हा मंत्र । आवडीचें स्तोत्र स-दा घोकी ॥ २ ॥ आगळें हें सार[2] उत्तमा उ-त्तम । ब्रह्मकर्म नाम एक तुझें ॥ ३ ॥ तिहीं त्रिभुवनीं गमन नारदा । हातीं विणा सदा नाम मुखीं ॥ ४ ॥ परिक्षिती मृत्यु सातां दि-वसांचा । मुक्त जाला वाचा उच्चारितां ॥ ५ ॥ कोळियाची कीर्ति वाढली गहनें । केलें रा-मायण रामा आधीं ॥ ६ ॥ सगुण निर्गुण तु-ज ह्मणे वेद । तुका ह्मणे भेद नाहीं नामीं ७

७५ पुराणप्रसिद्ध सीमा । नामतारकमहिमा ॥ १ ॥ मागें[3] जाळी महा दोष । पुढें नाहीं ग-र्भवास ॥ २ ॥ जें निंदिलें शास्त्रें । वंद्य जालें

---

१ श्रेष्ठ. २ मोठी. ३ पूर्वजन्मींचें.

नाममात्रें ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसा । त्रिभुवनीं नामठसा ॥ ४ ॥

७६ गोड जालें पोट धालें । अवचित[1] वाचे आलें । ह्मणतां पाप गेलें । विठ्ठलसें वाचेसी ॥ १ ॥ सत्य माना रे सकळ । उद्धरिला अजामेळ । पातकी चांडाळ । नामासाठीं आपुलिया ॥ २ ॥ चित्त पावलें आनंदा । सुख समाधी तें सदा । ह्मणतां गोविंदा । वेळोवेळां वाचेसी ॥ ३ ॥ हें जाणती अनुभवी । जया चाड[2] तो चोजवी । तुका ह्मणे दावी । रूप तेंचि अरूप ॥ ४ ॥

७७ तुज न भें[3] मी कळिकाळा । मज नामाचा जिव्हाळा ॥ १ ॥ माझा बळिया नेणसी कोण । संतां साहे नारायण ॥ २ ॥ शंख वधिला सागरीं । वेद घेऊनि आला चारी ॥ ३ ॥ कूर्में दैत्य वधिला जेठी । हातपाय लपवी पोटीं ॥ ४ ॥ वाराहरूप धरिलें गाढें । धरा प्रतापें धरिली दाढे ॥ ५ ॥ हिरण्यकश्यप वि-

१ अकस्मात. २ गरज. ३ भीत नाहीं.

दारिला । भक्त प्रल्हाद रक्षिला ॥ ६ ॥ वामन जाला दीनानाथ । बळी पाताळीं घातला दैत्य ॥ ७ ॥ छेदूनियां सहस्र[1]भुजा । कामधेनु आणिली वोजा ॥ ८ ॥ शिळा प्रतापें सागरीं तारी । स्थापी बिभीषण रावण मारी ॥ ॥ ९ ॥ मारोनियां कंसराव । पिता सोडविला वसुदेव ॥ १० ॥ पांचाळी[2]सी गाजितां वैरी । वस्त्रें आपण जाला हरी ॥ ११ ॥ गजेंद्र स्मरे रामराम । त्यासी पाववी वैकुंठधाम ॥ ॥ १२ ॥ तुका ह्मणे हरिरूप जाले । पुन्हां जन्मां नाहीं आले ॥ १३ ॥

७८ तरिलीं बहुतें चुकवूनि आघात । नाम हें अमृत स्वीकारितां ॥१॥ नेणतां सायास शुद्ध आचरण । यातीकुळहीन नामासाटीं ॥२॥ जन्म नांव धरी भक्तीचा पाळणा । आकार कारण याचसाठीं ॥ ३ ॥ असुरीं[3] दाटली पाप होतां फार । मग फेडी भार पृथिवीचा ॥४॥ तुका ह्मणे देव भक्तपण सार । कवतुकवेव्हार तयासाठीं ॥ ५ ॥

१ सहस्रार्जुन. २ द्रौपदी. ३ दैत्यांनीं.

७९ करुणा बहुत तुझिया अंतरा। मज विश्वंभरा कळों आलें ॥ १ ॥ पक्षीयासी तुझें नाम जें ठेविलें। तयें उद्धरिलें गणिकेसी ॥ २ ॥ कुंटिणी ते दोष बहु आचरली। नाम घेतां आली करुणा तुज ॥ ३ ॥ हृदय कोमळ तुझें नारायणा। ऐसें बहुता जनां तारियेलें तुका ह्मणे सीमा नाहीं तुझे दये। कोमळ हृदय पांडुरंगा ॥ ५ ॥

८० तुझिया नामाचा विसर न पडावा। ध्यानीं तो राहावा पांडुरंग ॥ १ ॥ सांगितला मंत्र श्रीरामनामाचा। सर्वकाळ वाचा हेंचि बोले ॥ २ ॥ उफराटें नाम वाल्मीक बोलला। तोही वंद्य[1] केला नारायणें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज तुझाचि भरंवसा। धांवोनियां कैसा येसी देवा ॥ ४ ॥

८१ सर्वसुखा अधिकारी। मुखें उच्चारी हरिनाम ॥ १ ॥ सर्वांगें तो सर्वोत्तम। मुखीं नाम हरीचें ॥ २ ॥ ऐशी उभारिली[2] बाहे। वे-

---

१ वंदन करण्यास योग्य. २ वर केली.

वेळे करी तळमळ । आठवी कृपाळ तये वेळीं ॥ २ ॥ अंतकाळीं ज्याच्या नाम आलें मुखा । तुका म्हणे सुखा पार नाहीं ॥ ३ ॥

८८ सत्य साच खरें । नाम विठोबाचें बरें ॥ १ ॥ जेणें तुटती बंधनें । उभयलोकीं[1] कीर्ति जेणें ॥ २ ॥ भाव ज्याचे गांठीं । त्यासी लाभ उठाउठी ॥ ३ ॥ तुका म्हणे भोळा । जिंकूं जाणे कळिकाळा ॥ ४ ॥

८९ तुटे भवरोग । संचितक्रियमाणभोग १ ऐसें विठोबाचें नाम । उच्चारितां खंडे जन्म ॥ २ ॥ वसों न सके पाप । पळे त्रिविध तो ताप ॥ ३ ॥ तुका म्हणे माया । होय दासी लागे पायां ॥ ४ ॥

९० नाम गोड नाम गोड । पुरे कोडें[2] सकळही ॥ १ ॥ रसना[3] येरां रसां विटे । घेतां वोट अधिक हें ॥ २ ॥ आणिकां रसें मरण गांठी । येणें तुटी संसारा ॥ ३ ॥ तुका ह्मणे आहार जाला । हा विठ्ठल आह्मांसी ॥४

---

१ स्वर्ग व मृत्युलोक. २ कौतुक. ३ जिव्हा.

९१ निजल्यानें गातां उभा नारायण । बै-
सल्या कीर्तन करितां डोले ॥ १ ॥ उभा रा-
होनियां मुखीं नाम वदे । नाचे नाना छंदें
गोविंद हा ॥ २ ॥ मारगीं चालतां मुखीं ना-
म वाणी[1] । उभा चक्रपाणी मागें पुढें ॥ ३ ॥
तुका म्हणे यासी कीर्तनाची गोडी । प्रेमें घा-
ली उडी नामासाठीं ॥ ४ ॥

९२ काय करील तें नव्हे विश्वंभर । सेव-
कां दारिद्र लाज नाहीं ॥ १ ॥ मजपासूनि हें
पडिलें अंतर । काय तो अव्हेर करूं जाणे २
नामाच्या चिंतनें नासी गर्भवास । नेदी करूं
आस[2] आणिकांची ॥ ३ ॥ तुका म्हणे नेणों
किती वाया गेले । तया उद्धरिलें पांडुरंगें ४

९३ आलें फळ तेव्हां राहिलें पिकोन ।
जरी तें जतन होय देंठीं ॥ १ ॥ नामेंचि सि-
द्धि नामेंचि सिद्धि । व्यभिचारबुद्धि न पाव-
तां ॥ २ ॥ चालिला पंथें[3] तो पाववील ठाया ।
जरि आड तया नये कांहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे

---

१ उच्चार करी. २ इच्छा, आशा. ३ मार्ग.

मध्यें पडती आघात[1] । तेणें होय घात हानि लाभ ॥ ४ ॥

९४ ज्याचे गर्जतां पवाडे । कळिकाळ पायां पडे ॥ १ ॥ तो हा पंढरीचा राणा । पुसा सां-चौ-अठरां-जणां[2] ॥२॥ चिंतितां जयासी । भुक्तिमुक्तिकामारी दासी ॥ ३ ॥ वैकुंठासी जावें । तुका ह्मणे ज्याच्या नांवें ॥ ४ ॥

९५ नाम घेतां कंठ शीतळ शरीर । इंद्रियां व्यापार नाठवती ॥ १ ॥ गोड गोमटें हें अमृतासी वाड । केला कईवाड माझ्या चित्तें ॥ २ ॥ प्रेमरसें जाली पुष्ट अंगकांति । त्रिविध सांडिती ताप अंगें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तेथें विकाराची मात । बोलों नये हित सकळांचें ॥ ४ ॥

९६ मुखीं नाम हातीं मोक्ष । ऐसी साक्ष बहुतांसी ॥ १ ॥ वैष्णवांचा माल खरा । तुरतुरा वस्तूसी ॥२॥ भस्म दंड न लगे काठी । तीर्थी आटी भ्रमण ॥ ३ ॥ तुका ह्मणे आड-

---

१ अडचण, संकट. २ सहा शास्त्रें, चार वेद, १८पु.

काठी । नाहीं भेटी देवाचे ॥ ४ ॥

९७ विठ्ठल नावाडा फुकाचा । आळविल्यासाठीं वाचा ॥ १ ॥ कटीं कर जैसे तैसे । उभा राहिला न बैसे ॥२॥ न पाहे सिदोरी । जाती कुळ न विचारी ॥ ३ ॥ तुका ह्मणे भेटी । हाक देतां उठाउठीं ॥ ४ ॥

९८ हो कां दुराचारी[1] । वाचे नाम जो उच्चारी ॥ १ ॥ त्याचा दास मी अंकित । कायावाचामनेंसहित ॥ २ ॥ नसो भाव चित्तीं । हरीचे गुण गातां गीतीं ॥ ३ ॥ करी अनाचार । वाचे हरिनामउच्चार ॥ ४ ॥ हो कां भलतें कुळ । शुचि[2] अथवा चांडाळ ॥ ५ ॥ ह्मणवी हरीचा दास । तुका ह्मणे धन्य त्यास६

९९ जेथें आठवती स्वामीचे ते पाय । उत्तम तो ठाय रम्य स्थळ ॥ १ ॥ रान अथवा घर एकांत लोकांत । समाधान चित्त ते ते घडी ॥ २ ॥ धन्य तो हा काळ सरे आनंदरूप । वाहातां संकल्प गोविंदाचे ॥ ३ ॥ तुका

---

१ दुराचरण करणारा. २ पवित्र.

ह्मणे लाभकाळ तेंचि जीणें । भाग्य नारायणें उत्तम तें ॥ ४ ॥

१०० कस्तूरीचें रूप अति हीनवर । माजीं असे सार मोल तया ॥ १ ॥ आणीकही तैसीं चंदनाचीं झाडें । परिमळें[1] वाढे मोल तयां ॥ २ ॥ काय रूपें असे परीस चांगला । धातु केली मोला वाढ तेणें ॥ ३ ॥ फिरंगी आटितां नये बारा रुके । गुणें मोलें विके सहस्रवरी ॥ ४ ॥ तुका ह्मणे नाहीं जातीसवें काम । ज्याचे मुखीं नाम तोचि धन्य ॥ ५ ॥

१०१ कंठीं नामशिक्का । आतां कळिकाळासी धक्का ॥ १ ॥ रोखा माना कीं शिक्का माना । रोखा शिक्का तत्समाना ॥ २ ॥ रोखा न मना शिक्का न मना । जतन करा नाककाना ॥ ३ ॥ शिक्का न मनी रावण । त्याचें केलें निसंतान ॥ ४ ॥ शिक्का मानी हळाहळ[2] । जालें सर्वांग शीतळ ॥ ५ ॥ तुका ह्मणे नाम शिक्का । पेटीं[3] बैसलों निजसुखा ॥ ६ ॥

---

१ सुवासानें. २ महादेव. ३ गादी.

१०२ पवित्र तें अन्न। हरिचिंतनीं भोजन ॥ १ ॥ येर वेठ्या पोट भरी। काम मशकाचे परी ॥ २ ॥ जेऊनि तो धाला। हरिचिंतनीं केला काला ॥३॥ तुका ह्मणे चवी आलें। जें कां मिश्रित विठ्ठलें ॥ ४ ॥

१०३ प्रेम तेथें वास करी। मुखीं उच्चारितां हरी ॥ १ ॥ प्रेमें यावें तया गांवा। चोजवीत या वैष्णवां ॥ २ ॥ प्रेम पाठी लागे बळें। भक्त देखोनियां भोळे ॥ ३ ॥ प्रेम न वजे[1] दवडितां। शिरे बळें जेथें कथा ॥४॥ तुका ह्मणे थोर आशा। प्रेमधरवीं विष्णुदासा॥५

१०४ वंदूं चरणरज[2] सेवूं उष्टावळी। पूर्वकर्मा होळी करुनी सांडूं ॥१॥ अमुप हे गांठीं बाधूं भांडवल। अनाथा विठ्ठल आह्मां जोगा ॥ २ ॥ अवघे होती लाभ एका या चिंतनें। नामसंकीर्तनें गोविंदाच्या ॥३॥ जन्मरणाच्या खुंटतील खेपा। होईल हा सोपा सिद्धपंथ[3] ॥४॥ गेले पुढें त्यांचा शोधीत मारग। चला

१ न जाय. २ धूळ, माती. ३ साधूंचा मार्ग.

जाऊं माग घेत आह्मी ॥ ५ ॥ तुका ह्मणे घालूं जीवपणा चिरीं । जाऊं त्या माहेरा निजा-चिया ॥ ६ ॥

१०५ नामाची आवडी तोचि जाणा देव । न धरीं संदेह कांहीं मनीं ॥ १ ॥ ऐसें मी हें नाहीं बोलत नेणतां । आणोनि संमता सं-तांचिया ॥ २ ॥ नाम ह्मणे तया आणीक सा-धन । ऐसें हें वचन बोलों नये ॥ ३ ॥ तुका ह्मणे सुख पावे या वचनीं । ज्याचीं शुद्ध दो-न्ही मायबापें ॥ ४ ॥

१०६ हरिनाम वेली पावली विस्तार । फ-ळीं पुष्पीं भार वोल्हावली ॥१॥ तेथें माझ्या मना होईं पक्षिराज । साधावया काज तृप्ती-चें या ॥ २ ॥ मुळींचिया बीजें दाखविली गोडी । लवकरीच जोडी जालियाची ॥ ३ ॥ तुका ह्मणे क्षणक्षणा जातो काळ । गोडी ते रसाळ अंतरेल ॥ ४ ॥

---

१ दगड. २ दूर होईल, दुरावेल.

# कीर्तनपर अभंग.

———:०:———

१ हरिकथे नाहीं । विश्वास ज्याचे ठायीं ॥ १ ॥ त्याची वाणी अमंगळ । कान उंदराचें बीळ ॥ २ ॥ सांडूनी हा रस । करिती आणीक सायास ॥३॥ तुका ह्मणे पिसीं । वाया गेलीं किती ऐसीं ॥ ४ ॥

२ प्रेम अमृताची धार । वाहे देवाही समोर ॥ १ ॥ ऊर्ध्ववाहिनी हरिकथा । मुगुटमणि सकळां तीर्थां ॥ २॥ शिवाचें जीवन। जाळी महादोष कीर्तन ॥ ३ ॥ तुका ह्मणे हरि । इची स्तुति वानी थोरी ॥ ४ ॥

३ आणीक नका करूं चेष्टा । व्हाल कष्टा परपडे ॥ १ ॥ सुखें करा हरिकथा । सर्वथा हे तारील ॥ २ ॥ अनाथाचा नाथ देव । अनुभव सत्य हा ॥ ३ ॥ तुका म्हणे बहुतां रीतीं । धरा चित्तीं सकळ ॥ ४ ॥

---

१ साधनांचे श्रम. २ वेडीं. ३ वर्णन करी.

४ आनंदें कीर्तन कथा करी घोष। आवडीचा रस प्रेमसुख ॥ १ ॥ मज या आवडे वैष्णवांचा संग। तेथें नाहीं लाग कळिकाळाचा ॥२॥ स्वल्प मंत्र वाचे बैसलासे निका[1]। रामकृष्ण सखा नारायण ॥ ३ ॥ विचारितां दुजें वाटे मज लाज। उपदेश काज आणिक नाहीं ॥ ४ ॥ तुका म्हणे चित्त रंगलेंसे ठायीं। माझें तुझ्या पायीं पांडुरंगा ॥ ५ ॥

५ कथा करोनियां द्रव्य घेती देती। तयां अधोगति नरकवास ॥ १ ॥ रवरव कुंभपाक भोगिती यातना। नये नारायणा करुणा त्यांची ॥२॥ असि[2]खड्गधारा छेदिती सर्वांग। तप्तभूमी अंग लोळविती ॥ ३ ॥ तुका म्हणे तयां नरक न चुकती। सांपडले हातीं यमाचिया४

६ कथा देवाचें ध्यान। कथा साधना [3]मंडण। कथे ऐसें पुण्य। आणीक नाहीं सर्वथा ॥ १ ॥ ऐसा साच खरा भाव। कथेमाजीं उभा देव ॥ २ ॥ मंत्र स्वल्प जना। उ-

---

१ उत्तम. २ तरवार. ३ भूषण, शोभा.

च्चारितां वाचें मना । म्हणतां नारायणा । क्षणें जळती महादोष ॥ ३ ॥ भावें करितां कीर्तन । तरे तारी आणीक जन । भेटे नारायण । संदेहें नाहीं म्हणे तुका ॥ ४ ॥

७ कथा दुःख हरी कथा मुक्त करी । कथा याचि बरी विठोबाची ॥ १ ॥ कथा पाप नासी उद्धरिले दोषी । समाधि कथेसी मूढ जना ॥ २ ॥ कथा तप ध्यान कथा अनुष्ठान। अमृत हे पान हरिकथा ॥ ३ ॥ कथा मंत्र जप कथा हरी ताप । कथाकाळीं कांप कळिकाळासी ॥ ४ ॥ तुका म्हणे कथा देवाचें हें ध्यान । समाधि लागोन उभा तेथें ॥ ५ ॥

८ करावें कीर्तन । मुखें गावे हरिचे गुण१ मग कांहीं नव्हे बाधा । काम दुर्जनाची क्रोधा ॥ २ ॥ शांतिखड्ग हातीं । काळासी ते नागविती ॥ ३ ॥ तुका म्हणे दाता सखा । ऐसा अनंतासारिखा ॥ ४ ॥

९ कथा त्रिवेणीसंगम । देव भक्त आणि

१ श्रद्धेनें. २ संशय. ३ फजिती करिती.

नाम । तेथींचें उत्तम । चरणरज वंदितां ॥ १
जळती दोषांचे डोंगर । शुद्ध होती नारीनर ।
गाती ऐकती सादर । जे पवित्र हरिकथा २
तीर्थें तया ठाया । येती पुनीतें न्हावया । प-
र्वकाळ पायां । तळीं वसे वैष्णवां ॥ ३ ॥ अ-
नुपम्य हा महिमा । नाहीं द्यावया उपमा ।
तुका म्हणे ब्रह्मा । नेणे वर्णू या सुखा ॥ ४ ॥

१० कथा हें भूषण जनामध्यें सार । तर-
ले अपार बहुत येणें ॥ १ ॥ नीचिये कुळींचा
उंचा वंद्य होय । हरीचे जो गाय गुणवाद २
देव त्याची माथां वंदी पायधुळी । दीप जा-
ला कुळीं वंशाचिये ॥ ३ ॥ त्याची निंदा क-
री त्याची कुष्ठ वाणी । मुख संवदणी रजे-
काची ॥ ४ ॥ तुका म्हणे नाहीं चोरीचा व्या-
पार । विठ्ठलाचें सार नाम ध्यावें ॥ ५ ॥

११ कीर्तनाच्या सुखें सुखी होय देव । पं-
ढरीचा राव संगीं आहे ॥ १ ॥ भक्त जाय
सदा हरिकीर्ति गात । त्यासवें अनंत हिंडत-

१ पायाची मार्ती. २ शुद्ध, पवित्र. ३ परीट.

से ॥ २ ॥ त्रैलोक्य भ्रमण करीत नारद । त्या-
सवें गोविंद फिरतसे ॥ ३ ॥ नारद मंजुळ
सुस्वरें गीत गाये । मार्गीं चालताहे संगें ह-
रि ॥ ४ ॥ तुका म्हणे त्याला गोडी कीर्तना-
ची । नाहीं आणिकांची प्रीति ऐसी ॥ ५ ॥

१२ खोंकरी आधण होय पाकसिद्धि । हें
तो घडों कधीं शकेचि ना ॥ १ ॥ घापराचे
अंगीं घासितां परिस । न पालटे कीस काढ-
लिया ॥ २ ॥ पालथे घागरीं रिचवितां जळ ।
तुका म्हणे खळ तैसे कथे ॥ ३ ॥

१३ गायत्री विकोन पोट जे जाळिती ।
तयां होय गति यमलोकीं ॥ १ ॥ कन्येचा जे
नर करिती विकरा । ते जाती अघोरा नरक-
पाता ॥२॥ नाम गाऊनियां द्रव्य जे मागती ।
नेणों तया गति कैसी होय ॥ ३ ॥ कैसें हो-
ईल त्यांचें तेच हो जाणती । आम्हांसी संग-
ती नलगे त्यांची ॥ ४ ॥ आमुचा सांगाती
आहे तो श्रीहरि । न लगे दुराचारी तुका म्हणे".

१ फुटकें भांडें. २ सोबती, मित्र.

१७ दीन आणि दुर्बळासी । सुखराशी हरिकथा ॥ १ ॥ तारूं भवसागरींचें । उंचनीचा अधिकार ॥ २ ॥ चरित्र तें उच्चारावें । केलें देवें गोकुळीं ॥ ३ ॥ तुका म्हणे आवडी धरीं । कृपा करी म्हणऊनी ॥ ४ ॥

१८ न राहे क्षण एक वैकुंठीं । क्षीरसागरीं त्रिपुटी । जाय तेथें दाटी । वैष्णवांची धांवोनि ॥ १ ॥ भाविक गे माये भोळें गुणाचें । आवडे तयाचें नाम घेतां तयासी ॥ २ ॥ जो नातुडे कवणियेपरी । तपें दानें व्रतें थोरी । म्हणतां वाचे हरी । राम कृष्ण गोविंदा ॥३॥ चौदा भुवनें जया पोटीं । तो राहे भक्तांचिये कंठीं । करूनियां साटी । चित्त प्रेम दोहींची ॥ ४ ॥ जया रूप ना आकार । धरी नाना अवतार । घेतलीं हजार । नांवें ठेवूनि आपणां ॥ ५ ॥ ऐसा भक्तांचा ऋणी[2] । पाहतां आगमीं[3] पुराणीं । नाहीं तुका म्हणे ध्यानीं । तो कीर्तनीं नाचतसे ॥ ६ ॥

---

१ न सांपडे २ ऋणाइत. ३ शास्त्र.

१४ टाळघोळ सुख नामाचा गजर। घोषें जयजयकार ब्रह्मानंदु ॥ १ ॥ गरुडटके दिंडी पताकांचे भार। आनंद अपार ब्रह्मादिकां २ आनंदें वैष्णव जाती लोटांगणीं। एक एका-हूनि भद्रजाति ॥३॥ तेणें सुखें सुटे पाषाणा पाझर। नष्ट खळ नर शुद्ध होती ॥ ४ ॥ तुका म्हणे सोपें वैकुंठासी जातां। रामकृष्ण कथा हेचि वाट ॥ ५ ॥

१५ त्या हरिदासांची भेटी घेतां। नरका उभयतांसी जाणें ॥ १ ॥ मातेपरीस थोरी कथा। भाड घेतां न लाजे ॥ २ ॥ देतां घेतां नरकवासी। उभयतांसी रवरव ॥ ३ ॥ तुका म्हणे नरकगांवा। जाती हांवो धरोनि ॥ ४ ॥

१६ दया क्षमा शांति। तेथें देवाचि वस-ति ॥ १ ॥ जाय धांवोनियां घरा। राहे धरो-नियां थारा ॥ २ ॥ कीर्तनाचे वाटे। बराडि-या ऐसा लोटे ॥ ३ ॥ तुका म्हणे घडे। पूजा नामें देव जोडे ॥ ४ ॥

---

१ श्रेष्ठकल्याणकर. २ इच्छा.

१७ दीन आणि दुर्बळासी । सुखराशी हरिकथा ॥ १ ॥ तारूं भवसागरींचें । उंचनीचा अधिकार ॥ २ ॥ चरित्र तें उच्चारावें । केलें देवें गोकुळीं ॥ ३ ॥ तुका म्हणे आवडी घरीं । कृपा करी म्हणऊनी ॥ ४ ॥

१८ न राहे क्षण एक वैकुंठीं । क्षीरसागरीं त्रिपुटी । जाय तेथें दाटी । वैष्णवांची धांवोनि ॥ १ ॥ भाविक गे माये भोळें गुणाचें । आवडे तयाचें नाम घेतां तयासी ॥ २ ॥ जो नांतुडे[1] कवणियेपरी । तपें दानें व्रतें थोरी । म्हणतां वाचे हरी । राम कृष्ण गोविंदा ॥३॥ चौदा भुवनें जया पोटीं । तो राहे भक्तांचिये कंठीं । करूनियां साटी । चित्त प्रेम दोहींची ॥ ४ ॥ जया रूप ना आकार । धरी नाना अवतार । घेतलीं हजार । नांवें ठेवूनि आपणां ॥ ५ ॥ ऐसा भक्तांचा ॠणी[2] । पाहतां आगमीं[3] पुराणीं । नाहीं तुका म्हणे ध्यानीं । तो कीर्तनीं नाचतसे ॥ ६ ॥

---

1 न सांपडे २ ऋणाईत. ३ शास्त्र.

१९ न लाहिजे जपें न लाहिजे तपें। आह्मांसी हें सोपें गीतीं गातां ॥ १ ॥ न करितां ध्यान न करितां धारणा। तो नाचे कीर्तनामाजी हरि ॥ २ ॥ जयासी नाहीं रूप आणि आकार। तोचि कटीं कर उभा विटे ॥ ३ ॥ अनंत ब्रह्मांडें जयाचिया पोटीं। तो आह्मां संपुष्टीं भक्तिभावें ॥ ४ ॥ तुका म्हणे वर्म जाणती लडिवाळें। जें होतीं निर्मळें अंतर्बाहीं ५

२० न वजे वाया कांहीं ऐकतां हरिकथा आपण करितां वाया न वजे न ॥१॥ वजे वाया कांहीं देवळासी जातां। देवासी पूजितां वाया न वजे ॥ २ ॥ न वजे वाया कांहीं केलिया तीर्थे। अथवा कां व्रत वाया न वजे ३ न वजे वाया जालें संतांचें दर्शन। शुद्ध आचरण वाया न वजे ॥ ४ ॥ तुका म्हणे भाव असतां नसतां। सायास करितां वाया न वजे

२१ बरवें माझ्या केलें मनें। पंथें येणें निघालें ॥ १ ॥ अभयेंच जावें ठाया। देवराया

---

प्राप्त होणें. २ आंत बाहेर. ३ जात नाहीं.

प्रतापें ॥ २ ॥ साधनाचा न लगे पांग । अवघें सांग कीर्तनें ॥ ३ ॥ तुका म्हणे सत्ता थोरी । कोण करी खोळंबा ॥ ४ ॥

२२ बोलाचा गौरव[1] । नव्हे माझा हा अनुभव ॥ १ ॥ माझी हरिकथा माउली । नव्हे आणिकांसी पांगिली ॥२॥ व्यालो वाढविलें । निजपदीं बैसाविलें ॥ ३ ॥ दाटलो वोरसें । त्रिभुवनीं ब्रह्मरसें ॥ ४ ॥ विष्णु जोडी कर । माथा रजें[2] वंदी हर ॥ ५ ॥ तुका ह्मणे बळ । तोडरीं हा काळिकाळ ॥ ६ ॥

२३ भाग्यालागीं लाचावले । देवधर्म ते राहिले ॥ १ ॥ कथे जातां आळसे मन । प्रपंचाचें मोठें ज्ञान ॥ २ ॥ अखंड प्रीती जायां[3] । नेणे भजनाच्या ठाया ॥ ३ ॥ कथाकीर्तन धनाचें । सर्वकाळ विषयीं नाचे ॥ ४ ॥ तुका ह्मणे पंढरीराया । ऐसे जन्मविले वाया ॥ ५ ॥

२४ भावभक्तिवादें करावें कीर्तन । आशाबद्ध मन करूं नये ॥ १ ॥ अन्न पाणी धन द्र-

१ श्रेष्ठत्व. २ पायधूळ. ३ बायको.

व्य नारायण । विठ्ठलावांचून बोलूं नये ॥२॥ सप्रेम करावें देवाचें कीर्तन । भय द्या सोडून शरीराचें ॥३॥ तरी मग जोडे विठ्ठलनिधान । केलिया कीर्तन सिद्धि पावे ॥ ४ ॥ देव जोडिलिया तया काय उणें । तुका ह्मणे मन धीट करा ॥ ५ ॥

२५ मुंगीचिया घरा कोण धाडी मूळ । देखोनियां गूळ धांव घाली ॥ १ ॥ याचकाविण काय खोळंबला दाता । तोचि धांवे हिता आपुलिया ॥ २ ॥ उदक अन्न काय ह्मणे मज खा ये । भुकेला तो जाये चोजवीत ॥ ३ ॥ व्याधी पिडिला धांवे वैद्याचिया घरा । दुःखाच्या परिहारा आपुलिया ॥ ४ ॥ तुका ह्मणे जया आपुलें स्वहित । करणें तोचि प्रीत धरी कथे ॥ ५ ॥

२६ यम सांगे दूतां । तुह्मां नाहीं तेथें सत्ता । जेथें होय कथा । सदा घोष नामाचा ॥ १ ॥ नका जाऊं तया गांवा । नामधारका-

१ ठेवा. २ आमंत्रण, बोलावणें. ३ नाश.

च्या शिवा। सुदर्शन यावा। घरटी फिरे भों वतीं ॥ २ ॥ चक्र गदा घेउनी हरि। उभा असे त्यांचे द्वारीं। लक्ष्मी कामारी। रिद्धिसिद्धीसहित ॥ ३ ॥ ते बळियाशिरोमणी। हरिभक्त ये मेदिनी[1]। तुका ह्मणे कानीं। यम सांगे दूतांच्या ॥ ४ ॥

२७ या रे नाचों अवघेजण। भावें प्रेमें परिपूर्ण ॥ १ ॥ गाऊं पंढरीचा राणा। क्षेमें[2] देउनि संतजनां ॥ २ ॥ सुख फुकासाठीं। साधे हरिनामबोभाटीं ॥ ३ ॥ प्रेम वांटितो उदार। देतां नाहीं सानाथोर[3] ॥ ४ ॥ पापें पळालीं बापुडीं। काळ झाला देशधडी ॥ ५ ॥ तुका ह्मणे धन्य काळ। आजि प्रेमाचा सुकाळ॥६॥

२८ लावूनियां पुष्टी पोर। आणि करकर कथेमाजीं ॥ १ ॥ पडा पायां करा विनंती। दवडा हातीं धरोनियां ॥ २ ॥ कुर्वाळूनि बैसे मोहें। प्रेम कां हें नाशितसे ॥ ३ ॥ तुका ह्मणे बाटे चित्त। करा फजित ह्मणऊनि ॥ ४ ॥

---

१ पृथ्वी. २ आलिंगन. ३ लहान मोठा.

२९ विठ्ठल मुक्तिदाता । नव्हे मसें हें बोलता ॥ १ ॥ मज न साहावे कानीं । विष उत्तर लागे मनीं ॥ २ ॥ हरिकथेतें धिकारी । शत्रु माझा तो वैरी ॥ ३ ॥ सुना काळतोंडा । जो या देवा ह्मणे धोंडा ॥४॥ अहं ह्मणे ब्रह्म । नेणे भक्तीचें तें वर्म ॥ ५ ॥ तुका ह्मणे क्षण । नको तयाचें दर्शन ॥ ६ ॥

३० साता दिवसांचा जरी जाला उपवासी । तरी कीर्तनासी टाकूं नये ॥ १ ॥ फुटो हें मस्तक तुटो हें शरीर । नामाचा गजर सोडूं नये ॥ २ ॥ शरीराचे होत दोनी तेही भाग । परि कीर्तनाचा रंग सोडों नये ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसा नामीं ज्या निर्धार । तेथें निरंतर देव असे ॥ ४ ॥

३१ लय[1] लक्षी मन न राहे निश्चळ । मुख्य तेथें बळ आसनाचें ॥ १ ॥ हें तों असाध्य[2] जी सर्वत्र या जना । भलें नारायणा आळवितां ॥ २ ॥ कामनेचा त्याग वैराग्य या नांव । कु-

१ अंतःकरणाचा आत्म्याच्या ठाईं लय. २ न साधणें.

टुंब ते सर्व विषयजात ॥ ३ ॥ कर्म उसंतावें चालतां पाउलीं । होय जों राहिली देहबुद्धि ॥ ४ ॥ भक्ति तें नमावें जीवजंतुभूत । शांतवूनि ऊत कामक्रोध ॥ ५ ॥ तुका ह्मणे साध्य साधन अवघडें । देतां हें सांकडें देह बळी ६

३२ सांगतां दुर्लभ ज्ञानाचिया गोष्टी । अनुभव तो पोटीं कैंचा घडे ॥ १ ॥ भजनाचे सोई जगा परिहार । नेणत्या सादर चित्त कथे ॥ २ ॥ नाइकवे कानीं साधन उपाय । ऐकतां गाय हरुषें गीत ॥ ३ ॥ नव्हे आराणूक जावयासी वना । वेध कामी मना हरिकथेचा ॥ ४ ॥ काळाच्या साधना कोणा अंगीं बळ । चिंतना मंगळ अष्टप्रहर ॥ ५ ॥ तुका ह्मणे आह्मी खेळों भातुकुलें । विभागासी मुलें भोळीं येथें ॥ ६ ॥

३३ सांडूनि कीर्तन न करीं आणीक काज । नाचेन निर्लज्ज तुझ्या रंगीं ॥ १ ॥ आवडीचें आर्त पुरवी पंढरीराया । शरण तुझ्या पायीं

१ करति रहावें. २ संकट. ३ विश्रांति. ४ इच्छा.

याचि लागीं ॥ २ ॥ टाळी बाहूनियां विठ्ठल ह्मणेन । तेणें निवारीन भवश्रम ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा नुपेक्षावें आह्मां । न्यावें निजधामा आपुलिया ॥ ४ ॥

---

# उपदेशपर अभंग.

१ आलिया संसारा उठा वेग करा । शरण जा उदारा पांडुरंगा ॥१॥ देह हें काळाचें धन कुबेराचें । तेथें मनुष्याचें काय आहे २ देता देवविता नेता नेवविता । येथें याची सत्ता काय आहे ॥ ३ ॥ निमित्याचा धनी केला असे प्राणी । माझें माझें ह्मणोनि व्यर्थ गेला ॥ ४ ॥ तुका ह्मणे कां रे नाशिवंतासाठीं । देवासवें तुटी पाडितोसी ॥ ५ ॥

२ अरे गिळिलें हो संसारें । कांहीं तरी राखा खरें । दिला करुणाकरें । मनुष्यदेह

---

१ प्रपंच कष्ट. २ न त्यागावें. ३ तुटातूट.

सत्संग ॥ १ ॥ येथें न घे[1]ली न घली आड । संचितसा शब्द नाड । उठाउठीं गोड । बीजें बीज वाढवा ॥ २ ॥ केलें तें क्रियमाण । जालें तें संचित ह्मण । प्रारब्ध जाण । उर्वरित उरलें तें ॥ ३ ॥ चित्त खोटें चालीवरी । रोग भोगाचे अंतरीं । रसने अनावरी । तुका ह्मणे ढुंग वाहे ॥ ४ ॥

३ सांगतों मी तुह्मी भजा रे विठ्ठला । नाहीं तरी गेला जन्म वायां ॥ १ ॥ करितां [2]भरोवरी दुरावसी दुरी । भवाचिये पु[3]रीं वाहावसी ॥ २ ॥ कांहीं नलगे एक भावचि कारण । तुका ह्मणे आण विठ्ठलाची ॥ ३ ॥

४ लाभ जाला बहुतां दिसीं । लाहो करा पुढें नासी । मनुष्यदेहा ऐसी । उत्तम जोडी जोडिली ॥ १ ॥ घेई हरिनाम सादरें । भरा सुखाचीं भांडारें । जालिया व्यापारें । लाहो हेवा जोडीचा ॥१॥ घेउनि माप हातीं । काळ [4]मोवी दिवत राती । चोर लाग घेती ।

---

१ घालूं नको. २ खटपट. ३ पुरामध्यें. ४ मोजी.

पुढें तैसें पळावें ॥३॥ हित सावकाशें । ह्मणे करीन तें पिसें[1] । हातीं काय ऐसें । तुका ह्मणे नेणासी ॥ ४ ॥

५ बहुत सोसिलें मागें न कळतां । पुढतीं काय आतां अंध व्हावें ॥ १ ॥ एकाचिये अंगीं हें ठेवावें लावून । नये भिन्न भिन्न चांचपडों ॥२॥ कोण होईल तो ब्रह्मांडचाळक । आपणचि हाक देइल हाके ॥ ३ ॥ तुका ह्मणे दिलीं चेतवूनि सूनीं[2] । कौतुकावांचूनि नाहीं स्थळ ॥ ४ ॥

६ मोलाचें[3] आयुष्य वेचूनियां जाय । पूर्वपुण्यें होय लाभ याचा ॥ १ ॥ अनंत जन्मींचे शेवट पाहतां । नर देह हातां आला तुझ्या ॥ २ ॥ कराल ते जोडी येईल कार्यासी । ध्यावें विठ्ठलासी सुखालागीं ॥ ३ ॥ सांचलिया धन होईल ठेवणें । तैसा नारायण जोडी करा ॥ ४ ॥ करा हरिभक्ति परलोकीं ये कामा । सोडवील यमापासोनियां ॥ ५ ॥

---

१ मूर्ख, वेडें. २ कुत्रीं. ३ किंमतवान.

तुका ह्मणे करा आयुष्याचें मोल । नका वेंचूं बोल नामेंविण ॥ ६ ॥

७ येऊनि नरदेहा झांकितील डोळे । बळेंचि अंधळे होती लोक ॥ १ ॥ उजेडासरसी न चलती वाट । पुढील बोभाट जाणोनियां ॥ २ ॥ बहु फेरे आले सोसोनि बोळसा । पुढें नाहीं ऐसा लाभ मग ॥ ३ ॥ तुका ह्मणे जाऊं सादावीत वाट । भेटे तरी भेटो कोणी तरी ॥ ४ ॥

८ विषयाचें सुख एथें वाटे गोड । पुढें अवघड यमदंड ॥ १ ॥ मारिती तोडिती झोडिती निष्ठुर । यमाचे किंकर बहुसाल ॥२॥ असिपत्रीं तरुवर खैराचे इंगळ । निग्रतील ज्वाळ तैलपाकीं ॥३॥ तप्तभूमीवरि लोळविती पाहीं । अग्निस्तंभ बाहीं कवटाळविती ४ ह्मणऊनियां तुका येतो काकुलती । पुरे यातायाती गर्भवास ॥ ५ ॥

९ कां रे तुह्मी निर्मळ हरिगुण गाना ।

---

१ विचारीत. २ तलवारीचीं पानें. ३ हातानीं.

नाचत आनंदरूपें वैकुंठासी जाना ॥१॥ काय गणिकेच्या [1]याती अधिकार मोठा । दोषी अजामेळ ऐसा नेला वैकुंठा ॥ २ ॥ ऐसें नेणों मागें किती अनंत अपार । पंच महादोषी पातकां नाहीं पार ॥ ३ ॥ पुत्राचिया लोभें नष्ट ह्मणे नारायण । कोण कर्तव्य तुका ह्मणे त्याचें पुण्य ॥ ४ ॥

१० कां रे न भजसी हरी । तुज कोण अंगीकारी ॥ १ ॥ होइल यमपुरी । यमदंड यातना ॥ २ ॥ कोण जाली [2]लगबग । काय करिसी तेथें मग ॥ ३ ॥ कां रे भरला ताठा । करिसी बोज नेतां वाटा ॥ ४ ॥ तोंडा पडिली खिळणी । जिव्हा पिटिती वोढूनि ॥ ५ ॥ कां रे पडिली जनलाज । कोण सोडवील तुज ॥ ६ ॥ लाज धरी ह्मणे तुका । नको वाया जाऊं फुका ॥ ७ ॥

११ कां रे नाठविसी कृपाळु देवासी । पोषितो जनासी एकला तो ॥ १ ॥ बाळा दुधा

---

१ जाती. २ त्वरा, उतावळी.

कोण करितें उत्पत्ती । वाढवी श्रीपति सर्वै दोन्ही ॥ २ ॥ फुटती तरुवर[1] उष्णकाळमासीं । जीवन तयांसी कोण घाली ॥ ३ ॥ तेणें तुझी काय नाहीं केली चिंता । राहे त्या अनंता आठवूनि ॥ ४ ॥ तुका ह्मणे ज्याचें नाम विश्वंभर[2] । त्याचें निरंतर ध्यान करी ॥ ५ ॥

१२ देवाचें भजन कां रे न करीसी । अखंड ह्व्यासीं पीडतोसी ॥ १ ॥ देवासी शरण कां रे न वैजसी[3] तैसा । बक मीना जैसा मनुष्यालागीं ॥ २ ॥ देवाचा विश्वास कां रे नाहीं तैसा । पुत्रस्नेहें जैसा गुंतलासी ॥ ३ ॥ कां रे नाहीं तैसी देवाची हे गोडी । नागवूनि सोडी पत्नी जैसी ॥ ४ ॥ कां रे नाहीं तैसे देवाचे उपकार । माया मिथ्या भार पितृपूजना ॥ ५ ॥ कां रे भय वाहासी लोकांचा धाक । विसरोनि एक नारायण ॥ ६ ॥ तुका ह्मणे कां रे घातलेंसे वाया । अवघें आयुष्य जाया भक्तिविण ॥ ७ ॥

---

१ झाडें. २ विश्वाचें भरणकरणारा. ३ नजासी.

१३ बहुतां जन्मां अंतीं । जोडी लागली हे हातीं ॥ १ ॥ मनुष्यदेहा ऐसा ठाव । धरी पांडुरंगीं भाव ॥ २ ॥ बहु केला फेरा । येथें सांपडला थारा ॥ ३॥ तुका ह्मणे जाणे । ऐसे भले ते शहाणे ॥ ४ ॥

१४ रामनाम हाचि मांडिला दुकान । आहे वाणोवाण घ्यारे कोणी ॥ १ ॥ नका कोणी करूं घेतां रे आळस । वांटतो तुह्मांस फुकाचें हें ॥ २ ॥ संचितासारिखें[1] पडे त्याच्या हाता । फारसें मागतां तरी न ये ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मीं सांठविलें सार । उरलिया थार विचारितां ॥ ४ ॥

१५ कोणें तुझा सांग केला अंगीकार । निश्चिंति त्वां थोर मानियेली ॥ १ ॥ कोणें ऐसा तुज उपदेश केला । नको या विठ्ठला शरण जाऊं ॥ २ ॥ तेव्हां तुज कोण घालील पाठीसी । घासील भूमीसी वदन[2] यम ॥ ३ ॥ कारे नागवसी[3] आयुष्य खातो काळ । दिसे-

---

१ जवळील संचय, सांठा. २ मुख. ३ व्यर्थ जालोस.

दिस बळ क्षीण होतें ॥ ४ ॥ तुका ह्मणे यासि सांगा कोणी तरी । विसरला हरी मायबाप५

१६ दुःखाचे डोंगर लागती सोसावे। ऐसें तंव ठावें सकळांसी ॥ १ ॥ कांहीं न करिती विचार हिताचा । न करिती वाचा नामघोष ॥ २ ॥ भोग कळों येतो मागील ते जन्म । उत्तम मध्यम कनिष्ठ ते ॥ ३ ॥ तुका ह्मणे येथें झांकितील डोळे । भोग देते वेळे येईल कळों ॥ ४ ॥

१७ ह्मणतां हरिदास कां रे वाटे लाज । दीनासी महाराज म्हणसी हीनां[1] ॥ १ ॥ काय ऐसें पोट न भरेसें झालें। हालविसी कुले सभेमाजी ॥ २ ॥ तुका ह्मणे पोटें केली विटंबना । दीन जाला जना कींव भाकी ॥ ३ ॥

१८ ह्मणसी नाहीं रे संचित । न करी न करी ऐशी मात ॥ १ ॥ लाहो घेई हरिनामाचा । जन्म जाऊं नेदी साचा[2] ॥ २ ॥ गळा पडेल यमफांसा । मग कैंचा हरि ह्मणसी ॥

१ हलकटाला. २ खरा, उत्तम.

॥ ३ ॥ पुरलासाठी देहाडा । ऐसें न ह्मणे न ह्मणे मूढा ॥४॥ नरदेह दुबळा । ऐसें न ह्मणे रे चांडाळा ॥ ५ ॥ तुका ह्मणे सांगों किती । शेखीं[1] तोंडीं पडेल माती ॥ ६ ॥

१९ देहीं असोनियां देव । वृथा फिरतो मानव ॥ १ ॥ देव आहे अंतर्यामीं[2] । व्यर्थ हिंडे तीर्थग्रामीं ॥ २ ॥ नाभी मृगाचे कस्तुरी । व्यर्थ हिंडे वनांतरीं ॥ ३ ॥ साकरेचें मूळ ऊस । तैसा देहीं देव दिसे ॥ ४ ॥ दुधीं असतां नवनीत । नेणे तयाचें मथित ॥ ५ ॥ तुका सांगे मूढजना । देहीं देव कां पाहाना ॥ ६ ॥

२० कां रे दाटोन होतां वेडे । देव आहे तुह्मांपुढें ॥१॥ ज्यासि पाठ नाहीं पोट । करी त्रैलोक्याचा घोंट ॥ २ ॥ तुमची तुह्मां नाहीं सोय । कोणाचें बा काय जाय ॥ ३ ॥ तुका गातो नामीं । तेथें नाहीं तुह्मी आह्मी ॥ ४ ॥

२१ कां रे दास होसी संसाराचा खरें[3] । दुःखाचे डोंगर भोगावया ॥ १ ॥ मिष्टान्नाची

---

१ शेवटीं. २ हृदयांत. ३ गाढव.

गोडी जिव्हेचा आगरीं । मसकं[1] भरल्यावरी स्वाद नेणे ॥ २ ॥ आणीकही भोग आणिकां इंद्रियांचे । नाहीं ऐसे साचे जवळी कांहीं ३ रूप दृष्टि धायें[2] पाहातां पाहातां । न घडे सर्वथा आणि तृष्णा ॥४॥ तुका ह्मणे कां रे नाशिवंतासाठीं । देवासवें तुटी करितोसी ॥५॥

२२ माझें ह्मणतां याला कां रे नाहीं लाज। कन्या पुत्र भाज धन वित्त ॥ १ ॥ कोणी सोडवीना काळाचे हातींचे । एकाविणें साचें नारायणा ॥ २ ॥ तुका ह्मणे किती सांगावें चांडाळा । नेणे जीवकळा कोण्या जीतो ॥३॥

२३ करूनि जतन। कोणा कामा आलें धन ॥ १ ॥ ऐसें जाणतां जाणतां । कां रे होतोसी नेणता ॥ २ ॥ प्रिया पुत्र बंधु । नाहीं तुज यांशीं संबंधु ॥ ३ ॥ तुका ह्मणे एका । हरीविण नाहीं सखा ॥ ४ ॥

२४ आयुष्य वेंचूनि[3] कुटुंब पोसिलें । काय हित केलें सांग बापा ॥ १ ॥ फुकाचा चाकर

१ रोग झाल्यावर. २ तृप्त होय. ३ खर्चून.

जालासी कावाडी । नाहीं सुख घडी भोगावया ॥ २ ॥ दुर्लभ मनुष्यजन्म कष्टें पावलासी । दिला कुटुंबासी कामभोग ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसें आयुष्य नासिलें । पाप तें सांचिलें पतनासी[1] ॥ ४ ॥

२५ कां रे माझीं पोरें ह्मणसील ढोरें । मायबाप खरे काय एक ॥ १ ॥ कां रे गेले ह्मणोनि करिसी तळमळ । मिथ्याचि कोल्हाळ मेलियाचा ॥ २ ॥ कां रे माझें माझें ह्मणसील गोत । सोडवीना दूत यमाहातीं ॥ ३ ॥ कां रे मी बळिया ह्मणविसी ऐसा । सरणो[2]पाशीं कैसा उचलविसी ॥ ४ ॥ तुका ह्मणे न धरी भरंवसा कांहीं । वेगीं शरण जाई पांडुरंगा ॥ ५ ॥

२६ एक शेरा अन्ना चाडे[3] । येर वाउगी बडबड ॥ १ ॥ कां रे तृष्णा वाढविसी । बांधवूनि मोहपाशीं ॥२॥ औट हात तुझा जागा । येर शिणसी वाउगा ॥ ३ ॥ तुका ह्मणे श्रम । एक विसरतां राम ॥ ४ ॥

---

१ नरकांत पडण्यास. २ चिता. ३ गरज.

२७ नित्य उठोनियां खायाचीच चिंता। आपुल्या तूं हिता नाठविसी ॥ १ ॥ जननीचे पोटीं उपजलासि जेव्हां । चिंता तुझी तेव्हां केली तेणें ॥ २ ॥ चातकांलागूनि मेघ नित्य वर्षे । तो तुज उदास करील केवीं ॥ ३ ॥ पक्षी वनचरें आहेत भूमीवरी । तयालागीं हरि उपेक्षीना ॥४॥ तुका ह्मणे भाव[1] धरून राहे चित्तीं । तरी तो श्रीपति उपेक्षीना ॥ ५ ॥

२८ आलें घरा येच पेंटे। पुढें मागुतें न भेटे ॥१॥ होसी फजीती वरपडा । लक्ष चौऱ्यासीचे वेढां ॥ २ ॥ नाहीं कोणाचा सांगात । दुःख भोगितां आघात ॥ ३ ॥ एका पाउलाची वाट । कोणा सांगावा बोभाट ॥ ४ ॥ जुंति[2]जेसी घाणां । नाहीं मारित्या करुणा ५ तुका ह्मणे हित पाहे । जोंवरी हें हातीं आहे ६

२९ देवाचिये चाडे प्रमाण उचित । नये वांटूं चित्त निषेधासी॥१॥नये राहों उभें कश्मे[3]ळापाशीं । भुंकतील तैसीं सांडावीं तीं ॥२॥

---

१ श्रद्धा. २ जुंपला जातोस. ३ नीचापाशीं.

तुका ह्मणे क्षमा सुखाची हे राशी । सांडूनि कां ऐसी दुःखी व्हावें ॥ ३ ॥

३० सोइरे धाइरे दिल्या घेतल्याचे । अंत हे काळींचें नाहीं कोणी ॥ १ ॥ सख्या गोत्र बहिणी सुखाचे संगती । मोकलुनी[1] देती अंतकाळीं ॥ २ ॥ आपुलें शरीर आपणा पारिखें । परावीं होतील नवल काई ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां सोड यांची आस । धरी रे या कास पांडुरंगा ॥ ४ ॥

३१ मैत्र केले महाबळी[2] । कामा न येती अंतकाळीं ॥ १ ॥ आधीं घे रे रामनाम । सामा भरीं हा उत्तम ॥ २ ॥ नाहीं तरी यम । दांत खातो करकरा ॥ ३ ॥ धन मेळविलें कोडी । काळ घेतल्या न सोडी ॥ ४ ॥ कामा न ये हा परिवार । सैन्य लोक बहु फार ॥ ५ ॥ तंववरी मिरविसी बळ । जंव आला नाहीं काळ ॥ ६ ॥ तुका ह्मणे बापा । चुकवी चौऱ्यांशीच्या खेपा ॥ ७ ॥

---

१ सोडूनि देती. २ मोठा बलवान्.

३२ हरीविण जिणें[1] व्यर्थचि संसारीं । प्रेत अळंकारीं मिरवत ॥ १ ॥ देवाविण शब्द व्यर्थचि कारण । भांडें[2] रंजवण सभेसि गा ॥२॥ आचार करणें देवाविण जो गा । सर्पाचिया अंगा मृदुपण ॥ ३ ॥ तुका ह्मणे काय बहु बोलों फार । भक्तीविण नर अभाग्य कीं ॥ ४

३३ भक्तीवीण जिणें जळो लाजिरवाणें । संसार भोगणें दुःखमूळ ॥ १ ॥ वीस लक्ष योनि वृक्षांमाजीं घ्याव्या । जलचरीं भोगाव्या नवलक्ष ॥ २ ॥ अकरा लक्ष योनि किड्यांमाजीं घ्याव्या । दशलक्ष भोगाव्या पक्ष्यांमध्यें ॥ ३ ॥ तीस लक्ष योनि पशूंचिये घरीं । मानवांभीतरीं[3] चार लक्ष ॥ ४ ॥ एकएक योनी कोटि कोटि फेरा । मनुष्यदेहाचा वारा मग लागे ॥ ५ ॥ तुका ह्मणे तेव्हां नरदेह नरा । तयाचा मातेरा केला मूढें ॥ ६ ॥

३४ नरदेह वाया जाय । सेवीं सद्गुरूचे पाय ॥ १ ॥ सांडोनियां अहंभाव । धरी भ-

---

१ जगणें. २ भाट, स्तुतिपाठक. ३ मध्यें.

क्ती पूजी देव ॥ २ ॥ थोराचिये वाटे । जातां भवशोक आटे ॥ ३ ॥ प्रल्हादातें तारी । तुका ह्मणे कंठीं धरी ॥ ४ ॥

३५ आठवे देव तो करावा उपाव । येर त्यजीं वांव[1] खटपट ॥१॥ होई बा जागा होई बा जागा । वाउगा कां गा शिणसील ॥ २ ॥ जाणिवेच्या भारें भवाचिये डोहीं । बुडसी तो कांहीं निघसि ना ॥३॥ तुका ह्मणे देवा पावशील भावें । जाणतां तें ठावें कांहीं नव्हे ॥४॥

३६ दिर्कोचि[2] या नाहीं संसारसंबंधा । तुटेना या बाधा भवरोगाची ॥ १ ॥ तांतडीं ते करीं ह्मणउनि तातडी । साधिली ते घडी सोनियाची ॥ २ ॥ संकल्पाच्या बीजें इंद्रियांची चाली[3] ॥ । प्रारब्ध तें घाली गर्भवासीं ॥ ३ ॥ तुका म्हणे बीजें जाळुनी सकळ । करावा गोपाळ आपुला तो ॥ ४ ॥

३७ काळ जवाळिच उभा नेणां । घाली झांपड खुंटी कानां ॥ १ ॥ कैसा हुशार सा-

---

१ व्यर्थ. २ दिक्कत, पर्वा. ३ राहाटणें.

वध राही । आपुला तूं आपुले ठायीं ॥ २ ॥ काळ जंवळीच पाहीं । नेदि कोणासि देऊं कांहीं ॥ ३ ॥ काळें पुरविली पाठी । वरुषें झालीं तरी साठी ॥ ४ ॥ काळ भोंवताला [1]भोंवे । राम येऊं नेदी जिव्हे ॥ ५ ॥ तुका म्हणे काळा । कर्म मिळतें तें जाळा ॥ ६ ॥

३८ सोसें बहु गर्भवासीं । मेलों असों उपवासीं । नाहीं सखीं ऐशीं । तेथें कोणी भेटलीं ॥ १ ॥ करी करी रे स्वहित । देह तंव हे अनित्य[2] । नाहीं दिलें चित्त । सोडवूं मोहापासोनि ॥ २ ॥ पाळी तोंडींचिया घासें । तोंचि होय अनारिसें । ज्या नव्हे ऐसें । खेदों परी सोडवीना ॥ ३ ॥ तुका ह्मणे धनमानें । माझ्या बाटलों मीपणें । नाहीं दिला जनें । देखों लाभें हा लाभ ॥ ४ ॥

३९ मृगजळ दिसे साचपणा[3] ऐसें । खोटियाचें पिसें ऊर फोडी ॥ १ ॥ जाणोनि कां करा आपुलाले घात । विचारा रे हित लव-

---

१ फिरे. २ नाशिवंत. ३ खऱ्यासारखें.

ळाहीं ॥ २ ॥ तुका म्हणे शेखीं श्मशान तों-
वरी । संबंध गोवरी अगीसवें ॥ ३ ॥

४० आपुलिया आंगें तोडी मायाजाळ ।
ऐसें नाहीं बळ कोणापाशीं ॥ १ ॥ रांडा पोरें
त्याग करी कुटुंबाचा । नावरे हे वाचा आणि
मन ॥ २ ॥ हर्षामर्ष[1][2] जों हे नाहीं पैं जिराले[3] ।
तोंवरी हे केले चार त्यांनीं ॥ ३ ॥ मुक्त जा-
लों ऐसें बोलों जाये मुखें । तुका ह्मणे दुःखें
बांधला तो ॥ ४ ॥

४१ वांटा घेई लवकरी । मागें अंतरसी
दुरी ॥ केली भरोवरी । सार नेती आणीक
॥ १ ॥ ऐसीं भांबावलीं किती । काय जाणों
नेणों किती ॥ समय नेणती । माथां भार वा-
होनि ॥ २ ॥ नाहीं सरिलें तोंवरी । धांव घेई
वेग करी ॥ घेतलें पदरीं । फावलें तें आपुलें
॥ ३ ॥ फट लंडी ह्मणे तुका । एक न साहावे
धका ॥ तरीच या सुखा । मग कैसा पावसी४

४२ न लगे द्यावा जीव सहजचि जाणार।

---

१ महत्व. २ क्रोध. ३ प्राप्त झालें.

आहे तो विचार जाणा कांहीं ॥ १ ॥ मरण जो मागे गाढवाचा बाळ । बोलिजे चांडाळ शुद्ध त्यासी ॥ २ ॥ तुका ह्मणे कई होईल स्वहित । निधान[1] जो थीत टाकूं पाहे ॥ ३ ॥

४३ देवाचे ह्मणोनि देवीं अनादर । हें मोठें आश्चर्य वाटतसे ॥ १ ॥ आतां येरा जना ह्मणावें तें काई । जया भार डोई संसाराचा ॥ २ ॥ त्यजुनी संसार अभिमान सांठा । जुलूम हा मोठा दिसतसे ॥३॥ तुका ह्मणे आळस करूनियां साहे । बळें कैसें पाहे वायां जाती ॥ ४ ॥

४४ वाटे या जनाचें थोर बा आश्चर्य । न करिती विचार कां हिताचा ॥ १ ॥ कोण दम ऐसा आहे यांचे पोटीं । येईल शेवटीं कोण कामा ॥ २ ॥ काय मानूनियां राहिले निश्चिंती[2] । काय जाब देती यमदूतां ॥ ३ ॥ कां हीं विसरलीं मरण बापुडीं[3] । काय यांसी गोडी लागलीसे ॥ ४ ॥ काय हातीं नाहीं करील

---

१ ठेवा. २ चिंताराहित्य. ३ गरीब.

तयासी । काय जालें यांसी काय जाणों ॥५॥ कां हीं नाठविती देवकीनंदना । सुटाया बंधनापासूनियां ॥ ६ ॥ काय मोल यासी लागे धन वित्त । कां हें यांचें चित्त घेत नाहीं ॥७॥ तुका ह्मणे कां हीं भोगितील खाणी[1] । कां त्या चक्रपाणी विसरलीं ॥ ८ ॥

४५ इच्छेचें पाहिलें । डोळीं अंतीं मोकलिलें ॥ १ ॥ यांचा विश्वास तो काइ । ऐसें बिचारूनि पाहीं ॥ २ ॥ सुगंध अभ्यंगें पाळितां । केश फिरले जाणतां ॥ ३ ॥ पिंड पाळितां ओसरे । अवघी घेऊनि मागें सरे ॥ ४ ॥ करितां उपचार । कोणा नाहीं उपकार ॥५॥ अल्प जीवन करी । तुका ह्मणे साधीं हरी ६

४६ पडिली हे रूढि जगा परिचार । चालविती वेव्हार सत्य ह्मणू ॥ १ ॥ मरणाची कां रे नाहीं आठवण । संचिताचा धन लोभ हेवा ॥ २ ॥ देहाचें भय तें काळाचें भातुकें । त्रासूनि तें एकें ठेविलेंसे ॥ ३ ॥ तुका ह्मणे

1 उद्भिज, जारज, स्वेदज, अंडज या चार खाणी.

कांहीं उघडा रे डोळे । जाणोनि अंधळे होऊं नका ॥ ४ ॥

४७ कैं वाहावें जीवनें[1] । कैं पलंगीं शयन ॥ ॥ १ ॥ जैशी जैशी वेळ पडे । तैसें तैसें होणें घडे ॥ २ ॥ कैं भोज्यें[2] नानापरी । कैं कोरड्या भाकरी ॥ ३ ॥ कैं बसावें वहनीं । कैं पार्यी अन्हवाणी ॥ ४ ॥ कैं उत्तम प्रावर्णें । कैं वसनें तीं जीर्णें ॥ ५ ॥ कैं सकळ संपत्ती । कैं भोगणें विपत्ती ॥ ६ ॥ कैं सज्जनाशीं संग । कैं दुर्जनाशीं योग ॥ ७ ॥ तुका ह्मणे जाण । सुख दुःख तें समान ॥ ८ ॥

४८ हरि हरि तुह्मी ह्मणारे सकळ । तेणें मायाजाळ तुटईल ॥१॥ आणिका नका कांहीं गाबाळाचे भरीं । पडों येथें थोरी नागवण ॥ ॥ २ ॥ भावें[3] तुळसीदळ पाणी जोडा हात । ह्मणावा पतित वेळोवेळां ॥ ३ ॥ तुका ह्मणे हा तंव कृपेचा सागर । नामासाठीं पार पावील ॥ ४ ॥

---

१ पाणी. २ खाण्याचे पदार्थ. ३ श्रद्धेनें.

४९ एक पाहातसां एकाचीं दहनें[1]। साव-
ध त्या गुणें कां रे नव्हा ॥ १ ॥ मारा हाक
देवा भय अटाहासें। जंव काळाऐसें जालें
नाहीं ॥ २ ॥ मरणाची तंव गांठोडी पदरीं।
जिणें तोंचि वरि माप भरे ॥ ३ ॥ तुका ह्मणे
धिग वाहाती मारग। अंगा आलें मग हा-
लों नेदी ॥ ४ ॥

५० सकळिकांच्या पायां माझी विनवणी।
मस्तक चरणीं ठेवीतसे ॥ १ ॥ अहो श्रोते व-
क्ते सकळही जन। बरें पारखून[2] बांधा गांठी २
फोडिलें भांडार धन्याचा हा माल। मी तंव
हामाल भारवाही ॥ ३ ॥ तुका ह्मणे चाली
जाली जहूं देशीं। उतरला कसीं खरा माल४

५१ नका घालूं दुध जयामध्यें सार। ता-
काचे उपकार तरी करा ॥१॥ नेदा तरी हें हो
नका देऊं अन्न। फुकाचें जीवन तरी पाजा २
तुका ह्मणे मज सगुणाची चाड[3]। पुरवा को-
णी कोड दुर्बळाचें ॥ ३ ॥

---

१ जळणें. २ परीक्षा करून. ३ इच्छा.

५२ अरे हें देह व्यर्थ जावें। ऐसें जरी तुज व्हावें। द्यूतकर्म मनोभावें। सारीपाट[1] खेळावा ॥ १ ॥ मग कैंचें हरिचें नाम। निजेलिया जागा राम। जन्मोजन्मींचा अधम। दुःख थोर साधिलें ॥ २ ॥ विषयसुखाचा लंपट। दासीगमनीं अतिधीट। तया तेचि वाट। अधोगती[2] जावया ॥ ३ ॥ अणीक एक कोड। नरका जावयाची चाड। तरी संतनिंदा गोड। करी कवतुकें सदा ॥ ४ ॥ तुका ह्मणे ऐसें। मना लावी रामपिसें। नाहीं तरी आलिया सायासें। फुकट जासी ठकोनी ५

५३ आतां तरी पुढें हाचि उपदेश। नका करूं नाश आयुष्याचा ॥ १ ॥ सकळांच्या पायां माझें दंडवत। आपुलालें चित्त शुद्ध करा ॥ २ ॥ हित तें करावें देवाचें चिंतन। करूनियां मन एकविध[3] ॥ ३ ॥ तुका ह्मणे लाभ होय तो व्यापार। करा काय फार शिकवावें ॥ ४ ॥

१ सोंगट्या. २ नरक. ३ एकनिष्ठ.

५४ साधकाची दशा उदास असावी । उपाधि नसावी अंतर्बाहीं ॥ १ ॥ लोलुपता काय निद्रेतें जिणावें । भोजन करावें परिमित[1] ॥ २ ॥ एकांतीं लोकांतीं स्त्रियांशीं वचन । प्राण गेल्या जाण बोलों नये ॥ ३ ॥ संग सज्जनाचा उच्चार नामाचा । घोष कीर्तनाचा अहर्निशीं[2] ॥ ४ ॥ तुका ह्मणे ऐशा साधनीं जो राहे । तोचि ज्ञान लाहे गुरुकृपा ॥ ५ ॥

५५ निर्वाहापुरतें अन्नआच्छादन । आश्रमासी स्थान कोंपी गुहा ॥ १ ॥ कोठेंही चित्तासी नसावें बंधन । हृदयीं नारायण सांठवावा ॥ २ ॥ नये बोलों फार बैसों जनामधीं । सावधान बुद्धी इंद्रियें दमी ॥ ३ ॥ तुका ह्मणे घडी घडीनें साधावी । त्रिगुणाची गो[3]वी उगवूनि ॥ ४ ॥

५६ न करी तळमळ राहे रे निश्चळ । आहे हा कृपाळ स्वामी माझा ॥ १ ॥ अविनाश सुख देईल निर्वाणीं[4] । चुकतील खाणी

१ बेताचें. २ रात्रंदिवस. ३ गुंतणें. ४ शेवटीं.

चौऱ्याशीच्या ॥ २ ॥ आणिकिया जीवा हो-
ईल उद्धार । तेही उपकार घडती कोटि ॥३॥
आहिक्य[1] परत्रीं[2] होसील सरता । उच्चारी रे
आतां रामनाम ॥ ४ ॥ तुका ह्मणे सांडी सं-
साराचा छंद । मग परमानंद पावशील ॥५॥

५७ सर्वस्वा मुकावें तेणें हरीसी जिंकावें।
अर्थ प्राण जीवें देहत्याग ॥ १ ॥ मोह ममता
माया चाड नाहीं चिंता । विषयकंदुवेथा
जाळूनियां ॥ २ ॥ लोकलज्जा दंभ आणि अ-
हंकार । करूनि मत्सर देशधडी ॥ ३ ॥ शां-
ति क्षमा दया सखिया विनउनी । मूळ[3] चक्र-
पाणी धाडी त्यांसी ॥ ४ ॥ तुका ह्मणे याती
अक्षरें अभिमान । सांडोनियां शरण रिघे
संतां ॥ ५ ॥

५८ हित व्हावें तरी दंभ दुरी ठेवा। चित्त-
शुद्धि सेवा देवाची हे ॥ १ ॥ आवडी विठ्ठल
गाईजे एकांतीं । अलभ्य ते येती लाभ घरा २
आणीकां अंतरीं न द्यावी वसति । करावी हे

१ या लोकीं. २ स्वर्गी ३ बोलावणें.

शांती वासनेची ॥ ३ ॥ तुका ह्मणे बाण हा-
चि निर्वाणींचा। वाउगी हे वाचा वेंचूं[1] नये ४

५९ आशा हे समूळ खाणोनि काढावी।
तेव्हांचि गोसावी व्हावें तेणें ॥ १ ॥ नाहीं त-
री सुखें असावें संसारीं । फजिती दुसरी
करूं नये ॥ २ ॥ आशा मारूनियां जयवंत
व्हावें । तेव्हांचि निघावें सर्वांतूनि ॥ ३ ॥
तुका ह्मणे जरी योगाची तांतडी । आशेची
बीबुडी[2] करी आधीं ॥ ४ ॥

६० करूनियां शुद्ध मन । नारायण स्मरा
वा ॥ १ ॥ तरीच हा परिजे सिंधु । भवबंधू
तोडोनियां ॥ २ ॥ तेथें सरे शुद्ध साचें । अं-
तरींचें बीज तें ॥३॥ तुका ह्मणे लवणकळी[3] ।
पडतां जळीं तें होय ॥ ४ ॥

६१ बैसोनि निवांत शुद्ध करी चित्त ।
तया सुखा अंतपार नाहीं ॥ १ ॥ येऊनि अं-
तरीं राहील गोपाळ । सायासाचें फळ बै-
सलिया ॥ २ ॥ राम कृष्ण हरि मुकुंद मुरा-

१ खर्चूं नये. २ नाश. ३ मिठाचा खडा.

रि । मंत्र हा उच्चारी वेळोवेळां ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसें देईन मी दिव्य । जरी होईल भाव एकविध ॥ ४ ॥

६२ नये वांटूं मन । कांहीं न देखावें भिन्न ॥ १ ॥ पाय विठोबाचे चित्तीं । असों द्यावे दिवसराती ॥ २ ॥ नये काकुळती । कोणा यावें हरिभक्ति ॥ ३ ॥ तुका ह्मणे सांई । करील कृपेची विठाई ॥ ४ ॥

६३ कायावाचामनें जाला विष्णुदास । काम क्रोध त्यास बाधतीना ॥ १ ॥ विश्वासें तो करी स्वामीवरी सत्ता । सकळ भोगिता होय त्याचें ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्त करावें निर्मळें । येऊनि गोपाळ राहे तेथें ॥ ३ ॥

६४ नलगे देशकाळ । मंत्रविधानें सकळ । मनेंचि निश्चळ । करूनि करुणा भाकावी ॥ १ ॥ येतो बैसलिया ठाया । आसनें व्यापी देवराया । निर्मळ ते काया । अधिष्ठान तयाचें ॥ २ ॥ कल्पनेचा साक्षी । तरी

१ छाया. २ श्रद्धा. ३ मळरहित, शुद्ध.

आदरेंचि लक्षी । आवडीनें भक्षी । कोरडें धान्य मटमटां ॥ ३ ॥ घेणें तरि भाव । लक्षी दासांचा उपाव । तुका ह्मणे जीव । जीवीं मेळविल अनंत ॥ ४ ॥

६५ तेंचि करी मांत । जेणें होइल तुझें हित ॥ १ ॥ काय बडबड अमितें । सुख जि-व्हारीं शिणविसी ॥ २ ॥ जो मूळव्याधी पी-डिला । त्यासी देखोन हांसे खरजुला ॥ ३ ॥ आरथकरी सोसी । त्यासि हांसे तो आळ-शी ॥ ४ ॥ क्षयरोगी ह्मणे परता । सर रो-गियां तूं आतां ॥ ५ ॥ वडस दोहीं डोळां वाढले । आणिकां कानें कोचें बोले ॥ ६ ॥ तुका ह्मणे लागों पायां । शुद्ध करा आप-णिया ॥ ७ ॥

६६ सत्य आठवितां देव । जाते भेवें पळो-नि ॥ १ ॥ नलगे कांहीं करणें चिंता । घरी सत्ता सर्व तो ॥ २ ॥ भावें भाव राहे पायीं । देव तें संनिध ॥ ३ ॥ तुका ह्मणे कृष्णनामें । शीतळ प्रेमें सर्वांसी ॥ ४ ॥

---

१ भाषण. २ पुष्कळ. ३ भीति.

६७ उचित जाणावें मुख्य धर्म आधीं। चित्त शुद्ध बुद्धी ठायीं स्थिर ॥ १ ॥ न घलावी धांव मनाचिये ओढी। वचन आवडी संताचिये ॥ २ ॥ अंतरीं या राहे वचनाचा विश्वास। न लगे उपदेश तुका ह्मणे ॥ ३ ॥

६८ उभय भाग्यवंत तरीच समान। स्थळीं समाधान तरीच राहे ॥ १ ॥ युक्तीचें गौरव नसतां जिव्हाळा। सांचवणी जळा परी नाश ॥२॥ लोखंडा परीस ज्ञानिया तो शठ[1]। नांवाचा पालट दगड खरा ॥ ३ ॥ तुका ह्मणे अवघे विनोदाचे ठाव। एकात्मक[2] भाव नाहीं तेथें ॥ ४ ॥

६९ ऐका गा ए अवघे जन। शुद्ध मन तें हित ॥ १ ॥ अवघा काळ नव्हे जरी। समयावरी जाणावें ॥ २ ॥ नाहीं कोणी सवें येता। संचिता या वेगळा ॥ ३ ॥ बरवा अवकाश आहे। करा साहे इंद्रियें ॥ ४ ॥ कर्मभूमी ऐसा ठाव। वेवसाव[3] जाणावा ॥ ५ ॥

१ मूर्ख. २ एकरूप. ३ विचार.

तुका ह्मणे उत्तम जोडी। जाती घडी नरदेह ६

७० नम्र जाला भूतां। तेणें कोंडिलें अनंता ॥ १ ॥ हेंचि शूरत्वाचें अंग। हारी आणिला[1] श्रीरंग ॥ २ ॥ अवघा जाला पण। लवण सकळां कारण ॥ ३ ॥ तुका ह्मणे पाणी। पातळपणें तळा आणी ॥ ४ ॥

७१ थोडें परी निरें[2]। अविट तें घ्यावें बरें ॥ १ ॥ घ्यावें जेणें नये तुटी। बीज वाढे बीजा पोटीं ॥ २ ॥ चित्त ठेवीं ग्वाही। आणिकाशीं चाड नाहीं ॥३॥ आपलें तें हित फार। तुका ह्मणे खरें सार ॥ ४ ॥

७२ संसाराचा माथां भार। कांहीं पर न ठेवी ॥ १ ॥ भक्तीची ते जाती ऐसी। सर्वस्वासी मुकावें ॥ २ ॥ भिक्षा आणि वेवसाव[3]। काला करी तो गाढव ॥ ३ ॥ करूनि वस्ती बाजारीं। ह्मणवी कासया निस्पृही ॥ ४ ॥ प्रसादा आडूनि कवी। केलें तूप पाणी तेवीं ॥ ५ ॥ तुका ह्मणे होई शूर। किंवा निसुर मजुर ॥ ६ ॥

---

१ जिंकला. २ चांगलें. ३ व्यापार.

७३ चुकलिया ताळा। वाती घालूनि बैसे डोळां ॥ १ ॥ तैसें जागें करी चित्ता। कांहीं आपुलिया हिता ॥ २ ॥ निक्षेपिलें धन। तेथें गुंतलेंसे मन ॥ ३ ॥ नाशिवंतासाठीं। तुका ह्मणे करिसी आटी ॥ ४ ॥

७४ किती रांडवडे। घालुनि व्हाल रे बापुडे। संसाराचे भिडे। कासावीस झालेती ॥ ॥ १ ॥ माझ्या स्वामी शरण रिघा। कृपाळुवा पांडुरंगा। ठेवी अंगसंगा। विश्वासियां जवळी ॥ २ ॥ कांहीं न मागतां भलें। होइल तेंचि काम केलें। नसावें आंथिलें। कांहीं एका संकल्पें ॥ ३ ॥ तुका ह्मणे भाव। पाववील ठायाठावा। एकविध जीव। ठेविलिया सेवेसी ॥ ४ ॥

७५ काय तो विवाद असो भेदाभेद। साधा परमानंद एका भावें ॥ १ ॥ निघोनि आयुष्य जातें हातोहात। विचारी पां हित लवलाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे भावभक्ति हें कारण। नागवी भूषण दंभ तोचि ॥ ३ ॥

---

१ तेलवात. २ पुरलें. ३ युक्त.

७६ हो कां पुत्र पत्नी बंधु । त्यांचा तो-
डावा संबंधु ॥ १ ॥ कळों आले खस्याळसे ।
शिवों नये लिंपों दोषें ॥२॥ फोडावें मडकें ।
मेले लेखीं घायें एकें ॥३॥ तुका ह्मणे त्यागें ।
विण चुकीजेना भोगें ॥ ४ ॥

७७ न मनावें तैसें गुरूचें वचन । जेणें
नारायण अंतरे तें ॥ १ ॥ आड आला म्हूण[1]
फोडियेला डोळा । बळीनें आंधळा शुक्र
केला ॥ २ ॥ करी देव तरी काय नव्हे एक ।
कां तुह्मी पृथक शिणा वायां ॥ ३ ॥ उल्लंघू-
नियां भ्रताराची आज्ञा । अन्न ऋषिपत्न्या
घेऊनि गेल्या ॥ ४ ॥ अवघेंचि त्यांचें देवें के-
लें काज । धर्म आणि लाज राखियेली ॥ ५ ॥
पितियासी पुत्रें केला वैरकार । प्रल्हादें अ-[2]
सुर मारविला ॥ ६ ॥ बहुत विघ्नें केलीं तया
आड । परि नाहीं कैवाड सांडियेला ॥ ७ ॥
गौळणी करिती देवाशीं व्यभिचार । सांडु-
नी आचार भ्रष्ट होती ॥ ८ ॥ तयांसी दिलें

१ ह्मणून. २ राक्षस.

तें कवणासी नाहीं । अवघा अंतर्बाहीं तोचि जाला ॥ ९ ॥ देव जोडे ते करावें अधर्मे । अंतरे तें कर्म नाचरावें ॥ १० ॥ तुका ह्मणे हा जाणतो कळवळा । ह्मणोनि अजामेळा उद्धरिलें ॥ ११ ॥

७८ निवडावे खडे । तरी दळण वोजें[1] घडे ॥ १ ॥ नाहीं तरी नासोनि जाय । कारण आळस उरे हाय ॥ २ ॥ निवडावें तण[2] । सेतीं करावें राखण ॥ ३ ॥ तुका ह्मणे नीत । न विचारितां नव्हे हित ॥ ४ ॥

७९ करणें तें हेंचि करा । नरका अघोरा कां जातां ॥ १ ॥ जयामध्यें नारायण । शुद्ध पुण्य तें एक ॥ २ ॥ शरणागतां देव राखे । येरां वाखे विघ्नाचे ॥ ३ ॥ तुका ह्मणे लीन व्हावें । कळे भावें वर्म हें ॥ ४ ॥

८० डोळ्यामध्यें जैसें कणु । अणु तेंहि न समाये ॥ १ ॥ तैसें शुद्ध करीं हित । नका चित्त बाटवूं ॥ २ ॥ आपल्याचा कळवळा ।

---

१ चांगलें. २ बारीक खडा.

आणिका बाळावरी नये ॥ ३ ॥ तुका ह्मणे बीज मुडा[1] । जैसा चाडा पिकाच्या ॥ ४ ॥

८१ सत्य आह्मां मनीं । नव्हों गाबाळाचे धनी ॥ १ ॥ ऐसें जाणा रे सकळ । भरा शुद्ध टाका मळ ॥ २ ॥ देतों तीक्ष्ण उत्तरें । पुढें व्हावयासी बरें ॥ ३ ॥ तुका ह्मणे बरें घडे । देशोदेशीं चाले कोडें ॥ ४ ॥

८२ आली सिंहस्थ पर्वणी । न्हाव्या भटा जाली धणी ॥ १ ॥ अंतरीं पापाच्या कोडी । वरीवरी बोडी डोई दाढी ॥ २ ॥ बोडिलें तें निघालें । काय पालटलें सांग वहिलें ॥ ३ ॥ पाप गेल्याची काय खूण । नाहीं पालटले अवगुण ॥ ४ ॥ भक्तिभावेंविण । तुका ह्मणे अवघा सीण ॥ ५ ॥

८३ साजे अळंकार । तरि भोगितां भ्रतार ॥ १ ॥ व्यभिचारा टाकमटिका । उपहास होती लोकां ॥ २ ॥ शूरत्वाची वाणी । रूप मिरवे मंडणीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे जिणें । शर्तीविण लाजिरवाणें ॥ ४ ॥

---

१ पेरण्याकरितां गवतांत धान्य बांधून ठेवतात तें.

८४ न मनीं[1] ते ज्ञानी न मनीं ते पंडित । ऐसे परीचे एकएका भावें ॥ १ ॥ धातू पोसोनियां आणिकां उपदेश । अंतरीं तो लेश प्रेम नाहीं ॥ २ ॥ न मनीं ते योगी न मनीं ते हरिदास । दर्शनें बहुवस बहुतां परिचीं ॥३॥ तुका ह्मणे तया नमन बाह्यात्कारीं । आवडती परी चित्तशुद्धीचे ॥ ४ ॥

८५ निर्वैर होणें साधनाचें मूळ । येर ते विह्ळ[2] सांडीमांडी ॥ १ ॥ नाहीं चालों येत सोंगसंपादणी । निवडे अवसानीं[3] शुद्धाशुद्ध ॥ २॥ त्यागा नांव तरी निर्विषयवासना । कार्यकारणापुरते विधि ॥ ३ ॥ तुका ह्मणे राहे चिंतनीं आवडी । येणें नांवें जोडी सत्यत्वेशीं ॥ ४ ॥

८६ किती लाजिरवाणा । मरे उपजोनि शाहाणा ॥ १ ॥ एका घाई न करी तुटी । न निघे देवासोई भेटी ॥२॥ सोसूनि आबाळी । घायाळ तें ढुंग चोळी ॥ ३ ॥ सावध करी

---

१ मानीत नाहीं. २ व्यर्थ. ३ शेवटीं.

तुका । ह्मणे निजले हो आइका ॥ ४ ॥

८७ शिष्याची जो नेघे सेवा । मानी देवासारिखें ॥ १ ॥ त्याचा फळे उपदेश । आणिकां दोष उफराटे ॥ २ ॥ त्याचें खरें ब्रह्मज्ञान । उदासीन देहभावीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे सत्य सांगे । येवोत रागें येती ते ॥ ४ ॥

८८ नाहीं पाक होत उफराटे चाली । बोलिली ते केली व्हावी नीत ॥ १ ॥ नाहीं मानूं येत वांजटांचे[1] बोल । कोरडेच फोल चवी नाहीं ॥ २ ॥ तरुवेंरा[2] आधीं कोठें आहे फळ । चावटा बरळ ह्मणा त्यासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे किती ठकलीं बापुडीं । गव्हा आहे गोडी मांडे पुऱ्या ॥ ४ ॥

८९ चित्तीं नाहीं तें जवळीं असोनिया काय । वत्स सांडी माय तेणें न्यायें ॥ १ ॥ प्रीतीचा तो वायु गोड लागे मौत[3] । जरी जाय चित्त मिळोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे अवघे फिकें भावाविण । मीठ नाहीं अन्न तेणें न्यायें ॥ ३ ॥

---

१ वायफट. २ झाड. ३ गोष्ट.

९० फळाची तों पोटीं। घडे वियोगेंही भेटी ॥ १ ॥ करावें चिंतन। सार तेंचि आठवण ॥ २ ॥ चित्त चित्ता ग्वाही[1]। उपचारें चाड नाहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा। पावे अंतरींची सेवा ॥ ४ ॥

९१ साहोनियां टांकी घाये। पाषाण देवचि जाला पाहे ॥ १ ॥ तया रीती दृढ मन। करी साधाया कारण ॥ २ ॥ बाण शस्त्र साहे गोळी। शूरा ठाव उंच स्थळीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे सती। अग्नि न देखे ज्या रीती ॥ ४ ॥

९२ झुंझायाच्या[2] गोष्टी ऐकतांचि सुख। करितां हें दुःख थोर आहे ॥ १ ॥ तैसी हरिभक्ति सुळावरील पोळी। निवडे तो बळी विरळा शूर ॥ २ ॥ पिंड पोसिलिया विषयांचा पाईक[3]। वैकुंठनायक कैंचा तेथें ॥ ३ ॥ तुका ह्मणे व्हावें देहासी उदार। रखुमादेवीवर जोडावया ॥ ४ ॥

९३ काय वा करिशी सोवळें ओवळें।

१ साक्ष. २ लढाईच्या. ३ दास.

मन नाहीं निर्मळ वाउगेंचि ॥ १ ॥ काय बा करिसी पुस्तकांची मोट । घोकितां हृदयं-स्फोट हाता नये ॥२॥ काय बा करीसी टाळ आणि मृदंग । जेथें पांडुरंग रंगला नाहीं ३ काय बा करिसी ज्ञानाचिया गोष्टी । करणी नाहीं पोटीं बोलण्याची ॥ ४ ॥ काय बा करीसी दंभलौकिकातें । हित नाहीं तेथें तुका ह्मणे ॥ ५ ॥

९४ वेदविहित तुम्ही आइका हो कर्मे। बोलतों तीं वर्मे संतांपुढें ॥ १ ॥ चारी वर्ण जाले एकाचिये अंगीं । पापपुण्य भागीं विभागिले ॥२॥ प्रथम पाउलीं पावविला पंथें । आदि मध्य अंत भेद नाहीं ॥ ३ ॥ आंबे बोरी वड बाभुळा चंदन । गुणागुणें भिन्न अग्नि एक ॥ ४ ॥ तुका ह्मणे मन उन्मन जों होय । तोंवरी हे सोय विधि पाळीं ॥ ५ ॥

९५ खरें बोले तरी । फुकासाठीं जोडे हरी ॥ १ ॥ ऐसे फुकाचे उपाय । सोडूनियां

१ उरफोड. २ वागणें. ३ मार्ग.

वायां जाय ॥ २ ॥ परउपकार । एका वचनाचा फार ॥ ३ ॥ तुका ह्मणे मळ । मनें सांडितां शीतळ[1] ॥ ४ ॥

९६ मनोमय पूजा । हेचि पंढीये केशीराजा ॥ १ ॥ घेतो कल्पनेचे भोग । न मानिती बाह्य रंग ॥ २ ॥ अंतरींचें जाणे । आदेवर्तमान[2] खुणे ॥ ३ ॥ तुका ह्मणे कुडें । कोठें सरे त्याच्या पुढें ॥ ४ ॥

९७ परद्रव्य परनारीचा अभिलाष । तेथूनि हा र्‍हास[3] सर्वभाग्या ॥ १ ॥ घटिका दिवस मास वर्षें लागती तीन । बांधलें पतन गांठोडीस ॥ २ ॥ पुढें घात त्याचा रोकडा शकुन । पुढें करी गुण निश्चयेंसी ॥३॥ तुका ह्मणे एकां तडताथवड । काळ लागे नाड परी खरा ॥ ४ ॥

९८ भाव तैसें फळ । न चले देवापाशीं बळ ॥ १ ॥ धांवे जातीपाशीं जाती । खुण येरयेरां चित्तीं ॥ २ ॥ हिरा हिरकणी । काढी

---

१ शांत. २ आवडती. ३ नाश.

आंतुनि अहि[1]रणी ॥३॥ तुका ह्मणे केलें । मन शुद्ध हें चांगलें ॥ ४ ॥

९९ कुळधर्म ज्ञान कुळधर्म साधन । कुळधर्में निर्धा[2]न हातीं चढे ॥ १ ॥ कुळधर्म भक्ति कुळधर्म गति । कुळधर्म विश्रांति पाववील ॥ २ ॥ कुळधर्म दया कुळधर्म उपकार । कुळधर्म सार साधनाचें ॥ ३ ॥ कुळधर्म महत्त्व कुळधर्म मान । कुळधर्म पावन परलोकींचें ॥ ४ ॥ तुका ह्मणे कुळधर्म दावी देव । यथाविध भाव जरी होय ॥ ५ ॥

१०० पुण्य परउपकार पाप ते परपीडा । आणिक नाहीं जोडा दुजा यासी ॥ १ ॥ सत्य तोचि धर्म असत्य तें कर्म । आणिक हें वर्म नाहीं दुजें ॥ २ ॥ गति तेचि मुखीं नामाचें स्मरण । अधोगति जाण विन्मुखता ॥ ३ ॥ संतांचा संग तोचि स्वर्गवास । नर्क तो उदास अनगळा[3] ॥ ४ ॥ तुका ह्मणे उघडें आहे हित घात । जयाचें उचित करा तैसें ॥ ५ ॥

१ ऐरण. २ ठेवा. ३ अव्यवस्थित.

१०१ नाहीं सुगंधाची लागत लावणी। लावावी ते मनीं शुद्ध होतां ॥ १ ॥ वान्था हातीं माप चाले सज्जनाचें। कीर्ति मुख त्याचें नारायण ॥ २ ॥ प्रभा आणि रवि काय असे आन। उदयीं तंव जन सकळ साक्षी ॥ ३ ॥ तुका ह्मणे बरा सत्याचा सायास। नवनीता नाश नाहीं पुन्हां ॥ ४ ॥

१०२ अनुतापें दोष। जाय न लागतां निमिष ॥१॥ परि तो राहे विसावला। आदीं अवसानीं भला ॥२॥ हेंचि प्रायश्चित्त। अनुतापीं न्हाय चित्त ॥ ३ ॥ तुका ह्मणे पापा। शिवों नये अनुतापा ॥ ४ ॥

१०३ शाहाणियां पुरे एकचि वचन। विशारती खूण तेचि त्यासी ॥ १ ॥ उपदेश असे बहुतांकारणें। घेतला तो मनें पाहिजे हा ॥ २ ॥ फांसावेना तरि दुःख घेतें वाव। मग होतो जीव कासावीस ॥ ३ ॥ तुका ह्मणे नको राग करूं झोंडा। नुघडितां पीडा होइल डोळे ॥ ४ ॥

---

१ भिन्न, निराळें. २ पश्चात्ताप. ३ इशारत.

१०४ भोजन तें पाशांतीचें । उंचें नीच उसाळी ॥१॥ जैशी कारंज्याची कळा । तो जिव्हाळा स्वहिताचा ॥ २ ॥ कल्पना ते देवांविण । न करी भिन्न इतरीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे पावे भूतीं । ते निश्चिती मापली ॥ ४ ॥

१०५ अन्यायासी राजा जरी न करी दंड । बहुच ते लंड[1] पीडिती जना ॥ १ ॥ न करी निगा कुणबी न काढितां तण । कैंचे येती कण हातासी ते ॥ २ ॥ तुका ह्मणे संतां करूं नये अनुचित । पाप नाहीं नीत विचारितां[2]

१०६ निष्ठुर तो दिसे निराकारपणें । कोंवळा सगुणें प्रतिपाळी ॥ १ ॥ केलाच करावा केला कडवाड । होईल तें गोड न पुरे ते ॥ २ ॥ मथिलिया लागे नवनीत[3] हातां । नासे वितळितां आहाच तें ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां मनाशीं विचार । करावा तो सार एकचित्त ॥ ४ ॥

१०७ केलें नाहीं मनीं तया घडे त्याग ।

---

१ मर्ख. २ रक्षण. ३ लोणी.

उबग उद्वेग[1] नाहीं चितीं ॥१॥ देवाचि हा जाणे अंतरींचा भाव । मिथ्या तो उपाव बाह्य रंग ॥ २ ॥ त्यागिल्याचें ध्यान राहिलें अंतरीं । अवघी ते परी विटंबना ॥ ३ ॥ तुका ह्मणे आपआपणां विचारा । कोण हा दुसरा सांगे तुह्मां ॥ ४ ॥

१०८ ऐसी हेकां अटी । रीतीं शिणती करंटीं ॥ १ ॥ सात्र आपुल्या पुरतें । करून न घेती कां हितें ॥ २ ॥ कांहीं वेंचितील वाणी । निरर्थकाचि कारणीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । कांहीं समर्पूनि सेवा ॥ ४ ॥

१०९ मंगळा मंगळ सांठा । विट तोटा नेणें तें ॥ १ ॥ हें भरा सातें आलें । भलें भलें ह्मणवावें ॥ २ ॥ जतीं जनार्दन वसे । येथें दिसे तें शुद्ध ॥ ३ ॥ तुका ह्मणे बहुतां मुखें । खरें सुखें ठेवावें ॥ ४ ॥

११० सत्या माप वाढे । गबाळाची[2] चाली खोडे ॥ १ ॥ उतरे तें कळे कसीं । विखरोनी

१ खिन्नता. २ मिथ्या, नाशवंताची.

सर्व देशीं ॥ २ ॥ घरामध्यें राजा । नव्हे हो ता पाटपूजा ॥ ३ ॥ तुका ह्मणे साचें । रूप तें दर्पणाचें ॥ ४ ॥

१११ जीवित्व तें किती । हेंचि धरितां बरें चित्तीं ॥ १ ॥ संत सुमनें[1] उत्तरें । मृदु रसा-ळ मधुरें ॥ २ ॥ विसावतां कानीं । परिपाक घडे मनीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे जोडी । होय जनन रोकडी ॥ ४ ॥

११२ वंदिलें वंदावें जीवाचिये साठीं । किंवा बरी तुटी आरंभींच ॥ १ ॥ स्वहिताची चाड[2] ते ऐका हे बोल । अवघेंचि मोल धीरा अंगीं ॥ २ ॥ सिंपिलें तें रोंप वरीवरी बरें । वाळलिया वरी कोंभ नये ॥ ३ ॥ तुका ह्मणे टाकी घायें देवपण । फुटलिया जन कुला[3] पुसी ॥ ४ ॥

११३ गव्हांच्या घुगऱ्या । नाचण्यांच्या पुऱ्या । बऱ्या त्याचि बऱ्या । पार्धाणी[4] त्या पाधाणी ॥ १ ॥ काय थोरपण । वाया जाळावा

१ पुष्पें. २ गरज. ३ ढुंगण. ४ वाईट.

तो शीण । कारणापें भिन्न। निवडे तें निराळें ॥ २ ॥ रुचि वोजेपाशीं । गरज ते जैशीतैशी। करूं नका नाशी । खावें खाणें जालें तें ॥३॥ तुका ह्मणे मोठा। काय करावा तो ताठा। नाहीं वीण निटा । पाविजेत मारग ॥ ४ ॥

११४ विषयांचे लोलिंगतें[1] । ते फजीत होतील ॥ १ ॥ न सरे येथें यातिकुळ । शुद्ध मूळ बीज व्हावें ॥ २ ॥ शिखासूत्र[2] सोंग वरी । दुराचारी दंड पावे ॥ ३ ॥ तुका ह्मणे अभिमान । नारायणा न सोसे ॥ ४ ॥

११५ समर्थासी नाहीं वर्णावर्णभेद । सामग्री ते सिद्ध सर्व घरीं ॥ १ ॥ आदराचे ठायीं बहुच आदर । मागितलें फार तेथें वाढी ॥ २ ॥ न ह्मणे सोइरा सुहृदें[3] आवश्यक । राजा आणि रंक सारिखाचि ॥ ३ ॥ भाव देखे तेथें करी लडबड । जडा राखे जड निराळेंचि ॥ ४ ॥ कोणी न विसंबे याचकाचा ठाव। विनवुनी देव शंका फेडी ॥ ५ ॥ तुका ह्मणे

१ लुब्ध, लोभी. २ जानवें. ३ शुद्ध अंतःकरणाचा.

पोट भरुनी उरवी । घालें ऐसें दावी अ-
नुभवें ॥ ६ ॥

११६ एका बीजा केला नास । मग भोग-
लें कणीस ॥ १ ॥ कळे सकळां हा भाव ।
लहानथोरांवरी जीव ॥ २ ॥ लाभ नाहीं फु-
कासाठीं । केल्याविण जीवा आटी[1] ॥ ३ ॥ तु-
का ह्मणे रणीं । जीव देतां लाभ दुणी[2] ॥ ४ ॥

११७ सोनें दावी वरी तांबें तयापोटीं ।
खरियाचेसाठीं विकूं पाहे ॥ १ ॥ पारखी तो
जाणे तयाचे जीवींचें । निवडी दोहींचें वेग-
ळालें ॥ २ ॥ क्षीरा[3] नीरा कैसें होय एकपण ।
स्वादी तोचि भिन्न भिन्न काढी ॥ ३ ॥ तुका
ह्मणे थीता, नागवलाचि खोटा । अपमान
मोठा पावईल ॥ ४ ॥

११८ पाठेळ करितां न साहावे वारा । सा-
हेलिया ढोरा गोणी चाले ॥ १ ॥ आपणां आ-
पण हेचि कसवटी । हर्षामर्ष[4] पोटीं विरों द्या-
वे ॥ २ ॥ नवनीत तोंवरी कडकडी लोणी ।

१ श्रम. २ दुप्पट. ३ दूध. ४ क्रोध.

निश्चळ होऊनी राहे मग ॥ ३ ॥ तुका ह्मणे जरी जग टाकी घायीं[1] । त्याच्या पडे पायां जन मग ॥ ४ ॥

११९ ध्याई अंतरींच्या सुखें। काय बडबड वाचा मुखें ॥ १ ॥ विधिनिषेध उर फोडी। जंव नाहीं अनुभव गोडी ॥ २ ॥ वाढे तळमळ उभयतां। नाहीं देखिलें अनुभवितां ॥३॥ आपुल्या मतें पिसें[2] । परी तें आहे जैसेंतैसें ॥ ४ ॥ साधनाची सिद्धि । मौन करा स्थिर बुद्धि ॥ ५ ॥ तुका ह्मणे वादें । वायां गेलीं ब्रह्मवृंदें[3] ॥ ६ ॥

१२० संसारसंगें परमार्थ जोडे । ऐसें काय घडे जाणतेंनो ॥ १ ॥ हेंडग्याच्या आळां अवघीं चिपाडें । काय तेथें गोडें निवडावीं ॥ २ ॥ ढेकणाचे बाजे सुखाची कल्पना । मूर्खत्व वचना येऊं पाहे ॥ ३ ॥ तुका ह्मणे मद्य सांडवी लंगोटी । सांगितला सेटीं[4] विचार त्या ॥ ४ ॥

१ घाव. २ वेड. ३ ब्राह्मणसमुदाय. ४ शेवटीं.

१२१ शास्त्रज्ञ हो ज्ञाते असती बहुत । परी नाहीं चित्त हातां आलें ॥ १ ॥ क्षणा एका साठीं न धरवे धीर । तेणें हा रघुवीर अंतरतो ॥ २ ॥ तोळाभार सोनें रतिभार राई । मेळविल्या पाहीं नास होतो ॥ ३ ॥ हरीचे अंकित असती विरळागत । तयासी अच्युत कृपा करी ॥४॥ तुका ह्मणे काय घुडवण्या[1] गोष्टी । जंव नाहीं गांठीं चित्त आलें ॥ ५ ॥

१२२ नाना मतांतरें शब्दाची व्युत्पत्ति । पाठांतरें होती वाचाळ ते ॥१॥ माझ्या विठोबाचें वर्म आहे दुरी । कैंची तेथें उरी देहभावा ॥ २ ॥ यज्ञ याग जप तप अनुष्ठान । राहे ध्येय ध्यान आलीकडे ॥ ३ ॥ तुका ह्मणे होय उपरति[2] चित्ता । अंगीं सप्रेमता येणें लागे ४

१२३ उदंड शाहाणे होती तर्कवंत । परी नेणवेचि अंत विठोबाचा ॥ १ ॥ उदंड अक्षरांकरीत भरोवरी[3] । परी ते नेणवे थोरी विठोबाची ॥ २ ॥ तुका ह्मणे

१ व्यर्थ. २ वैराग्य. ३ पठन करणें.

नाहीं भोळेपणाविण । जाणीव[1] ते शीण रितें माप ॥ ३ ॥

१२४ नव्हे ब्रह्मज्ञान बोलतां हे सिद्ध । जंव हा आत्मबोध नाहीं चित्तीं ॥ १ ॥ काय करिसी वांयां लटिकाची पाल्हाळ । श्रम तो केवळ जाणिवेचा ॥ २ ॥ मीच देव ऐसें सांगसी या लोकां । विषयांच्या सुखा टोंकोनियां[2] ॥ ३ ॥ अमृताची गोडी पुढिलां सांगसी । आपण उपवासी मरोनियां ॥ ४ ॥ तुका ह्मणे जरी राहील तळमळ । ब्रह्म तें केवळ सदोदित ॥ ५ ॥

१२५ घरोघरीं अवघें जालें ब्रह्मज्ञान । परी मेळवण[3] बहु मार्जी ॥ १ ॥ निरें[4] कोणापाशीं होय एक रज । तरी द्या रे मज दुर्बळासी ॥ २ ॥ आशा तृष्णा माया कालवूनि दोन्ही । दंभ तो दूरोनि दिसतसे ॥ ३ ॥ काम क्रोध लोभ शिणवी बहुत । मेळवूनी आंत काळकूट ॥ ४ ॥ तुका ह्मणे तेथें कांहीं हातां नये । आयुष्य मोल जाये वांयांविण ॥ ५ ॥

१ ज्ञान. २ लक्ष लावून. ३ मिसळ. ४ शुद्ध.

१२६ येथें नाहीं उरो आलें अवतार। येर ते पामर जीव किती ॥ १ ॥ विषयांचे ह्मणी व्हाल[1] लोलिंगत। चेवलिया अंत न लगे मज ॥ २ ॥ वाहोनियां भार कुंथशील ओझें। नव्हे तोचि माझें थीता त्याग ॥ ३ ॥ तुका ह्मणे कैसी नाहीं त्याची लाज। संतीं केशीराज साधियेला ॥ ४ ॥

१२७ ब्रह्मज्ञान जरी एके दिवशीं कळे। तात्काळ हा गळे अभिमान ॥ १ ॥ अभिमान लागे शुकाचिये पाठी। व्यासें उपराटी दृष्टी केली ॥ २ ॥ जनकभेटीसी पाठविला तेणें। अभिमान नाणें खोटें केलें ॥ ३ ॥ खोटें करूनियां लाविला अभ्यासीं। मेरुशिखरासी शुक गेला ॥ ४ ॥ जाऊनियां तेणें साधली समाधी[2]। तुका ह्मणे तधीं होतों आह्मी ॥ ५ ॥

१२८ त्रिपुटीच्या योगें। कांहीं नव्हे कोणांजोगें। एक जातां लागें। एक पाठी लागतें ॥ १ ॥ मागें पुढें अवघा काळ। पळों

१ लुब्ध. २ चित्ताची एकाग्रता.

नये नचले बळ। करितां कोल्हाळ। कृपें खांद्यां हरि वाहे ॥ २ ॥ पापपुण्यात्मयाच्या शक्ति। असती योजिल्या श्रीपती। यावें काकुलती। येथें सत्तानायका ॥ ३ ॥ तुका उभा पैल थडी। तरी हे प्रकाश निवडी। घातल्या सांगडी। तापे पेटीं हाकारी ॥ ४ ॥

१२९ आह्मां हें कौतुक जगा द्यावी नीत। करावे फजित चुकती ते ॥ १ ॥ कासयाचा बांधे एकाच्या निरोपें। काय व्हावें कोपें जगाचिया ॥ २ ॥ अविद्येचा येथें कोठें परिश्रम। रामकृष्णनाम ऐसे बाण ॥३॥ तुका ह्मणे येथें खऱ्याचा विकरा। न सरती येरां खोट्या परी ॥ ४ ॥

१३० नका धरूं कोणी। राग वचनाचा मनीं ॥ १ ॥ येथें बहुतांचें हित। शुद्ध करोनि राखा चित्त ॥ २ ॥ नाहीं केली निंदा। आह्मीं दूषिलेंसे भेदां ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज। येणेंविण काय काज ॥ ४ ॥

---

१ नाश. २ अज्ञान. ३ दुसऱ्या. ४ दोषा.

१३१ गाजराची पुंगी। तैसे नवे जाले जोगी ॥१॥ काय करोनि पठन। केली अहंता जतन ॥ २ ॥ अल्प असे ज्ञान। अंगीं ताठा अभिमान ॥ ३ ॥ तुका ह्मणे लंडे[1] । त्याचें हाणोनी फोडा तोंड ॥ ४ ॥

१३२ घालूनियां मध्यवर्ती[2] ।दाटुनी उपदेश देती ॥ १॥ ऐसे पोटभरे संत। तयां कैंचा भगवंत ॥ २॥ रांडापोरांतें गोविती। वर्षासनातें लाविती ॥ ३ ॥ जसें बोलती निरोपणीं । तैसी न करिती करणी ॥ ४ ॥ तुका ह्मणे तया तमोगुणियाची क्रिया ॥ ५ ॥

१३३ डोई वाढवूनि केश। भूतें आणिती अंगास ॥ १ ॥ तरी ते नव्हते संत जन। तेथें नाहीं आत्मखुण ॥ २ ॥ मेळवूनिं नर नारी। शकुन सांगती नानापरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे मैंद[3] । नाहीं त्यांपासीं गोविंद ॥ ४ ॥

१३४ परद्रव्य परनारी। अभिलासूनि नाक धरी ॥१॥ जळो तयाचा आचार। व्यर्थ भार

---

१ मूर्ख. २ मध्यस्ती. ३ वर चांगलें व अंतरीं वाईट.

वाहे खर ॥ २ ॥ सोंवळयाची स्फीति । क्रोधें विटाळला चित्तीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे सोंग । दावी बाहेरील अंगें ॥ ४ ॥

१३५ पुराणिक ह्मणविती । जाणोनी कांदे भक्षिती ॥१॥ अगस्तीचें मूत्र मळ । लावूनि ह्मणती कृष्णावळ ॥ २ ॥ श्रेष्ठ वर्ण ब्राह्मणाचा । संग न सुटे शूद्रीचा ॥ ३ ॥ बद्[२]राहीच्या पाडीं दाढा । लागे तुकयाचा हुंदाडा ॥ ४ ॥

१३६ भोंदावया मीस घेऊनि संताचें । करी कुटुंबाचें दास्य सदा ॥ १ ॥ मनुष्याचे परी बोल रावा करी । रंजवी नरनारी जगामध्यें ॥ २ ॥ तिमयाचा बैल करी शिकविलें । चित्रींचें बाहुलें गोष्टी सांगे ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा जळो हे महंती । लाज नाहीं चित्तीं निसु[३]गोतें ॥ ४ ॥

१३७ टिळा टोपी माळा देवाचें गवाळें । बागवी वोंगळे पोटासाठीं ॥ १ ॥ तुळसी खोवी कानीं दर्भ खोवी शेंडी । लटिकी धरी

---

१ गाढव. २ वाईट वर्तणूक. ३ निःसंग.

बोंडी नासिकाची ॥ २ ॥ कीर्तनाचे वेळे रडे पडे लोळे। प्रेमेंविण डोळे गळताती ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसे मावेचे मइंद[1]। त्यांपाशीं गोविंद नाहीं नाहीं ॥ ४ ॥

१३८ होऊनि संन्यासी भगवीं लुगडीं। वासना न सोडी विषयांची ॥ १ ॥ निंदिती कदान्न[2] इच्छिती पक्वान्न। पाहाताती मान आदराचा ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें दांभिक भजन। तया जनार्दन भेटे केवीं ॥ ३ ॥

१३९ लांबवूनि जटा नेसोनि कासोटा। अभिमान मोठा करिताती ॥ १ ॥ सर्वांगा करिती विभूतिलेपन। पाहाती मिष्टान्न भक्षावया ॥ २ ॥ तुका ह्मणे त्यांचा नव्हे हा स्वधर्म। न कळतां वर्म मिथ्यावाद ॥ ३ ॥

१४० टिळा टोपी उंच दावी। जगीं मी एक गोसावी ॥ १ ॥ अवघा वरपंग सारा। पोटीं विषयांचा थारा[3] ॥ २ ॥ मुद्रा लाविती कोरोनि। मान व्हावयासी जनीं ॥ ३ ॥ तुका

---

१ ढोंगी, २ वाईट अन्न. ३ वस्ती.

ह्मणे ऐसे किती । नरका गेले पुढें जाती ॥४॥

१४१ दाढी डोई मुंडी मुंडूनियां सर्व । पांधुरती बरवें वस्त्र काळें ॥ १ ॥ उफराटी काठी घेऊनियां हातीं । उपदेश देती सर्वत्रासी ॥ २ ॥ चाळवुनी रांडा देऊनियां भेष । तुका ह्मणे त्यांस यम दंडी ॥ ३ ॥

१४२ लावूनियां मुद्रा बांधोनियां कंठीं । हिंडे पोटासाठीं देशोदेशीं ॥ १ ॥ नेसोनि कौपिन शुभ्रवर्ण जाण । पाहाती पक्वान्न क्षेत्रींचें तें ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसे मायेचे मइंद । त्यांपाशीं गोविंद नाहीं नाहीं ॥ ३ ॥

१४३ सदा सर्वकाळ अंतरीं कुटिळ । तेणें गळा माळ घालूं नये ॥ १ ॥ ज्यासी नाहीं धर्म दया क्षमा शांति । तेणें अंगीं विभूती लावूं नये ॥ २ ॥ जयासी न कळे भक्तीचें महिमान । तेणें ब्रह्मज्ञान बोलों नये ॥ ३ ॥ ज्याचें मन नाहीं लागलें हातासी । तेणें प्रपंचासी टाकूं नये ॥ ४ ॥ तुका ह्मणे ज्यासी नाहीं ह-

---

१ मलीन, अशुद्ध. २ भस्म.

रिभक्ति । तेणें भगवें हातीं धरूं नये ॥ ५ ॥

१४४ कान फाडूनियां मुद्रा ते घालिती । नाथ ह्मणविती जगामाजी ॥ १ ॥ घालोनियां फेरा मागती द्रव्यासी । परी शंकरासी नोळखती ॥ २ ॥ पोट भरावया शिकती उपाय । तुका ह्मणे जाय नर्कलोका ॥ ३ ॥

१४५ कौडीकौडीसाठीं फोडिताती शिर । काढूनि रुधिर मलंग[1] ते ॥ १ ॥ पांघरती चर्म[2] लोहाची सांकळी । मारिती आरोळी धैर्यबळें ॥ २ ॥ तुका ह्मणे त्यांचा नव्हेचि स्वधर्म । न कळेचि वर्म गोविंदाचें ॥ ३ ॥

१४६ होउनी जंगम विभूती लाविती । शंख वाजविती घरोघरीं ॥ १ ॥ शिवाचे निर्माल्य तीर्था न सेविती । घंटा वाजविती पोटासाठीं ॥२॥ तुका ह्मणे त्यांसी नाहीं शिवभक्ति । व्यापार करिती संसाराचा ॥ ३ ॥

१४७ संतचिन्हें लेउनि अंगीं । भूषण मिरविती जगीं ॥ १ ॥ पडिले दुःखाचे सागरीं ।

---

१ एकप्रकारचे भेषधारी. २ कातडें.

ते भवपुरीं ॥ ६ ॥ कामक्रोधलोभ
वरीवरी दाविती विरक्ती ॥३॥ आ-
r बांधोनि चित्त । ह्मणती जालों आ-
॥ ४ ॥ त्यांचे लागले संगती । जा
त्री तेचि गति ॥ ५ ॥ तुका ह्मणे श-
। जग नाडियेलें तेणें ॥ ६ ॥

मुखें बोले ब्रह्मज्ञान । मनीं धन अ-
॥ १ ॥ ऐसियाची करितां सेवा । का-
होय जीवा ॥ २ ॥ पोटासाठीं संत ।
लीत बहुत ॥ ३ ॥ विरळा ऐसा को-
का त्यासि लोटांगणीं ॥ ४ ॥

तक्र शिष्या मान । दुग्धा ह्मणे ना-
। १ ॥ ऐशीं ज्ञानाचीं डोबडें । आशा
शीं मूढें ॥ २ ॥ उपदेश तो जगा । आ-
वळा इतका मांगा ॥ ३ ॥ रसनाशि-
ंकित । तुका ह्मणे वरदळ स्फीत ॥४॥

जळोजळो तें गुरुपण । जळोजळो तें
॥ १ ॥ गुरु आला वेशीद्वारीं । शि-

---

ाग्य. २ फार थोडा. ३ रेडे.

ध्य पळतो खिंडोरी॥ २ ॥ काशासाठीं जालें येणें । त्याचें आलें वर्षासन ॥ ३ ॥ तुका ह्मणे चेलों । गुरु दोघेहि नरकाला ॥ ४ ॥

१५१ अंगीं घेऊनियां वारें द्या देती । तया भक्तां हातीं चोट आहे ॥ १ ॥ देव्हारा बैसोनि हालविती सुपें । ऐसीं पापी पापें लिपताती ॥२॥ एकीबेकीन्यायें होतसे प्रचित । तेणें लोक समस्त भुलताती ॥ ३ ॥ तयांचे स्वाधीन दैवतें असती । तरी कां मरती त्यांचीं पोरें ॥ ४ ॥ तुका ह्मणे पाणी अंगारा जयाचा । भक्त कान्होबाचा तोही नव्हे ॥ ५ ॥

१५२ शिष्या सांगे उपदेश । गुरुपूजा हे विशेष ॥ १ ॥ दावी आचार सोवळे । दंड कमंडलु माळे ॥ २ ॥ छाटी भगवी मानसीं । व्यर्थ ह्मणवी संन्यासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे लोभ । न सुटे नाहीं लाभ ॥ ४ ॥

१५३ सद्गुरुवांचूनि प्रेतरूप वाणी । बोलती पुराणीं व्यासऋषि ॥ १ ॥ ह्मणोनि त-

१ खिंडींत. २ शिष्य. ३ देव अंगांत येतो.

याचें पाहूं नये तोंड । निगुरा¹ अखंड सुतका-ळा ॥ २ ॥ कोणे परी तया नव्हेचि सुटका । देह त्याचा लटिका जाणा तुम्ही ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसीं बोलती पुराणें । संतांचीं वचनें मागिला हो ॥ ४ ॥

१५४ एक करिती गुरु गुरु । भोंवता भारु शिष्यांचा ॥ १ ॥ पुंसे² नाहीं पाय चारी । मनुष्य परी कुतरीं तीं ॥ २ ॥ परस्त्री मद्यपान । पेंडखाण माजविलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे निर्भर चित्तीं । अधोगति जावया ॥ ४ ॥

१५५ जगीं कीर्ति व्हावी । ह्मणोनि झालासि गोसावी ॥ १ ॥ बहुत केलें पाठांतर । वर्म राहिलेसें दूर ॥ २ ॥ चित्तीं नाहीं अनुताप³ । लटिकें भगवें स्वरूप ॥ ३ ॥ तुका ह्मणे सिदळीच्या । व्यर्थ श्रमविसी वाचा ॥ ४ ॥

१५६ पिंड पोसावे हें अधमाचें ज्ञान । विलास मिष्टान्न करूनियां ॥ १ ॥ शरीर रक्षावें हा धर्म बोलती । काय असे हातीं तयाचि-

---

१ गुरु न केलेला. २ शेंपूट. ३ पश्चात्ताप.

या ॥ २ ॥ क्षणभंगुर हें जाय न कळतां । ग्रां-[1]
स गिळी सत्ता नाहीं हातीं ॥ ३ ॥ कर्वतिलीं
देहें कापियेलें मांसा । गेले वनवासा शुका-
दिक ॥ ४ ॥ तुका ह्मणे राज्य करितां जनक ।
अग्निमाजी एक पाय जळे ॥ ५ ॥

१५७ माया ब्रह्म ऐसें ह्मणती धर्मठक ।
आपणासरिसे लोक नागविले ॥ १ ॥ विषयीं
लंपट शिकवी कुविद्या[2] । मनामागें नांद्या हो-
ऊनि फिरे ॥ २ ॥ करुनी खातां पाक जिरे
सुरण राई । करितां अतिल्याई दुःख पावे
॥ ३ ॥ औषध द्यावया चाळविलें बाळा । दा-
वूनियां गुळा दृष्टीपुढें ॥ ४ ॥ तरावया आधीं
शोधा वेदवाणी । वांजट[3] बोलणीं वारा त्यां-
चीं ॥ ५ ॥ तुका ह्मणे जयां पिंडाचें पाळण ।
न घडे नारायण भेट तयां ॥ ६ ॥

१५८ मुखें सांगे ब्रह्मज्ञान । जन लोकांची
कापितो मान ॥ १ ॥ ज्ञान सांगतो जनांसी
नाहीं अनुभव आपणासी ॥ २ ॥ कथा करि-

१ घास. २ वाईट विद्या. ३ मिथ्या वाद.

तो देवाची । अंतरीं आशा बहु लोभाची ॥३॥
तुका ह्मणे तोचि वेडा । त्याचें हाणूनि थोबा-[1]
ड फोडा ॥ ४ ॥

१५९ ब्रह्मज्ञानाची भरोवरी । पुढिला सां-
गे आपण न करी ॥ १ ॥ थू थू त्याच्या तों-
डावरी । व्यर्थ शिणवी वैखरी[2] ॥ २ ॥ कथा
करी वरीवरी । प्रेम नसेचि अंतरीं ॥३॥ तुका
ह्मणे कवित्व करी । मान स्तुति हे आदरी ॥४॥

१६० न कळे ब्रह्मज्ञान आचार विचार ।
लटिका वेव्हार करीतसे ॥ १ ॥ विश्वामित्री[3]
पोटीं तयाचा अवतार । नांव महाखर चां-
डाळाचें ॥ २ ॥ द्रव्यइच्छेसाठीं करीतसे क-
था । काय त्या पापिष्ठा न मिळे खाया ॥ ३ ॥
पोट पोसावया तोंडें बडबडी । नाहीं धड-
फुडी एक गोष्टी ॥ ४ ॥ तुका ह्मणे तया का-
य व्याली रांड । येऊनियां भांड जनामध्यें ५

१६१ ऐसे नाना भेष घेउनी हिंडती । पो-
टासाठीं घेती प्रतिग्रह[4] ॥ १ ॥ परमार्थासी

---

१ गाल. २ वाणी. ३ गाढवी. ४ दान.

कोण त्यजी संवसार । सांगा पां साचार नांव त्याचें ॥ २ ॥ जन्मतां संसार त्यजियेला शु[1]कें । तोचि निष्कळंक तुका ह्मणे ॥ ३ ॥

१६२ अवघें ब्रह्मरूप रिता नाहीं ठाव । प्रतिमा तो देव कैसा नव्हे ॥ १ ॥ नाहीं भाव तया सांगावें तें किती । आपुलाल्या मती पाषांडि[2]या ॥ २ ॥ जया भावें संत बोलिले वचन । नाहीं अनुमोदन शब्दिकांसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे संतीं भाव केला बळी । न कळतां खळीं दूषिला देव ॥ ४ ॥

१६३ पिंडपोषकाच्या जळो ज्ञानगोष्टी । ह्मणी दृष्टिभेटी न हो त्याची ॥ १ ॥ नाहीं संतचिन्ह उमटलें अंगीं । उपदेशा लागी पात्र जाला ॥ २ ॥ पोहों नेणे कासे लावितो आणिका । ह्मणावें त्या मूर्खा काय आतां ॥ ३ ॥ शिणलें तें गेलें शिणलियापाशीं । जाली त्या दोघांसी एक गति ॥ ४ ॥ तुका ह्मणे अहो देवा दीनानाथा । दरुषण अनंता नको त्याचें ५

१ शुकाचार्यांनीं. २ वेदविरुद्ध वागणारा.

१६४ देह तोचि देव भोजन ते भक्ति। मरण तेचि मुक्ति पाषांड्याची ॥ १ ॥ पिंडाच्या पोषकीं नागविले जन। लटिकें पुराण केले वेद ॥ २ ॥ मना आला तैसा करिती विचार। ह्मणती संसार नाहीं पुन्हां ॥ ३ ॥ तुका ह्मणे पाठी उडती यमदंड। पापपुण्य लंड[1] न विचारिती ॥ ४ ॥

१६५ शब्दज्ञानी येऊं नेदी दृष्टीपुढें। छळवादी कुडे[2] अभक्त ते ॥ १ ॥ जळो तें जाणिव जळो त्याचे दंभ। जळो त्यांचें तोंड दुर्जनांचें ॥२॥ तुका ह्मणे येती दाटुनि छळाया। त्यांच्या बोडूं डोया न धरूं भीड ॥ ३ ॥

१६६ अज्ञानाची भक्ति इच्छिती संपत्ती। तयाचिये चित्तीं बोध[3] कैंचा ॥ १ ॥ अज्ञानाची पूजा कामिक भावना। तयाचिया ध्याना देव कैंचा ॥ २ ॥ अज्ञानाचें कर्म फळीं ठेवी मन। निष्काम साधन तया कैंचें ॥ ३ ॥ अज्ञानाचें ज्ञान विषयावरी ध्यान। ब्रह्म सना-

१ मूर्ख. २ कपटी. ३ आत्मज्ञान.

तन तया कैंचें ॥ ४ ॥ तुका ह्मणे जळो ऐसि-
यांचें तोंड । अज्ञानाचें बंड वाढविती ॥ ५ ॥

१६७ कोडियाचें[1] गोरेपण । तैसें अहंकारी ज्ञान
॥१॥ त्यासी अंतरीं रिझे कोण । जवळी जातां
चिळसवाणें ॥ २ ॥ प्रेत देह गौरविलें[2] । तैसें
विटंबवाणें जालें ॥ ३ ॥ तुका ह्मणे खाणें वि-
ष्ठा । तैशा देहबुद्धि चेष्टा ॥ ४ ॥

१६८ घेऊं नये तैसें दान । ज्याचें धन अ-
भिलाषी ॥ १ ॥ तोही येथें कामा नये । नर्का
जाय ह्मणोनि ॥ २ ॥ विकी स्नानसंध्या जप ।
करी तप पुढिलांचें[3] ॥ ३ ॥ तुका ह्मणे दांभि-
क तो । नर्का जातो स्वइच्छा ॥ ४ ॥

१६९ जाली गाढवी दुधाळ । महिमा गा-
ईची पावेल ॥ १ ॥ श्वान जालेंसे चांगलें ।
तरी कां सांगातें जेवील ॥ २ ॥ जाली सिंद-
ळा चांगली । तरी कां पतिव्रता जाली ॥३॥
तुका ह्मणे ऐशा जाति । काय उंचपण पा-
वती ॥ ४ ॥

१ कुष्ठी मनुष्याचें २ शृंगारिलें. ३ दुसऱ्यांचें.

१७० ज्यासी विषयाचें ध्यान। त्यासी कैं-चा नारायण ॥ १ ॥ साधु कैंचा पापियासी। काय चांडाळासी काशी ॥ २ ॥ काय पति-तासी पिता। काय अधमासी गीता ॥ ३ ॥ तुका ह्मणे निरंजनीं[1]। शठ कैंचा ब्रह्मज्ञानी ३

१७१ शिकल्या बोलाचे सांगतील वाद। अनुभव भेद नाहीं कोणा ॥ १ ॥ पंडित हे ज्ञानी करितील कथा। न मिळती अर्था नि-जसुखा ॥ २ ॥ तुका ह्मणे जैसी लांचासाठीं ग्वाही। देतील हे नाहीं ठावी वस्तु ॥ ३ ॥

१७२ भगवें तरी श्वान सहज वेष त्याचा। तेथें अनुभवाचा काय पंथ ॥ १ ॥ वाढवुनी जटा फिरे दाही दिशा। तरी जंबु[2] वेषा सह-ज स्थिति ॥ २ ॥ कोरोनियां भूमी करिती मधीं वास। तरी उंदरास काय वाणी ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसें कासया करावें। देहासी दंडावें वाउगेंचि ॥ ४ ॥

१७३ जातीचें तें चढे प्रेम। पक्षी स्मरे

---

१ परब्रह्माचे ठाईं. २ कोल्हा.

राम राम ॥ १ ॥ ते काय गुण लागती
का[1]गा शोभेना पिंजरा ॥ २ ॥ शिकी
सुजात सोसी । मग तयासी मोल च
तुका ह्मणे वेषधारी । हिजड्या नारी न
१७४ तांबियाचें नाणें न चले खऱ्या
जरी हिंडाविलें देशोदेशीं ॥ १ ॥ क
कांहीं न मने सज्जना । यावें लागे मन
चिया ॥ २ ॥ हिरियासारिखा दिसे ग
ळा । पारखी ते डोळां न पाहाती ॥ ३
ऊनियां भिंग कमाविलें मोतीं । पा
हातीं घेतां नये ॥ ४ ॥ तुका ह्मणे काय
नियां व्यर्थ । आपुलें हें चित्त आपणा ग
१७५ वाघाचा कल[3]भूत दिसे वाघा
परी नाहीं दशा साच अंगीं ॥ १ ॥ ब
रंग निवडी कसोटी । संघट्टणें भेटी अ
प ॥ २ ॥ शिकविलें तैसें नाचावें माक
चले त्यापुढें युक्ति कांहीं ॥ ३ ॥ तुक
करी लटिक्याचा सांठा । फजित तो
शीघ्र होय ॥ ४ ॥

१ कावळा. २ एकप्रकारचा गारेचा दगड.

१७६ दुधाचे घागरी मद्याचा हा बुंदे[1]। पडिलिया शुद्ध नव्हे मग ॥ १ ॥ तैसें खळां मुखें न करावें श्रवण। अहंकारें मन विटाळलें ॥ २ ॥ काय करावीं तीं बत्तीस लक्षणें। नाक नाहीं तेणें वांया गेलीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे अन्न जिरों नेदी मासी। आपुलिया जैशी संवसगें ॥ ४ ॥

१७७ मुसळाचें धनु[2] नव्हे हो सर्वथा। पाषाण पिळितां रस कैंचा ॥ १ ॥ वांझे बाळा जैसें दूध नाहीं स्तनीं। गारा त्या अधणीं न शिजती ॥ २ ॥ नवखंड पृथ्वी पिके मृगजळें। डोंगर भेटे बळें असमानासी ॥ ३ ॥ नैश्वरें[3] देह तैसें तेव्हां होय ब्रह्म। तुका ह्मणे श्रम करुनी काय ॥ ४ ॥

१७८ लटिकी ग्वाही सभेआंत। देतां पंडित आगळा ॥ १ ॥ कुंभपाकीं बस्तीकरू। होय धुरु कुळेसी ॥ २ ॥ रजस्वला रुधिर स्रवे। तेंचि घ्यावें तृषेसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे

---

१ बिंदु, थेंब. २ धनुष्य. ३ मिथ्या.

जन्मा आला । काळ जाला कुळासी ॥ ४ ॥

१७९ चोरें चोरातें करावा उपदेश । आपुला अभ्यास असेल तो ॥ १ ॥ शिंदळीच्या अंगणीं वेंचितां पाउलें । होईल आपुलें तिच्या ऐसें ॥ २ ॥ तुका ह्मणे भितों पुढिलिया द[1]त्ता । ह्मणऊनि चिंता उपजली ॥ ३ ॥

१८० गुळें माखोनियां दगड ठेविला । वर दिसे भला लोकाचारीं ॥ १ ॥ अंतरीं विषयाचें लागलें पैं पिसें । बाहिरल्या वेषें भुलवी लोकां ॥ २ ॥ ऐसिया दांभिका कैंची हरिसेवा । नेणेचि सद्भा[2]वा कोणेकाळीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे येणें कैसा होय संत । विटाळलें चित्त कामक्रोधें ॥ ४ ॥

१८१ कानीं धरी बोल बहुतांचीं मतें । चौ[3]ट त्यापरतें आणीक नाहीं ॥ १ ॥ पावेल गौरव वोढाळाचे परी । दंड पाठीवरी यमदूतां ॥ २ ॥ शब्दज्ञानी एक आपुलाल्या मतें । सांगती वेदांत भिन्नभावें ॥ ३ ॥ तुका

१ पुढें होणारी गोष्ट. २ शुद्ध भाव. ३ चावट.

ह्मणे देव केल्याविण साहे । फजिती ते आहे लटिक्या अंगीं ॥ ४ ॥

१८२ एकाचिये सोई कवित्वाचे बांधे । बांधिलिया साधे काय तेथें ॥ १ ॥ काय हातीं लागे भुसाचे कांडणीं । सत्यासी दाटणी करुनि काय ॥ २ ॥ कवित्वाचे रूढी पायां पाडी जग । सुखवोनि मग नरका जाय ॥३॥ तुका ह्मणे एक भाव न धरिती । पडिली हे माती त्यांचे तोंडीं ॥ ४ ॥

१८३ इंद्रियांसी नेम नाहीं । मुखीं राम ह्मणोनि काई ॥ १ ॥ जेविं माशीसंगें अन्न । सुख नेदी तें भोजन ॥ २ ॥ कीर्तन करावें । तैसें करूनि दावावें ॥ ३ ॥ हे तो अंगीं नाहीं चिन्ह । गाइलें वेश्येच्या ढव्यानें ॥ ४ ॥ तुका ह्मणे रागा । संत शिवूं नेदिती अंगा ॥ ५ ॥

१८४ नाहीं संतांशीं शरण । काय वांचोनि पुराण ॥ १ ॥ ह्मणे विठ्ठलाचा दास । देखोनी परनारीस हांसे ॥ २ ॥ करिती विठो-

---

१ रचना, प्रबंध. २ तबलजी.

बाची भक्ति । दयाधर्म नाहीं चित्तीं ॥ ३
तेथें नाहीं माझा देव । व्यर्थ श्रमवी हा जी
॥ ४ ॥ अंगीं नाहीं क्षमा दया । ह्मणती भे
पंढरीराया ॥ ५ ॥ नाहीं धर्माची वासना
काय करोनि प्रदक्षिणा ॥ ६ ॥ ऐसें नव्हे भ
क्तिवर्म । तेथें नाहीं माझा राम ॥ ७ ॥ न
कृपा कांहीं केल्या । नये घाम जीव गेल्या
जैसी खड्गाची धार । विठ्ठल चरणीं तुक
शूर ॥ ९ ॥

१८५ वांझेनें दाविलें गऱ्हंवार[1] लक्षण
चिरगुटें घालून वाथयाला[2] ॥ १ ॥ स्वप्नींचें
धन चिवांच्या ब्राह्मणा । जातकर्म जाणा वां
टिती पै ॥ २ ॥ तेवीं शब्दज्ञानी करिती चा-
वटी । ज्ञान पोटासाठीं विकूनिया ॥ ३ ॥ बो-
लाचिच कढी बोलाचिच भात । जेवूनिया
तृप्त कोण जाला ॥ ४ ॥ कागदीं लिहितां ना-
माची साखर । चाटितां मधुर गोडी नेदी[3] ५
तुका ह्मणे जळो जळो ते महंती । नाहीं ला-
ज चित्तीं आठवण ॥ ६ ॥

1 गरोदर. २ पोटाला. ३ न देई.

१८६ तरलों ह्मणुनि धरिला ताठा । त्यासी चळ जाला फांटा ॥ १ ॥ वांयाविण तुटे दोड । मान सुख इच्छी भांडें ॥ २ ॥ ग्वाहीविण मात । स्थापी आपुली सतत ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐलीं किती । नरका गेलीं अधोगती ४

१८७ चिरगुटें घालूनि वाढविलें पोट । गऱ्हवार बोभाट जनामध्यें ॥ १ ॥ लटिकेची डोहळे दाखवी प्रकार । दुध स्तनीं पोर पोटीं नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे अंतीं वांझचि ते खरी । फजिती दुसरी जनामध्यें ॥ ३ ॥

१८८ जपाचें निमित्त झोंपेचा पसरु । देहाचा विसरू पाहूनियां ॥ १ ॥ ऐसें तें भजन अमंगळवाणी । सोंगसंपादणी बहुरूप्याचीं ॥ २ ॥ सेवेसी विकिलें लोभाचिया आसे । तगा कोठें असे उरला देव ॥ ३ ॥ तुका ह्मणे मानदंभ जया चित्तीं । तयाची फजीती करूं आह्मी ॥ ४ ॥

मोलें घातलें रडाया । नाहीं असूं आणि

१ भाट, स्तुतिपाठ करणारा.

माया ॥ १ ॥ तैसा भक्तिवाद काय । रंगबेगडीचा न्याय ॥ २ ॥ वेठी धरिल्या दावी भाव । मागें पळायाचा पाव ॥ ३ ॥ काजव्याच्या ज्योती । तुका ह्मणे नलगे वाती ॥ ४ ॥

१९० स्वप्नींच्या व्यवहारा काळांतरें लेखा । जागृतीसी रुका गांठी नाहीं ॥ १ ॥ तेवीं शब्दज्ञानें करिती चावटी । ज्ञान पोटासाठीं विकूं नये ॥ २ ॥ बोलाचीच कढी बोलाचाचि भात । जेवूनियां तृप्त कोण जाला ॥ ॥ ३ ॥ कागदीं लिहिली नांवाची साखर । चाटितां मधुर केवीं लागे ॥ ४ ॥ तुका ह्मणे जळो जळो त्याचें ज्ञान । यमपुरीं कोण दंड साहे ॥ ५ ॥

१९१ अंधळें तें सांगे सांगितल्या खुणा । अनुभव देखणा प्रगट त्या ॥ १ ॥ नांदणूक सांगे वडिलाचें बळ । कैसा तो दुर्बळ सुख पावे ॥ २ ॥ तुका ह्मणे नांदों आपल्या प्रतापें । तयाची लोकांपें स्तुति सांगों ॥ ३ ॥

---

१ पैसा, धन. २ पाहणारा, डोळस.

१९२ जाणे त्याचें वर्म नेणे त्याचें कर्म। केल्याविण धर्म नेणवती ॥ १ ॥ मैथुनाचें सुख सांगितल्या शून्य। अनुभवाविण कळूं नये ॥ २ ॥ तुका ह्मणे जळो शाब्दिक हें ज्ञान। विठोबाची खूण विरळा जाणे ॥ ३ ॥

१९३ माझी पाठ करा कवी[2]। उठ लावी दारोदार ॥१॥ तंव तया पारखी सिव। लाजे ठाव सांडितां ॥ २ ॥ उष्टावळी करूनि जमा। कुंथुनि प्रेमा आणितसे ॥ ३ ॥ तुका ह्मणे बाहेर मुद्री[3]। आहाच गोविंदीं न सरती ४

१९४ उभ्या बाजारांत गथा। हे तों नावडें पंढरिनाथा ॥ १ ॥ अवघें पोटासाठीं ढोंग। तेथें कैंचा पांडुरंग ॥ २ ॥ लावी अनुसंधान। कांहीं देईल ह्मणऊन ॥ ३ ॥ काय केलें रांडलेका। तुला राजी नाहीं तुका ॥ ४ ॥

१९५ भाव नाहीं काय मुद्रा वाणी। बैसे बगळा निश्चळ ध्यानीं॥१॥ न मनी नाम न मनी त्यासी। वाचाळ शब्द पिटी भासी ॥२॥

---

१ कळत नाहींत. २ कविता. ३ माळा मुद्रा इत्यादि.

नाहीं चाड देवाची कांहीं । छळणें टोंके
स्करघाई ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्याचा संग ।
को शब्य स्पर्शसंग ॥ ४ ॥

१९६ नाइकावे कानीं तयाचे ते बोल ।
क्तीविण फोलें ज्ञान सांगे ॥ १ ॥ वाखा
अद्वैत भक्तिभावेंविण । दुःख पावे शीण श्र
ता वक्ता ॥ २ ॥ अहं ब्रह्म ह्मणोनि पाळीत
पिंडा । बोलों नये भांडा तयासवें ॥ ३ ॥
द्बाह्य लंड बोले जो पाषांड । त्याचें का
तोंड संतांमध्यें ॥ ४ ॥ तुका ह्मणे खंडी दे
भक्तपण । वरिष्ठ त्याहूनि श्वपच तो ॥ ५ ।

१९७ मोल देऊनियां सांठवावे दोष । ः
टाचे ते वेश हाहोनियां ॥ १ ॥ हरिदासां श
खें हरिकथाकीर्तन । तेथें पुण्यें पुण्य विशे
ता ॥ २ ॥ हरितील वस्त्रें गोपिकांच्या वेषें
पाप त्या सरिसें मात्रागमन ॥ ३ ॥ तुक
ह्मणे पाहा ऐसें जालें जन । सेवाभक्तिही
रसीं गोडी ॥ ४ ॥

---

१ भुसाप्रमाणें. २ भेद करी.

१९८ पुण्यविकरा तें मातेचें गमन । भाडी ऐसें धन विटाळ तो ॥ १ ॥ आत्महत्यारा हा विषयांचा लोभी । ह्मणावें तें नाभी करवी दंड ॥ २ ॥ नागवला अल्प लोभाचिये साठीं । घेऊनि कांचवटी परीस दिला ३ तुका ह्मणे हात झाडिले परत्रीं[1] । श्रम तोचि श्रोतीं वेठी केली ॥ ४ ॥

१९९ उष्ट्या पत्रावळी करूनियां गोळा । दाखविती कळा कवित्वाची ॥ १ ॥ ऐसे जे पातकी ते नरकीं पचती । जोंवरी भ्रमती चंद्रसूर्य ॥ २ ॥ तुका ह्मणे एका नारायणा ध्याईं । वरकडा वाहीं शोक असे ॥ ३ ॥

२०० पंडित ह्मणतां थोर सुख । परी तो पाहतां अवघा मूर्ख ॥ १ ॥ काय करावें घोकिलें । वेदपठण वांया गेलें ॥ २ ॥ वेदीं सांगितलें तें न करी । सर्व[2] ब्रह्म नेणे दुराचारी ॥ ३ ॥ तुका देखे जीवीं शिव । हाचि तेथींचा अनुभव ॥ ४ ॥

---

१ स्वर्ग. २ सर्व ठिकाणीं.

२०१ जैसें दावी तैसा राहे । तरी कां देव दुरी आहे ॥ १ ॥ दुःख पावायाचें मूळ । रहेणी[1] ठाव नाहीं ताळ ॥ २ ॥ माळामुद्रावरी । कैंचा सोंगें जोडे हरि ॥ ३ ॥ तुका ह्मणे देखे । ऐसे परीचीं बहुतेकें ॥ ४ ॥

२०२ आशाबद्ध वक्ता[2] । भय श्रोतियाच्या चित्ता ॥ १ ॥ गातो तेंही नाहीं ठावें । तोंड वासी कांहीं द्यावें ॥ २ ॥ जालें लोभाचें मांजर । भकि मागे दारोदार ॥ ३ ॥ उभयतां लोभीं मन । वांया गेलें तें भजन ॥ ४ ॥ बहिर मुके एके ठायीं । तैसें जालें तया दोहीं ॥ ५ ॥ माप आणि गोणी । तुका ह्मणे रितीं दोन्ही ॥ ६ ॥

२०३ पशु ऐसे होती ज्ञानी । चर्वणीं विषयांचे ॥ १ ॥ ठेवूनियां लोभीं लोभ । जाला क्षोभ आत्मत्वीं ॥ २ ॥ केला आणिका वाढी पाक । खाणें ताक मूर्खासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे मोठा घात । वाताहात हा देह ॥ ४ ॥

२०४ जवळी नाहीं चित्त । काय मांडिये-

---

१ वर्तन. २ बोलणारा. ३ सेवन.

लें प्रेत ॥ १ ॥ कैसा पाहे चर्मदृष्टी । दीप स्ने-
हाच्या शेवटीं ॥ २ ॥ कांतेलेंसें श्वान । तैसें
दिशा हिंडे मन ॥ ३ ॥ त्याचे कानीं हाणे ।
कोण बोंब तुका ह्मणे ॥ ४ ॥

२०५ कोरड्या गोष्टी चटक्या बोल । शि-
कल्या सांगे नाहीं खोल ॥ १ ॥ कोण यांचें
मना आणी । ऐको कानीं नाइकोनि ॥ २ ॥
घरोघरीं सांगती ज्ञान । भूस शिणे कांडिती
॥ ३ ॥ तुका ह्मणे आपुल्या मति । काय रि-
तीं पोकळें ॥ ४ ॥

२०६ भक्त ह्मणऊनि वंचावें जीवें । तेणें
शेण खावें काशासाठीं ॥ १ ॥ नासिले अड-
वंद कौपीन ते माळा । अडचण राउळामा-
जीं केली ॥ २ ॥ अंगीकारिले सेवे घडे अंत-
राय । तया जाला न्याय खापराचा ॥ ३ ॥
तुका ह्मणे कोठें तगों येती घाणीं । आहाच
ही मनीं अधीरता ॥ ४ ॥

२०७ नावडे ज्या कथा उठोनियां जाती ।

---

१ पिसाळलेलें कुत्रें. २ भिन्न रहावें.

ते यमा फावती बरे वोजा ॥ १ ॥ तो असे जवळी गोंचिडाच्या न्यायें । देशत्यागें ठाव तया दुरी ॥ २ ॥ नव्हे भला कोणी नावडे दुसरा । पाहुणा किंकरा यमा होय ॥ ३ ॥ तुका ह्मणे तया करावें तें काई । पाषाण कां नाहीं जळामध्यें ॥ ४ ॥

२०८ आमचे गोसावी अयाचित[1]वृत्ति । करवी शिष्याहातीं उपदेश ॥ १ ॥ दगडाची नाव आधींच ते जड । ते काय दगड तारूं जाणे ॥ २ ॥ तुका ह्मणे वेष विटंबिला त्यांनीं सोंगसंपादणी करिती परी ॥ ३ ॥

२०९ भजन घाली भोगावरी । अकर्तव्य मनीं धरी ॥ १ ॥ धिग त्याचें साधुपण । विटाळूनि वर्ते मन ॥ २ ॥ नाहीं वैराग्याचा लेश । अर्थचाड जीवें आस ॥ ३ ॥ हें ना तेंसें जालें । तुका ह्मणे वांया गेलें ॥ ४ ॥

२१० काय देवापाशीं उणें । हिंडे द्वारोद्वारीं सुनें[2] ॥ १ ॥ करी अक्षरांची आटी । एके

---

१ मागण्यावाचून मिळेल तें घेणारा. २ कुत्रें.

कवडीच साठीं ॥ २ ॥ निंदी कोणा स्तवी । चिंतातुर सदा जीवीं[1] ॥ ३ ॥ तुका ह्मणे भांड । जळो जळो त्याचें तोंड ॥ ४ ॥

२११ जळो तैसा प्रेम रंग । जाय भुलोनि पतंग ॥ १ ॥ सासूसाठीं रडे सून । भाव अंतरींचा भिन्न ॥ २ ॥ मैंद मुखींचा कोंवळा । भाव अंतरीं निराळा ॥ ३ ॥ जैसी वृंदावनें[2] कांती । उत्तम धरूं नये हातीं ॥ ४ ॥ बक ध्यान धरी । सोंग करूनि मासे मारी ॥ ५ ॥ तुका ह्मणे सर्प डोले । तैसा कथेमाजी खुले ६

२१२ संध्या करितोसी केशवाच्या नांवें । आरंभीं तें ठावें नाहीं कैसें ॥ १ ॥ किती या सांगावें करूनि फजित । खळ नेणे हित जवळी तें ॥ २ ॥ भाजल्या न कळे उचितें[3] तें काय । न घ्यावें तें खाय घ्यावें सांडी ॥ ३ ॥ तुका ह्मणे घेती भिंतीसवें डोकें । वावसीतीं एकें अंधारली ॥ ४ ॥

२१३ काय सर्प खातो अन्न । काय ध्यान

---

१ अंतःकरणीं. २ कडुवृंदावन फळ. ३ योग्य.

बकाचें ॥ १ ॥ अंतरींची बुद्धि खोटी । भरलें पोटीं वाईट ॥ २ ॥ काय उंदीर नाहीं धांवी । राख लावी गाढव ॥ ३ ॥ तुका ह्मणे सुसर जळीं । काउळीं कां न न्हाती ॥ ४ ॥

२१४ घरोघरीं बहु जाले कवी । नेणे प्रसादाची चवी ॥ १ ॥ लंडा भूषणाची चाड । पुढें न विचारी नाड ॥ २ ॥ काढावें आइतें । तेंचि ओडावें स्वहितें ॥ ३ ॥ तुका ह्मणे कळे । अहाच[2] झांकतील डोळे ॥ ४ ॥

२१५ काय काशी करिती गंगा । भीतरीं[3] चांगा नाहीं तो ॥ १ ॥ अग्रणीं कुच्चर बाहेर तैसा । नये रसा पाकासी ॥ २ ॥ काय टिळे करिती माळा । भाव खळा नाहीं त्या ॥ ३ ॥ तुका ह्मणे प्रेमेंविण । बोले भुंके अवघा शीण ४

२१६ नाहीं निर्मळ जीवन । काय करील साबण ॥ १ ॥ तैसी चित्तशुद्धि नाहीं । तेथें बोध करील काई ॥ २ ॥ वृक्ष न धरी पुष्पफळ । काय करील वसंत काळ ॥ ३ ॥ वां-

---

१ इच्छा. २ व्यर्थ. ३ अंतरांत.

जे न होती लेंकुरें । काय कीजे त्या भ्रतारें ४ नपुंसका पुरुषासी । काय करील बाइल त्यासी ॥ ५ ॥ प्राण गेलिया शरीर । काय करील वेव्हार ॥ ६ ॥ तुका ह्मणे जीवनेंविण[1] । पीक नव्हे नव्हे जाण ॥ ७ ॥

२१७ काय धोविलें कातडें । काळकुट भीतरीं कुडें ॥ १ ॥ उगा राहें लोकभांडा । चाळविल्या पोरें रांडा ॥ २ ॥ घेसी बुंथी[2] पानवथा । उगाच हालविसी माथा ॥ ३ ॥ लावूनि बैसे टाळी । मन इंद्रियें मोकळीं ॥ ४ हालवीत बैस माळा । विषयजप वेळोवेळां ॥ ५ ॥ तुका ह्मणे हा व्यापार । नाम विठोबाचें सार ॥ ६ ॥

२१८ कवीश्वरांचा तो आह्मांसी विटाळ । प्रसाद वोंगळ चिंवडिती[3] ॥ १ ॥ दंभाचे आवडी बहिरट अंधळे । सेवटासि काळें होइल तोंड ॥ २ ॥ सोन्यासेजारीं तो लाखेची जतन । संतत ते गुण जैसेतैसे ॥ ३ ॥ सेव्य-

---

१ उदकावांचून. २ पांघरूण. ३ मिश्र करिती.

सेवकता न पडतां ठावी । तुका ह्मणे गोवी पावती हीं ॥ ४ ॥

२१९ काय दरा[2] करील वन । समाधान नाहीं जंव ॥ १ ॥ तरी काय तेथें असतीं थोडीं । काय जोडी तयांसी ॥ २ ॥ रिघतां घांवा पेंवामधीं । जोडे सिद्धि ते ठायीं ॥ ३ ॥ काय भस्म करील राख । अंतर पाक[3] नाहीं तों ॥ ४ ॥ वर्णाआश्रमाचे धर्म । प्राप्ति श्रम जालिया ॥ ५ ॥ तुका म्हणे सोंग पाश । निरसे[4] आस तें हित ॥ ६ ॥

२२० वृत्ति भूमि राज्य द्रव्य उपार्जिती । जाणा त्या निश्चितीं देव नाहीं ॥ १ ॥ भाडेकरी वाहे पाठीवरी भार । अंतरींचें सार लाभ नाहीं ॥२॥ देवपूजेवरी ठेवूनियां मान । पाषाणा पाषाण पूजी लोभें ॥ ३ ॥ तुका ह्मणे फळ चिंतिती आदरें । लाघव हे चार शिंदळीचे ॥ ४ ॥

२२१ आशाबद्ध जन । काय जाणे नाराय-

---

१ गुंती. २ दरी. ३ शुद्ध. ४ नाशपावे.

ण ॥ १ ॥ करी इंद्रियांची सेवा । पाहे आव-
डीचा हेवा ॥ २ ॥ भ्रमलें चावळे । तैसें उ-
चित न कळे ॥ ३ ॥ तुका ह्मणे विषें । अन्न
नाशियेलें जैसें ॥ ४ ॥

२२२ भिक्षापात्र अवलंबणें । जळो जिणें
लाजिरवाणें । ऐसियासी नारायणें । उपेक्षि-
जे सर्वथा ॥ १ ॥ देवा पायीं नाहीं भाव । भ-
क्ति वरी वरी वाव । समर्पिला जीव । नाहीं
तो हा व्यभिचार ॥ २ ॥ जगा घालावें सांकं-
डें । दीन होऊनि बापुडें । हेंचि अभाग्य रो-
कडें । मूळ आणि विश्वास ॥ ३ ॥ काय न
करी विश्वंभर । सत्य करितां निर्धार । तुका
ह्मणे सार । दृढ पाय धरावे ॥ ४ ॥

२२३ मांडे पुऱ्या मुखें सांगों जाणे मात ।
तोंडीं लाळ हात चोळी रिते ॥ १ ॥ ऐसि-
याच्या गोष्टी फिक्या मिठेंविण । रुचि नेदी
अन्न चवी नाहीं ॥ २ ॥ बोलों जाणे अंगीं ना-
हीं शूरपण । काय तें वचन जाळावें तें ॥३॥

१ बडबडे. २ आश्रय करणें. ३ संकट.

तुका ह्मणे बहुतोंडें जे वाचाळ। तेंग तेंचि मूळ लटिक्याचें ॥ ४ ॥

२२४ आवडीच्या मतें करिती भोजन। भोग नारायणें ह्मणती केला ॥ १ ॥ अवघा देव ह्मणे वेगळें तें काय। अर्थासाठीं डोयें फोडूं पाहे ॥ २ ॥ लाजे कमंडलु धरितां भोपळा। आणीक थीगळा प्रावरणा ॥ ३ ॥ शाला गडवे धातुद्रव्यइच्छा चित्तीं। नैश्वर बोलती अवघें मुखें ॥ ४ ॥ तुका ह्मणे तयां देवा नाहीं भेटी। ऐसे कल्पकोटि जन्म घेतां॥५

२२५ तीळ जाळिले तांदुळ। काम क्रोध तैसेचि खळ ॥ १ ॥ कां रे शिणलासी वाउगा। न भजतां पांडुरंगा ॥ २ ॥ मानदंभासाठीं। केली अक्षरांची आटी ॥ ३ ॥ तप करूनि तीर्थाटन। वाढविला अभिमान ॥ ४ ॥ वांटिलें तें धन। केली अहंता जतन ॥ ५ ॥ तुका ह्मणे चुकलें वर्म। केला अवघाचि अधर्म ॥ ६ ॥

---

१ धनासाठीं. २ डोकें. ३ खोटें. ४ श्रम.

२२६ एक ह्मणती आह्मी देवची पैं जालों । ऐसें नका बोलों पडाल पतनीं ॥ १ ॥ एक ह्मणती आह्मी देवाचीं पै रूपें । तरी तुमचिया बापें न चुके जन्म ॥ २ ॥ देवें उचलिली स्वकरें मेदिनी । तुमचेनी गोणी नुचलवे ॥ ३ ॥ देवें मारियेले दैत्य दानव मोठे । तुमचेनी न तुटे तृणमात्र ॥ ४ ॥ राया विठोबाचें पद जो अभिलाषी । पातकाची राशी तुका ह्मणे ॥ ५ ॥

२२७ देव होईजेत देवाचे संगती । पतन पंगती जगाचिया ॥ १ ॥ दोहींकडे दोन्ही वाहातील वाटा । करितील सांठा आपुलाला २ दाखविले परी नाहीं वर्जिजेतां । आला तो तो चित्ता भाग भरा ॥ ३ ॥ तुका ह्मणे अंगीं आवडीचें बळ । उपदेश मूळ बीजमात्र ॥४॥

२२८ हाका मारी ज्याच्या नांवें । त्याचें गांवचि नाहीं ठावें ॥ १ ॥ काय गातो हें कळेना । राग आळवितो[1] नाना ॥ २ ॥ आशा

1 गायन करितो.

धरूनियां मनीं । कांहीं देईल ह्मणउनी ॥ ३ ॥ वितीभरी पोटासाठीं । तुका ह्मणे पडिली तुटी ॥ ४ ॥

२२९ वरतें करोनियां तोंड । हाका मारितो प्रचंड ॥ १ ॥ राग आळवितो नाना । गातो काय तें कळेना ॥ २ ॥ आशा धरोनि मनीं । कांहीं देईल ह्मणऊनि ॥ ३ ॥ पोटा एकासाठीं । तुका ह्मणे जाले कष्टी ॥ ४ ॥

२३० जालासी पंडित पुराण सांगसी । परी तूं नेणसी मी हें कोण ॥ १ ॥ गाढवभरी पोथ्या उलथिशी पानें । परि गुरुगम्यखुणे नेणशी बापा ॥ २ ॥ तुका कुणबियाचा नेणे शास्त्रमत । एक पंढरिनाथ विसंबेनां ३

२३१ लय लक्षूनिया जालों ह्मणती देव । तोही नव्हे भाव सत्य जाणा ॥ १ ॥ जालों बहुश्रुत नलगे आतां कांहीं । नको राहूं तेही निश्चितीनें ॥२॥ तपें दानें काय मानिसी विश्वास । बीज फळ त्यास आहे पुढें ॥३॥ क

१ विसरेना. २ पुष्कळ श्रवण केलेला.

र्म आचरण यातीचा[1] स्वगुण। विशेष तो गु-
ण काय तेथें ॥ ४ ॥ तुका ह्मणे जरी होईल
निष्काम। तरीच होय राम देखे डोळां ॥५॥

२३२ देव होसी तरी आणिकांतें करिसी।
संदेह[2] येविशीं करणें न लगे ॥ १ ॥ दुष्ट होसी
तरी आणिकांतें करिसी। संदेह येविशीं क-
रणें न लगे ॥ २ ॥ तुका ह्मणे जें दर्पणीं[3] बिं-
बलें। तें तया बाणलें निश्चयेंसीं ॥ ३ ॥

२३३ देव तीर्थी येर दिसे जया ओस।
तोचि तया दोष जाणतिया ॥ १ ॥ तया बरें
फावे देवा चुकवितां। संचिताची सत्ता अं-
तराय ॥ २ ॥ शुद्धाशुद्ध ठाव पापपुण्यबीज।
पाववील दुजे फळभोग ॥ ३ ॥ तुका ह्मणे
विश्वंभरा ऐसें वर्म। चुकलिया धर्म अवघे
मिथ्या ॥ ४ ॥

२३४ जग अवघें देव। मुख्य उपदेशाची
ठेव ॥ १ ॥ आधीं आपणया नासी। तरी उ-
तरे ये कसीं ॥ २ ॥ ब्रह्मज्ञानाचें कोठार। तें

१ जातीचा. २ संशय. ३ आरशांत.

हें निश्चयें उत्तर ॥३॥ तुका ह्मणे ते उन्मनी[1] । नास कार्य कारणीं ॥ ४ ॥

२३५ जन देव तरी पायांचि पडावें । त्याचिया स्वभावें चाड नाहीं ॥ १ ॥ अग्नीचें सौजन्य[2] शीतनिवारण । पालवीं बांधोन नेतां नये ॥ २ ॥ तुका ह्मणे विंचू सर्प नारायण । वंदावे दुरोन शिवों नये ॥ ३ ॥

२३६ मुंगी होउनि साखर खावी । निजवस्तूची भेटी घ्यावी ॥ १ ॥ वाळवंटीं साखर पडे । गज येऊनि काय रडे ॥ २ ॥ जाला हरिदास गोसांवी । अवघी मायिक क्रिया दावी ॥ ३ ॥ पाठ पाठांतरिक विद्या । जनरंजवणीस द्या ॥ ४ ॥ प्रेम नसतां अंगा आणी । दृढ भाव नाहीं मनीं ॥ ५ ॥ ब्रह्मज्ञान वाचे बोले । करणी पाहतां न निवती डोळे ॥ ६ ॥ मिथ्या भगल वाढविती । आपुली आपण पूजा घेती ॥ ७ ॥ तुका ह्मणे धाकुटें व्हावें । निजवस्तूसी मागुनि घ्यावें ॥ ८ ॥

1 पांचवी अवस्था. २ सुजनता, सरणपणा.

२३७ जाऊनियां तीर्था काय तुवां केलें। चर्म प्रक्षाळिलें वरी वरी ॥१॥ अंतरींचें शुद्ध कासयानें जालें। भूषण त्वां केलें आपणया ॥ २ ॥ वृंदावन फळ घोळिलें साकरा। भीतरील थारा मोडेचिना ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं शांति क्षमा दया। तोंवरी कासया फुंदा तुह्मी ॥ ४ ॥

२३८ आधारावांचुनी। काय सांगसी कार्हाणी ॥ १ ॥ ठावा नाहीं पंढरीराव। तोंवरी अवघेंचि वाव ॥ २ ॥ मानिताहे कोण। तुझें कोरडें ब्रह्मज्ञान ॥ ३ ॥ तुका ह्मणे ठेवा। जाणपण एक सवा ॥ ४ ॥

२३९ काय तीं करावीं मोलाचीं माकडें। नाचताती पुढें संसाराच्या ॥ १ ॥ झाडा देतेवेळे विचकिती दांत। घेती यमदूत दंड वरी ॥ २ ॥ हात दांत कान हालविती मान। दाखविती जन मानावया ॥ ३ ॥ तुका ह्मणे किती जालीं हीं फजित। मागें नाहीं नीत भाग्वाहा ॥ ४ ॥

---

१ कातडें, त्वचा. २ भुतलें. ३ गोष्ट.

२४० सोंगें छंदें कांहीं । देव जोडे ऐसें नाहीं ॥ १ ॥ सारा अवघें गाबाळ । डोळ्या आडील पडळ ॥ २ ॥ शुद्ध भावांवीण[1] । जो जो केला तो तो शीण ॥३॥ तुका ह्मणे कळे । परि होताती अंधळे ॥ ४ ॥

२४१ चोरटें कांचें[2] निघालें चोरी । आपलें तैसें पारखें[3] घरीं ॥ १ ॥ नाहीं नफा नागवे आपण । गमाविले कान हात पाय ॥ २ ॥ बुद्धिहीन नये कांहींच्चि कारणा । तयासवें जाणा तेंच्चि सुख ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं ठाउकें वर्म । तयासी तें कर्म वोडवलें ॥ ४ ॥

२४२ नव्हती हे उसणे बोल । आहाच फोल रंजवण ॥ १ ॥ अनुभव तो वरावरी । नाहीं दुरी वेगळा ॥ २ ॥ पाहिजे तें आलें रुची । काचाकुची काशाची ॥ ३ ॥ तुका ह्मणे लाजे आड । त्याची चाड कोणासी॥४॥

२४३ शेखीं[4] हें ना तैसें जालें । बोलणें तितुकें वाया गेलें ॥१॥ स्वयें आपणचि रिता ।

---

१ श्रद्धेवीण. २ कच्चें. ३ दुसऱ्याचें. ४ शेवटीं.

रडे पुढिलांच्या[1] हिता ॥२॥ सुखसागरीं नेघे वस्ती । अंगीं ज्ञानपणाची मस्ती ॥३॥ तुका ह्मणे गाढव लेका । जेथें भेटेल तेथें ठोका ४

२४४ तोचि लटक्यामाजीं भला । ह्मणे देव म्यां देखिला ॥ १ ॥ ऐशियाच्या उपदेशें । भवबंधन कैसें नासे ॥ २ ॥ बुडवी आपणा-सारिसें । अभिमानें आणिकांस ॥ ३ ॥ आ-णिक नाहीं जोडा । देव ह्मणवितां या मूढा ॥ ४ ॥ आणिकांचें न मनी साचें । तुका ह्मणे या श्रेष्ठांचें ॥ ५ ॥

२४५ खोल ओलें पडे तें पीक उत्तम । उथळाचा श्रम वाया जाय ॥ १ ॥ लटिक्या-चे आह्मी नव्हे सांठेकरी । थीतें घाली भरी पदरींचें ॥ २ ॥ कोणा इहलोकीं पाहिजे प-सारा । दंभ पोट भरायाचे चाडे[2] ॥ ३ ॥ तुका ह्मणे कशीं[3] अगीं जें उतरे । तेंचि येथें सरे जाति शुद्ध ॥ ४ ॥

२४६ अनुभवावांचून सोंग संपादणें । न-

१ दुसऱ्याच्या. २ इच्छेनें. ३ कसाला.

व्हे हें करणें स्वहिताचें ॥ १ ॥ तैसा नको भुलों बाहिरल्या रंगें । हित तेंचि वेगें करूनि घेई ॥ २ ॥ बहुरूपी रूपें नटला नारायण । सोंग संपादून जैसा तैसा ॥ ३ ॥ पाषाणाचें नांव ठेवियलें देव । आणिका तारी भाव परी तो तैसा ॥ ४ ॥ कनक[1] झाड म्हुण वंदियेलें माथां । परि तेहि अर्था न मिळे माजी ॥ ५ ॥ तुका ह्मणे त्याचा भाव तारी त्यास । अहंभावीं नास तोचि पावे ॥ ६ ॥

२४७ रुचे सकळां मिष्टान्न । रोग्या विखाच्या समान ॥ १ ॥ तरी कां तया एकासाठीं । कामें अवघीं करणें खोटीं ॥ २ ॥ दर्पण नावडे एका । ठाव नाहीं ज्याच्या नाका ॥ ३ ॥ तुका ह्मणे खळा । उपदेशाचा कांटाळा ॥ ४ ॥

२४८ मागें संतीं होतें जें जें सांगितलें । तें येऊं लागलें अनुभवा ॥ १ ॥ आचारभ्रष्ट होती लोक कळी । पुण्य क्षीण बळी जालें

---

१ धोतऱ्याच्या झाडाला कनक ह्मणतात.

पाप ॥ २ ॥ वर्णधर्म कोणी न धरी विटाळ । घालिती गोंधळ एके ठायीं ॥ ३ ॥ वेदाचे पाठक[1] सेवितील[2] मद्य । न देखती भेद विषयीं भांड ॥ ४ ॥ तुका ह्मणे किती करावे फजित । तेचि छंद नित्य बहु होती ॥ ५ ॥

२४९ तुह्मां सांगतों कलयुग फळ । पुढें होइल ब्रह्मगोळ ॥ १ ॥ आह्मां ह्मणतील कंटक । ऐसा पाडिती दंडक ॥ २ ॥ स्त्रिया पूजुनि सरे देती । भलते स्त्रियेसि भलते जाती ॥ ३ ॥ श्रेष्ठ वर्ण वेदविद्वांस । अंगीकारिति मद्यमांस ॥ ४ ॥ चारी वर्ण अठरा याती । कवळ करिती एक पंक्ती ॥ ५ ॥ ह्मणती अंबेचा क्रीडाकल्लोळ । शिवरूप प्राणी सकळ ॥ ६ ॥ वाम कवळ मार्जन । जन जाईल अधःपतन ॥ ७ ॥ ऐसें होइल शकुन देतों । अगोदर सांगून जातों ॥८॥ तुका सद्गुरुदास्य करी । सिद्धि पाणी वाहे घरीं ॥ ९ ॥

२५० कलिधर्म मागें सांगितले संतीं ।

---

१ पठन करणारे. २ सेवा.

आचार सांडिती द्विजलोक ॥१॥ तेचि कळीं आतां येतसे प्रचिती । अधर्मी टेंकती धर्म नव्हे ॥ २ ॥ तप व्रत करितां लागतो सायास । पाळितां पिंडासं गोड वाटे ॥ ३ ॥ देव ह्मणऊनी न येती देऊळा । संसारा वेगळा तरी कां नव्हे ॥ ४ ॥ तुका ह्मणे मज धरितां गुमान । ऐसे कोणी जन नरका जाती ॥ ५ ॥

---

## व्यवहारिक अभंग.

:०:

१ साधक जाले कळी । गुरुगुडीची लांब नळी ॥ १ ॥ पचीं पडे मद्यपान । भांगभुर्की हें साधन ॥ २ ॥ अभेदांचें पाठांतर । अति विषयीं पडिभर ॥ ३ ॥ चेल्यांचा सुकाळ । पिंडदंड भगपाळ ॥ ४ ॥ सेवा मानधन । बरे इच्छेनें संपन्न ॥ ५ ॥ सोंगाच्या नरकाडीं । तुका बोडोनियां सोडी ॥ ६ ॥

---

१ अनुभवास. २ देहास. ३ एकरूप.

२ हातीं होन दावी बेणा । करिती लेंकीच्या धारणा ॥ १ ॥ ऐसे धर्म जाले कळीं । पुण्य रंक पाप बळी ॥२॥ सांडिले आचार । द्विज चाहाड जाले चोर ॥ ३ ॥ टिळे लपविती पातेंडीं । लेती विजार कातडीं ॥ ४ ॥ बैसोनियां तक्ता । अन्नेविण पिडिती लोकां ॥ ५ ॥ मुद्बख लिहिणें । तेलतुपावरी जिणें ॥ ६ ॥ नीचाचे चाकर । चुकलिया खाती मार ॥ ७ ॥ राजा प्रजा पीडी । क्षेत्री दुश्चितासी तोडी ॥ ८ ॥ वैश्यशूद्रादिक । हे तों सहज नीच लोक ॥ ९ ॥ अवघे बाह्य रंग । आंत हिरवें वरी सोंग ॥ १० ॥ तुका ह्मणे देवा । काय निद्रा केली धांवा ॥ ११ ॥

३ अंगीं ब्रह्मक्रिया खिस्तीचा व्यापार । हिंडे घरोघर चांडाळाचे ॥ १ ॥ अंत्यजाची खिचडी घेताती मागून । गाळियाप्रदान मायबहिणी ॥ २ ॥ उत्तमकुळीं जन्म क्रिया अमंगळ । बुडविलें कूळ उभयतां ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसी

१ पंचांग. २ जगणें, निर्वाह. ३ नीचाबरोबर.

कलयुगाची चाली । स्वार्थें बुडविलीं उ
चरणें ॥ ४ ॥

४ खिस्तीचा उदीम[1] ब्राह्मण कलयुगीं । ग
हारवाडी मांगीं हिंडतसे ॥ १ ॥ वेवसाव क
रितां पर्वतें[2] मांगासी । ते पैं विटाळासी
मानिती ॥ २ ॥ मांगिणीशीं नित्य करीत
लेखा । तोंडावरी थुंका पडतसे ॥ ३ ॥ आइ
माया रांडा नांव हें कागदीं । आठवीना कध
नारायण ॥ ४ ॥ तुका ह्मणे देह जाला पर
धीन । पांडुरंगाविण गति नाहीं ॥ ५ ॥

५ कलयुगामाजी थोर झाले बंड । न
लोक लंडे[3] जाले फार ॥ १ ॥ न धरिती सो
न पुसती कोणा । येतें जैसें मना तैसें चा
॥ २ ॥ सज्जनाचा वारा टेकों नेदी द्वारा । पे
सिया पामरा तारी कोण ॥ ३ ॥ विश्वास त
याचा बैसेना कोठेंही । स्तुति निंदा पाह
जीवीं धरी ॥ ४ ॥ तुका ह्मणे कैसें केलें ना
रायणें । जाणावें हें कोणें तयाविण ॥ ५ ॥

---

१ व्यापार. २ संबंध. ३ मूर्ख.

६ उपदेश तो भलत्या हातीं । जाला चित्तीं धरावा ॥ १ ॥ नये जाऊं पात्रावरी । कवटी सारनारळी ॥ २ ॥ स्त्री पुत्र बंदीजन[1] । नारायण स्मरविती ॥ ३ ॥ तुका ह्मणे रत्नसार । परी आधार चिंधीचा ॥ ४ ॥

७ उपकारासाठीं बोलो हे उपाय । येणेंविण काय चाड आह्मां ॥ १ ॥ बुडतां हे जन न देखवे डोळां । येतो कळवळा ह्मणऊनि ॥ २ ॥ तुका ह्मणे माझे देखतील डोळे । भोग देते वेळे येईल कळों ॥ ३ ॥

८ बोलिलों तें कांहीं तुमचिया हिता । वचन नेणतां क्षमा कीजे ॥ १ ॥ वाट दावी तया न लगे शिणावें । अतित्योई[2] जीवें नाश पावे ॥ २ ॥ निंब दिला रोग तुटाया अंतरीं । पोभाळितां वरी आंत चरे ॥ ३ ॥ तुका ह्मणे हित देखण्यासि[3] कळे । पडती आंधळे कूपामाजीं ॥ ४ ॥

९ आतां माझे नका वाणूं गुण दोष । क-

---

१ भाट. २ अत्याग्रही. ३ डोळस.

रितों उपदेश याचा कांहीं ॥ १ ॥ मानदंभासाठीं छळीतसें कोणा । आण या चरणां विठोबाची ॥ २ ॥ तुका ह्मणे हें तों ठावें पांडुरंगा । काय कळे जगा अंतरींचें ॥ ३ ॥

१० पर्वकाळीं धर्म न करी नासरी । खर्ची राजद्वारीं द्रव्यरासी ॥ १ ॥ श्राद्धीं कष्टी होय सांगतां ब्राह्मण । गोवार मागून सावडीतो ॥ २ ॥ नेतो पानें फुलें वेश्येला उदंड । ब्राह्मणासी खांड नेदी एक ॥ ३ ॥ हातें मोऱ्या शोधीं कष्ट करी नाना । देवाच्या पूजना कांटाळतो ॥ ४ ॥ सारा वेळ धंदा करितां श्रमेना । साधूच्या दर्शना जातां कुंथे ॥ ५ ॥ हरीच्या कीर्तनीं गुंगायासि लागे । येरवीं तो जागे उगलाचि ॥ ६ ॥ पुराणीं बैसतां नाहीं रिकामटी । खेळतो सोंगटी अहोरात्र ॥ ७ ॥ देवाच्या विभूती न पाहे सर्वथा । करी पानवथा नेत्रभिक्षा ॥ ८ ॥ गाईला देखोनी बदबदा मारी । घोड्याची चाकरी गोड लागे

१ शपथ. भाक. २ वेळ.

॥ ९ ॥ ब्राह्मणाचें तीर्थ घेतां त्रास मोठा । प्रेमें घेतो घोटा[1] घटघटां ॥ १० ॥ तुका ह्मणे ऐसे प्रपंचीं गुंतले । जन्मोनि मुकले विठोबासी ॥ ११ ॥

११ सोईऱ्यासी करी पाहुणेर बरा । कांडितो ठोंबरा[2] संतांलागीं ॥ १ ॥ गाईसी देखोनी बदबदां मारी । घोड्याची चाकरी गोड वाटे ॥ २ ॥ पान फुलें नेतो वेश्येसी उदंड । ब्राह्मणासी खांड देऊं नेदी ॥ ३ ॥ कीर्तना जावया होतसे हिंपुष्टी[3] । खेळतो सोंगटी रात्रंदिवस ॥ ४ ॥ बाइलेच्या गोता आवडीनें पोसी । मातापितयांसी दवडितो ॥ ५ ॥ तुका ह्मणे त्याच्या थुंका तोंडावरी । जातो यमपुरी भगावया ॥ ६ ॥

१२ साधूच्या दर्शना लाजसी गव्हारा[4] । वेश्येचिया घरा पुष्पें नेसी ॥ १ ॥ वेश्या दासी मुरळी जगाची वोंगळी । तें तुज सोंवळी वाटे कैशी ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां लाज

---

१ भांग. २ जोंधळ्याच्या कण्या. ३ कष्टी. ४ मूर्खा.

धरी बुच्यां। टांचराच्या कुच्यां मारा वेगीं ३

१३ देवाचिया वस्त्रा स्वप्नींही नाठवी। स्त्रियेसी पाठवी उंच साडी ॥ १ ॥ गाईचें पाळण नयेचि विचारा। अश्वांसी खरारा करी अंगें ॥२॥ लेंकराची रांस स्वयें धांवे क्षाळूं। न ह्मणे प्रक्षाळूं द्विजपायां ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्याच्या तोंडावरी थुंका। जातो यमलोका भोगावया ॥ ४ ॥

१४ उरा लावी ऊर आळंगितां कांता। संतासी भेटतां अंग चोरी ॥ १ ॥ अतीत देखोनि होय पाठमोरा। व्याह्यासी सामोरा जाय वेगीं ॥२॥ द्विजा नमस्कार मनीं भाव कैंचा। तुर्काचे दासीचा लेंक होय ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुह्मी क्रोधासी न यावें। स्वभावा करावें काय कोणीं ॥ ४ ॥

१५ संत देखोनियां स्वयें दृष्टी टाळी। आदरें व्याहाळी परस्त्रीसी ॥१॥ वीट ये कर्णासी संतवाक्यामृता। स्त्रीशब्द ऐकतां निवे

१ गांढवा. २ लाथा. ३ घोड्याला. ४ ढुंगण.

कर्ण ॥ २ ॥ कथेमाजी निज वाढे नित्यक्षणीं । क्रियेचे कीर्तनीं प्रेमें जागे ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुह्मी क्रोधासी न यावें । स्वभावा करावें काय कोणी ॥ ४ ॥

१६ संत मागे पाणी नेदी एक चूळी[1] । दासीस आंघोळी ठेवी पाणी ॥१॥ संतासी देखोनी होय पाठमोरा । दासीचिया पोरा चुंबन देतों ॥ २ ॥ संतासी देखोनी करितो टवाळ्या । भावें धुतो चोळ्या दासीचिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्याच्या तोंडावरी थुंका । जातो यमलोका भोगावया ॥ ४ ॥

१७ पापिया चांडाळा हरिकथा नावडे । विषयालागीं आवडे गाणें त्याला ॥ १ ॥ ब्राह्मणा दक्षणा देतां रंडे रुका[2] । विषयालागीं फुका लुटीतसे ॥ २ ॥ वीतभरी लंगोटी नेदी अतीताला । खीरम्या देतो शाला भोरप्यासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्याच्या थुंका तोंडावरी । जातो यमपुरी भोगावया ॥ ४ ॥

---

१ चुळकाभर. २ एक पैसा.

१८ बाइल तरी ऐसी व्हावी । नरकीं गं[1]वी अनिवार ॥ १ ॥ घडों नेदी तीर्थयात्रा केला कुतरा हातसोंका[2] ॥ २ ॥ आपुली करवी सेवा । पुजवी देवासारिखें ॥ ३ ॥ तुका ह्मणे गाढव पशु । केला नाशु आयुष्याचा ॥ ४ ॥

१९ बाइले अधीन होय ज्याचें जिणें । तयाच्या अवलोकनें पडिजे ह्राडें[3] ॥ १ ॥ कासय ते जंत जिताती संसारीं । माकडाच्या परी गारोड्यांच्या ॥ २ ॥ बाइलेच्या मना येईल तें खरें । अभागी तें पुरें बाइलेचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मेग्या गाढवाचें जिणें । कुतऱ्याचें खाणें लगबगा ॥ ४ ॥

२० धिग जीणें तो बाईले आधीन । परलोक मान नाहीं दोन्ही ॥ १ ॥ धिग जिणें ज्याचें लोभावरी मन । अतितपूजन घडेचिना ॥ २ ॥ धिग जिणें आळस निद्रा जया फार । अमित आहार अघोरिया ॥ ३ ॥ धिग

१ घाली, गुंतवी. २ हातीं आलेला. ३ वाईट.

जिणें नाहीं विवेक वैराग्य । झुरे मानालागीं साधुपणा ॥ ४ ॥ तुका ह्मणे धिग ऐसे जाले लोक । निंदक वादक नरका जाती ॥ ५ ॥

२१ सुखें बोळंब दावी गोहों । माझें दुःख नेण पाहा ॥ १ ॥ आवडीचा मारिला वेडा । होय होय कैंचा ह्मणे भिडा ॥ २ ॥ निपट मज न चले अन्न । पायली गहूं सांजा तीन ॥ ३ ॥ गेले वारीं तुह्मीं आणिली साखर । सातादिन गेली साडेदहा शेर ॥ ४ ॥ अखंड मज पोटाची व्यथा । दूधभात साखर तूप पथ्या ॥५॥ दो पहारा मज लहरी येती । शुद्ध नाहीं पडे सुपेती ॥ ६ ॥ नीज नये घाली फुलें । जवळीं न साहती मुलें ॥ ७ ॥ अंगीं चंदन लावितें भाळीं । सदा शूळ माझे कपाळीं ॥ ८ ॥ हाड गळोनि उरलें मांस । माझें दुःख तुह्मां नेणवे कैसें ॥ ९ ॥ तुका ह्मणे जिता गाढव केला । मेलियावरि नरका नेला ॥ १० ॥

२२ भ्रातारासी भार्या बोले गुज गोष्टी ।

---

१ जगणें. २ नवरा. ३ आंथरूण.

मज ऐसी कष्टी नाहीं दुजी ॥ १ ॥ अखंड तुमचें धंद्यावरी मन । माझें तों हेळणें करिती सर्व ॥ २ ॥ जोडितसां तुह्मी खाती येरचोरें । माझीं तंव पोरें हळहळती ॥ ३ ॥ तुमची व्यौली माझे डाई हो पेटली । सदा दुष्ट बोली सोसवेना ॥ ४ ॥ दुष्टवृत्ति नंदुली सदा द्वेष करी । नांदों मी संसारीं कोण्या सुखें ॥ ॥ ५ ॥ जावा दीर कांहीं धड हा न बोले । नांदों कोणां खालें कैसी आतां ॥ ६ ॥ माझ्या अंगसंगें तुह्मांसी विश्रांति । मग धडगति नाहीं तुमची ॥ ७ ॥ ठाकतें ठमकतें जीव मुठी धरूनि । परी तुह्मी अजूनि न धरा लाज ॥ ८ ॥ वेगळें निघतां संसार करीन । नाहीं तरी प्राण देतें आतां ॥ ९ ॥ तुका ह्मणे जाला कामाचा अंकित । सांगे मनोगत तैसा वर्ते १०

२३ कामाचा अंकित कांतेतें प्रार्थित । तूं कां हो दुश्चितें निरंतर ॥ १ ॥ माझीं मायबापें बंधु हो बहिण । तुज करी शीण त्यागीन मी

१ तुच्छता. २ आई. ३ अस्वस्थ.

॥ २ ॥ त्यांचें जरी तोंड पाहेन मागुता । तरी मज हत्या घडो तुझी ॥ ३ ॥ सकाळीं उठोन वेगळा निघेन । वाहातों तुझी आण निश्चयें-सी ॥ ४ ॥ वेगळें निघतां घडीन दोरें चुडा । तूं तंव माझा जोडा जन्माचा कीं ॥ ५ ॥ ताईत सांकळी गळांची दुलडी । बाजुबंद जोडी हातसर ॥ ६ ॥ वेणीचे जे नग सर्वही करीन । नको धरूं शीण मनीं कांहीं ॥ ७ ॥ नेसावया साडी सेलारी चुनडी । अंगींची कांचोळी जाळिया फुलें ॥ ८ ॥ तुका ह्मणे केला रांडेनें गाढव । मनासवें धांव घेतलीसे ९

२४ एका पुरुषा दोघी नारी । पाप वसे त्याचे घरीं ॥ १ ॥ पाप नलगे धुंडावें[2] । लागेल तेणें तेथें जावें ॥ २ ॥ कांहीं दुसरा विचार । न लगे करावाचि फार ॥ ३ ॥ असत्य[3] जे वाणी । तेथें पापाचीच खाणी ॥ ४ ॥ सत्य बोले मुखें । तेथें उचंबळती सुखें ॥ ५ ॥ तुका ह्मणे दोन्ही । जवळीच लाभहानी ॥ ६ ॥

---

१ शपथ. २ शोधावें. ३ मिथ्या.

२५ बाईल सवासिण आई । आपण पितरांचे ठायीं ॥ १ ॥ थोर वेंच जाला नष्टा । अवघ्या अपसव्य[1] चेष्टा ॥ २ ॥ विषयांचे चरवणीं । केली आयुष्याची गाळणी ॥३॥ तुका ह्मणे लंडा[2] । नाहीं दया देव धोंडा ॥ ४ ॥

२६ दासीचा[3] जो संग करी । त्याचे पूर्वज नर्कद्वारीं ॥ १ ॥ ऐसें सांगों जातां जना । नये कोणाचिया मना ॥ २ ॥ बरें विचारूनि पाहें । तुज अंतीं कोण आहे ॥ ३ ॥ तुका ह्मणे रांडलेंका । अंतीं जासिल यमलोका ॥ ४ ॥

२७ बाईल चालिली माहेरा । संगें दिधला ह्मातारा ॥ १ ॥ सिधा सामग्री पोटाची । सवें स्वारी बइलाची ॥ २ ॥ जातां पाडिली ढोरानें । शिव्या देती अन्यजन ॥ ३ ॥ न सावरी आपणातें । नग्न सांवलें[4] वरतें ॥४॥ फजित केलें जनलोकीं । मेला ह्मणे पडे नरकीं ॥ ५ ॥ गोहांची[5] हे गेली लाज । गांजितां कां तुह्मी मज ॥ ६ ॥ तुका ह्मणे जनीं । छी थू केली विटंबणी ॥ ७ ॥

१ विरुद्ध. २ मूर्खा. ३ बटकीचा ४ वस्त्र. ५ नवऱ्याचा.

२८ पतिव्रतेची कीर्ती वाखाणितां। सिंदळी-च्या माथां तिडिक उठे ॥ १ ॥ आमुचें तें आहे सहज बोलणें। नाहीं विचारून केलें कोणीं ॥ २ ॥ अंगीं उणें त्याच्या बैसे टाळक्यांत। ठिणग्या बहुत गाळीतसे ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मी काय करणें त्यासी। धका खावंदासी लागतसे ॥ ४ ॥

२९. जातीची शिंदळी। तिला कोण कसा चळी ॥ १ ॥ आपघर ना बापघर। चित्तीं मनीं व्यभिचार ॥ २ ॥ सेजे असोनियां ध-नी। परद्वार मना आणी ॥ ३ ॥ तुका ह्मणे असल जाती। जातीसाठीं खावी माती ॥४॥

३० पतिव्रता ऐसी जगामध्यें मात। भो-गी पांच सात अंधारीं ते ॥ १ ॥ भ्रतारासी लेखी श्वानाचे समान। परपुरुषीं जाण सं-भ्रम तो ॥ २ ॥ तुका ह्मणे तिच्या दोषा ना-हीं पार। भोगील अघोर कुंभपाक ॥ ३ ॥

३१ सिंदळीसी नाहीं पोराची पैं आस।

१ डोकें दुखतें. २ मालकाला. ३ परपुरुष.

राहे बीज त्यास काय करी ॥ १ ॥ अथवा शेतीं बीज पेरिलें भाजोन । सारा देईल कोण काका त्याचा ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं राखायाची चाड । तरी कां लिगाडें करूनी घेतो ॥ ३ ॥

३२ स्त्रिदळीचें चित्त परपुरुषावरी । पति चुरमुगी रात्रंदिवस ॥ १ ॥ ऐसी ते वोंगळी जाय वो नरका । तिच्या दोषें देखा पति जाय ॥ २ ॥ आपण बुडती पति बुडविती । दोन्ही कुळें नेती अधःपाता ॥ ३ ॥ तुका ह्मणे तिची न करावी संगती । होईल फजिती मागें पुढें ॥ ४ ॥

३३ दगडाच्या देवा बगाई नवस । बाईल कथेसी जाऊं नेदी ॥ १ ॥ वेंची धनरासी बांधिलें स्मशान । दारीं वृंदावन झाड मानी ॥ ॥ २ ॥ चोरें नागविल्या न करी त्याची खंती । परि द्विजा हातीं नेदी रुका ॥ ३ ॥ करी पाहुणेर व्याह्याजांवयासी । आल्या अतीतासी

१ इच्छा. २ लचांड. ३ नरक. ४ गळ टोंचून घेणें.

पाठमोरा ॥ ४ ॥ तुका ह्मणे जळो धिग त्याचें जिणें । भारवाही शीण वर्म नेणे ॥ ५ ॥

३४ गोहो[1] यावा गांवा । ऐसें नवस करी आवा[2] ॥ १ ॥ कैंचें पुण्य तिचे गांठीं । व्रतें वेंची लोभासाठीं ॥ २ ॥ वाढावें संतान । गृहीं व्हावें धनधान्य ॥ ३ ॥ मागे गारगोटी । परिसाचिये साटोवाटी ॥ ४ ॥ तुका ह्मणे मोल । देऊन घेतला सोमल ॥ ५ ॥

३५ गर्भाचें धारण । तिनें वागविला सिण ॥ १ ॥ व्याली कुऱ्हाडीचा दांडा । वर न घालीच तोंडा ॥ २ ॥ उपजला काळ । कुळा लाविला विटाळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे जाय । नरका अभक्ताची माय ॥ ४ ॥

३६ देखोनि हरखली[3] अंड । पुत्र जाला ह्मणे रांड । तंव तो झाला भांड । चाहाड चोर शिंदळ ॥ १ ॥ जाय तिकडे पिडी लोकां । जोडी भांडवल थुंका । थोर जाला चुका । वर कां नाहीं घातली ॥ २ ॥ भूमि कां-

---

१ नवरा. २ बायको. ३ आनंदली.

पे त्याच्या भारें । कुंभपाकाचीं शरीरें । बोले निष्ठुर उत्तरें । पापदृष्टी मळिणचित्त ॥ ३ ॥ दुराचारी तो चांडाळ । पाप सांगातें विटाळ । तुका ह्मणे खळ[1] । म्हणोनियां निषिद्ध तो ॥ ४ ॥

३७ पुत्र जाला चोर । मायबापां हर्ष थोर १ आतां कशासाठीं जोडी । हाट घाटे गुंडगे[2] घडी ॥ २ ॥ ऐते अपहार[3] । आणूनियां भरी घर ॥ ३ ॥ मानिली निश्चिंती । नरका जावया उभयतीं ॥ ४ ॥ झोडा झोडगीचे पोटीं । फळें बीजें तीं करंटीं ॥ ५ ॥ तुका ह्मणे बेट्या । भांडवल नलगे खट्या ॥ ६ ॥

३८ ऐसे कुळीं पुत्र होती । बुडविती पूर्वजा ॥ १ ॥ चाहाडी चोरी भांडवला । वांटा आला भागासी ॥ २ ॥ त्याचियानें दुःखी मही । भार तेही न साहे ॥ ३ ॥ तुका ह्मणे ग्रामपशु । केला नाशु आयुष्या ॥ ४ ॥

३९ जळो तिचें तोंड । ऐसी कां ते व्या-

---

१ दुर्जन. २ दागीने. ३ दुसऱ्याचें धन चोरणें.

ली रांड ॥ १ ॥ सदा भोंवयांसी गांठी । क्रो-
ध धडधडीत पोटीं ॥ २ ॥ फोडिली गोंवरी।
ऐसी दिसे तोंडावरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं।
चित्ता समाधान कांहीं ॥ ४ ॥

४० देवें दिला देह भजना गोमटा । तो
या जाला फांटा बाधिकेचा ॥ १ ॥ ताठोनि-
यां मान राहिली वरती । अहंकारा हातीं ल-
वों नेदी ॥ २ ॥ दास ह्मणावया न वळे रस-
ना । सङ्गवचनां वासे गळा ॥ ३ ॥ तुका
ह्मणे कोठें ठेवावा विटाळ । स्नानें पैं निर्मळ
व्हावयासी ॥ ४ ॥

४१ मायबाप करिती चिंता । पोर नाइके
सांगतां ॥ १ ॥ नको जाऊं देउळासी । नेतो
बागुल लोकांसी ॥ २ ॥ कर्णद्वारें पुराणिक ।
भुलवी शब्दें लावी भीक ॥ ३ ॥ वैष्णवांसं-
गती । हातीं पडलीं नेणों किती ॥ ४ ॥ आ-
ह्मां कैंचा मग । करिसी उघडियांचा संग ५
तुका म्हणे जाणे नरका । त्यांचा उपदेश
आइका ॥ ६ ॥

१ भिवयांसी. २ चांगला. ३ वायफळ बोलणें.

४२ काय पोरा लागली चट[1]। धरी वाट देउळाची ॥ १ ॥ सांगितलें नेघे कानीं । दुजें मनीं विठ्ठल ॥ २ ॥ काम घरीं न करी धंदा। येथें सदा दुश्चित ॥ ३ ॥ आमचे कुळीं नव्हतें ऐसें । हेंच पिसें[2] निवडलें ॥ ४ ॥ लौकिकाची नाहीं लाज । माझें मज पारिखें ५ तुका ह्मणे नरका जाणें । त्या वचनें दुष्टांचीं६

४३ कन्या गो[3] करी कथेचा विकरा । चांडाळ तो खरा तया नांवें ॥१॥ गुण अवगुण हे दोन्ही प्रमाण । यातीशीं कारण नाहीं देवा२ जे जैसें करिती ते तैसें पावती । भोग ते भोगिती केले कर्मी ॥ ३ ॥ आशाबद्ध करूं नये ते करिती । तुका ह्मणे जाती नरकामधीं ॥४॥

४४ सालंकृत कन्यादान । पृथ्वीदानाच्या समान ॥ १ ॥ परि तें न कळे या मूढा । येईल कळों भोग पुढा ॥ २ ॥ आचरतां कर्म । भरे पोट राहे धर्म ॥ ३ ॥ सत्या देव साहे । ऐसें करूनियां पाहे ॥ ४ ॥ अन्न मान धन ।

१ नाद, छंद. २ वेड. ३ गाय.

हें तों प्रारब्धा आधीन[1] ॥ ५ ॥ तुका ह्मणे सोसें । दुःख आतां पुढें नासे ॥ ६ ॥

४५ ब्रह्महत्या मारिल्या गाई । आणीक काई पाप केलें ॥ १ ॥ ऐका जेणें विकिली कन्या । पवाडे त्या सुन्यांचे[2] ॥ २ ॥ नरमांस खादली भाडी । हाड हाडी ह्मणोनि ॥ ३ ॥ अवघें पाप केलें तेणें । जेणें सोनें अभिलाषिलें ॥ ४ ॥ उच्चारितां मज तें पाप । जिव्हे कांप सुटतसे ॥ ५ ॥ तुका म्हणे कोराम्न[3] रांड । बेटा भांड मागेना कां ॥ ६ ॥

४६ भाग्यासाठीं गुरू केला । नाहीं आह्मांसी फळला ॥ १ ॥ याचा मंत्र पडतां कानीं । आमुच्या पेवांत गेलें पाणी ॥ २ ॥ गुरु केला घरवासी । आमुच्या चुकल्या गाईह्मशी ॥ ३ ॥ स्वामी आपुली बुटबुट घ्यावी । आमुची परताप टाकुन द्यावी ॥ ४ ॥ तुका ह्मणे ऐसे नष्ट । त्यांसी दुणे होती कष्ट ॥ ५ ॥

४७ एक ब्रह्मचारी गाढवा झोंबतां । हा-

---

१ स्वाधीन. २ कुत्र्याचे. ३ कोरडें धान्य.

णोनिया लाता पळालें तें ॥ १ ॥ गाढवही गेलें ब्रह्मचर्य गेलें । तोंड काळें जालें जगामाजी ॥ २ ॥ होणार तैसें जालें हें ना तैसें केलें । तुका म्हणे गेलें वांयाचि ते ॥ ३ ॥

४८ दो दिवसांचा पाहुणा चालतो उताणा । कां रे नारायणा न भजसी ॥ १ ॥ तूं अखंड दुश्चित्ता तुज नेती अवचिता[1] । मग पंढरिनाथा भजसी केव्हां ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसे आहेत उदंड । तया केशव प्रचंड केवीं भेटे ॥ ३ ॥

४९ दिवसां व्यापारचावटी । रात्रीं कुटुंबचिंता मोठी ॥ १ ॥ काय करूं या मनासी । नाठवे हृषीकेशी ॥ २ ॥ वेश्येपाशीं रात्रीं जागे । हरिकीर्तनीं निद्रा लागे ॥३॥ तुका ह्मणे काय जालासी । वृथा संसारा आलासी ॥४॥

५० कुंकवाची उठाठेवी । बोडकादेवी[2] काशाला ॥ १ ॥ दिवस गमा भरा पोट । कां गे नट नटावा ॥ २ ॥ दिमाख हा कोणा दावा ।

---

१ अकस्मात. २ विधवेला.

लटकी जीवा चरफड ॥ ३ ॥ तुका ह्मणे झों-डगी[1] हो । फुंदा कां हो कोरडी ॥ ४ ॥

५१ पोटासाठीं खटपट करिसो अवघा वेळ । राम राम ह्मणतां तुझी बसली दांत-खीळ ॥ १ ॥ हरिचें नाम कदाकाळीं कां रे नये वाचें । ह्मणतां राम राम तुझ्या बाचें[2] काय वेंचे ॥ २ ॥ द्रव्याचिया आशा तुजला दाही दिशा न पुरतो । कीर्तनासी जातां तुझी जड जाली माती ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐशा जीवा काय करूं आता । राम राम न ह्मणे त्याचा गाढव मातापिता ॥ ४ ॥

५२ देह जाईल जाईल । यासी काळ बा खाईल ॥ १ ॥ कां रे तुमजसी दगडा । कैंचें हत्ती घोडे वाडा ॥ २ ॥ लोडें बालिस्तें[3] सुपती । जरा आलिया फजिती ॥ ३ ॥ शरीर-संबंधाचें नातें । भोरड्या[4] उडविती शेतातें ॥ ॥ ४ ॥ अझुनि तरी होईं जागा । तुका ह्मणे पुढें दगा ॥ ५ ॥

---

१ दांडपणा. २ बापाचें. ३ तक्के. ४ पांखरें.

५३ आयुष्य मोजावया बैसला मापारी । तूं कां रे वेव्हारीं संसाराचा ॥ १ ॥ नेईल ओढोनि ठाउकें नसतां । न राहे दुश्चिता हरीविण ॥ २ ॥ कठिण हें दुःख यम जाचतील । कोण सोडवील तये ठायीं ॥ ३ ॥ राहतील दुरी सज्जन सोयरीं । आठवी श्रीहरी लवलाही ॥ ४ ॥ तुका ह्मणे किती करिसी लंडायी । होईल भंडाई पुढें थोर ॥ ५ ॥

५४ जन्मा येउनि काय केलें । तुवां मुद्दल गमाविलें ॥ १ ॥ कां रे न फिरसी माघारा । अझूनि तरी फजितखोरा ॥ २ ॥ केली गांठोळीची नासी । पुढें भीकची मागसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे ठाया । जाईं आपल्या आलिया ४

५५ रंगीं रंगेरे श्रीरंगे । काय भुललासी पतंगें ॥ १ ॥ शरीर जायाचें ठेवणें । धरिसी अभिलाष झणें ॥ २ ॥ नव्हे तुझा हा परिवार । द्रव्य दारा क्षणभंगुर ॥ ३ ॥ अंतकाळींचा सोयरा । तुका ह्मणे विठो धरा ॥ ४ ॥

---

१ माप घेणारा. २ मूर्खपणा. ३ फजिती.

५६ नये बोलों भांडा[1] । खीळ घालून बैस तोंडा ॥ १ ॥ ऐक विठोबाचे गुण । करी सादर श्रवण ॥ २ ॥ प्रेमसुखा आड । काय वाजतें जाभाड ॥ ३ ॥ तुका ह्मणे हिता । कां रे नागवसी थीता ॥ ४ ॥

५७ पंधरा दिवसां एक एकादशी । कां रे न करिसी व्रतसार ॥१॥ काय तुझा जीव जातो एका दिसें[3] । फराळाच्या मिसें धणी घेसी ॥ २ ॥ स्वहित कारण मानवेल जन । हरिकथा पूजन वैष्णवांचें ॥ ३ ॥ थोडे तुज घरीं होती उजगरे । देउळासी कां रे मरसी जातां ॥ ४ ॥ तुका ह्मणे कां रे सुकुमार जालासी । काय जाब देसी यमदूतां ॥ ५ ॥

५८ एकादशी व्रत सोमवार न करिती । कोण त्यांची गति होइल नेणों ॥१॥ काय करूं बहु वाटे तळमळ । आंधळीं सकळ बहिर्मुख ॥ ॥ २ ॥ हरिहरां नाहीं बोटभरी वाती । कोण त्यांची गति होइल नेणों ॥ ३ ॥ तुका ह्मणे

१ भाटा. २ पुढें. ३ दिवसानें.

नाहीं नारायणीं प्रीति । कोण त्यांची गति होइल नेणों ॥ ४ ॥

५९. जयाशी पैं नाहीं एकादशी व्रत । जाणावें तें प्रेत शवलोकीं ॥ १ ॥ त्याचे दिवस नित्य काळ लेखिताहे । रागें दांत खाय करकरा ॥ २ ॥ जयाच्चिये द्वारीं तुळसीवृंदावन। नाहीं तें स्मशान गृह जाणां ॥ ३ ॥ जये कुळीं नाहीं एकही वैष्णव । त्याचा बुडे भव नदीतापा ॥ ४ ॥ विठोबाचें नाम नुच्चारी जें तोंड । प्रत्यक्ष तें कुंड चर्मकाचें ॥ ५ ॥ तुका ह्मणे त्याचे काष्ठ हातपाय । कीर्तना नव जाय हरीच्चिया ॥ ६ ॥

६० गातां आइकतां कांटाळा जो करी । त्रास त्या अघोरीं कुंभपाकीं ॥ १ ॥ रागें यमधर्म जाचविती तया । तुज दिलें कासया मुख कान ॥ २ ॥ विषयांच्या सुखें अखंड जागसी । न वजे एकादशी जागरणा ॥ ३ ॥ वेंचूनियां द्रव्य सेवी मद्यपान । नाहीं दिलें

१ मृत्युलोकीं. २ प्रपंच. ३ चांभार.

अन्न अतीतासी ॥ ४ ॥ तीर्थाटण नाहीं केले उपकार । पाळिलें शरीर पुष्ट लोभें ॥ ५ ॥ तुका ह्मणे केला मग साहे दंड । नाइकनीं लंड सांगितलें ॥ ६ ॥

६१ ज्यासी नावडे एकादशी । तो जिताचि नरकवासी ॥१॥ ज्यासी नावडे हें व्रत । त्यासी नरक तोही भीत ॥ २ ॥ ज्यासी मान्य एकादशी । तो जिताची मुक्तवासी ॥३॥ ज्यासी घडे एकादशी । जाणें लागे विष्णूपाशीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे पुण्यराशी । तोचि करी एकादशी ॥ ५ ॥

६२ करवितां व्रत अर्धें पुण्य लाभे । मोडवितां दोघे नरका जाती ॥ १ ॥ शुद्धबुद्धि दोघां होय एक मान । चोरासवें कोण जिवें राखे ॥ २ ॥ आपुलें देऊनि आपुलाचि घात । न करावा थीत जाणोनियां ॥ ३ ॥ देऊनियां वेचें धाडी वाराणसी । नेदावें चोरासि चंद्रबळ ॥ ४ ॥ तुका ह्मणे तप तीर्थ व्रत याग ।

---

१ घरीं आलेला क्षुधित मनुष्य. २ खर्च.

भक्ति हे मारग मोडूं नये ॥ ५ ॥

६३ धर्म तो न कळे । काय झांकितील डोळे ॥ १ ॥ जीव भ्रमलेया कामें । कैसीं कळों येती वर्मे ॥ २ ॥ विषयांचा माज । कांहीं धरूं नेदी लाज ॥ ३ ॥ तुका ह्मणे लोंसी । माया नाचविती कैसी ॥ ४ ॥

६४ छळी विष्णुदासा कोणी । त्याची अमंगळ वाणी ॥ १ ॥ येऊं न द्यावा समोर । अभागी तो दुराचार ॥ २ ॥ नावडे हरिकथा । त्याची व्यभिचारीण माता ॥ ३ ॥ तुका ह्मणे याति । भ्रष्ट तयाची ते मति ॥ ४ ॥

६५ अखंड संत निंदी । ऐसी दुर्जनाची बुद्धि ॥ १ ॥ काय ह्मणावें तयासी । तो केवळ पापरासी ॥ २ ॥ जो स्मरे रामनामा । त्यासी ह्मणतो रिकामा ॥ ३ ॥ जो तीर्थ व्रत करी । त्यासी ह्मणती भिकारी ॥ ४ ॥ तुका ह्मणे विंचवाची नांगी। तैसा दुर्जन सर्वांगीं ५.

६६ जयासी नावडे वैष्णवांचा संग । जा-

१ आशेनें. २ डखीण.

णावा तो मांग जन्मांतरीं ॥ १ ॥ अपवित्र वाचा जातीचा अधर्म[1] । आचरण धर्म नाहीं दया ॥ २ ॥ मंजुळवदनीं बचनागाची कांडी । शेवटीं बिघडी जीवप्राणा ॥ ३ ॥ तुका ह्मणे ज्याचा पिता नाहीं शुद्ध । तयासी गोविंद अंतरला ॥ ४ ॥

६७ कुटल्याविण नव्हे मांडा । आळसें धोंडा पडतसे ॥ १ ॥ राग नको धरूं मनीं । गांठ मनीं सांगतों ॥ २ ॥ तरटापुढें बरें नाचे । सुतकाचें मुसळ ॥३॥ तुका ह्मणे काठी सार । करी फार शाहाणे ॥ ४ ॥

६८ आपुल्या पोटासाठीं । करी लोकांचिया गोष्टी ॥ १ ॥ जेणें घातलें संसारीं । विसरला तोचि हरी ॥ २ ॥ पोटा घाली अन्न । न ह्मणे पतितपावन ॥ ३ ॥ मी कोठील आणि कोण । हें न कळे ज्या लागून ॥४॥ तुका ह्मणे नरस्तुती[2] । करितो भाट त्रिजगतीं ॥५॥

६९ लोहो[3] परिसासी रुसलें । सोनेपणासी

---

१ नीच. २ मनुष्याचें स्तवन. ३ लोखंड.

मुकलें ॥ १ ॥ येथें कोणाचें काय गेलें । ज्याचें तेणें अनहित केलें ॥ २ ॥ गंगा आली आळशावरी । आळसी देखोनि पळे दुरी ॥३॥ गांवा खालील ओहळ । रागें गंगेसी न मिळे ॥ ४ ॥ तुका केशवाचा दास । गुरूसी न भजे शिष्य ॥ ५ ॥

७० देवाचें चरित्र नाठवे सर्वथा । विनोदार्थ कथा गोड वाटे ॥ १ ॥ हातावरी हात हासोनि आफळी[1] । वाजवितां टाळी लाज वाटे ॥ २ ॥ तुका ह्मणे थुंका त्याच्या तोंडावरी । जातो यमपुरीं भोगावया ॥ ३ ॥

७१ भाव[2] धरी तया तारील पाषाण । दुर्जना सज्जन काय करी ॥ १ ॥ करितां नव्हे नीट श्वानाचें हें पुंस[3] । खापरा परीस काय करी ॥२॥ निंबाचिया झाडा साकरेचें आळें । बीज तैसीं फळें येती तया ॥ ३ ॥ तुका ह्मणे वज्र भंगे एक वेळ । कठीण हा खेळ तयाहुनी ॥ ४ ॥

१ आपटी. २ भक्ति, श्रद्धा. ३ शेंपूट.

७२ सूकरांसी विष्ठा मानें सावकाश। मिष्टान्नाची त्यास काय गोडी ॥ १ ॥ तेवीं अभक्तासी आवडे पाखांड। न लगे त्या गोड परमार्थ ॥ २ ॥ श्वानासी भोजन दिलें पंचामृत। तरी त्याचें चित्त हाडावरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे सर्पा पाजिलीया क्षीरें। वमितां विखार विष जालें ॥ ४ ॥

७३ आपुलें वेंचूनि खांडा घाली पाव। ऐसा तो हा जीव हीनबुद्धि ॥ १ ॥ विषयांच्या संगें आयुष्याचा नास। पडियेलें ओस स्वहितांचें ॥ २ ॥ भुलल्याचें अंग आपणा पारिखें। छंदाच सारिखें वर्ततसे ॥ ३ ॥ तुका ह्मणे दुःख उमटे परिणामीं। लंपटांसी कामीं रतलिया ॥ ४ ॥

७४ आंधळयासि जन अवघेचि आंधळे। आपणासि डोळे दृष्टी नाहीं ॥ १ ॥ रोग्या विषतुल्य लगे हें मिष्टान्न। तोंडासी कारण चवी नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे शुद्ध नाहीं जो

१ डुकरासी. २ दूध. ३ विषयलंपट.

आपण । तया त्रिभुवन अवघें खोटें ॥ ३ ॥

७५ अतिवादी नव्हे शुद्ध या बीजाचा । ओळखा जातीचा अंत्यज तो ॥ १ ॥ वेद श्रुति नाहीं ग्रंथ ज्या प्रमाण । श्रेष्ठांचें वचन न मानी जो ॥ २ ॥ तुका ह्मणे मद्यपानाचें मिष्टान्न । तैसा तो दुर्जन शिवों नये ॥ ३ ॥

७६ नव्हे आराणूक संवसारा हातीं । सर्व काळ चित्तीं हाचि धंदा ॥ १ ॥ देवधर्म सांदीं पडले सकळ । विषयीं गोंधळ गाजतसे ॥२॥ रात्रि दीस न पुरे कुटुंबाचें समाधान । दुर्लभ दर्शन ईश्वराचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे आत्महत्यारे घातकी । थोर होते चुकी नारायणीं ॥ ४ ॥

७७ किती सांगों तरी नाइकती बटकीचे । पुढें सिंदळीचे रडतील ॥ १ ॥ नका नका करूं रांडेची संगती । नेवोनी अधोगती घालील यम ॥ २ ॥ तुका ह्मणे जरी देवीं नाहीं चाडे । ह्मणोनि थोबाड फोडी काळ ॥ ३ ॥

---

१ महानुभावांचें. २ विश्रांति. ३ इच्छा.

आघण । तया त्रिभुवन अवघें खोटें ॥ ३ ॥

७५ अतिवादी नव्हे शुद्ध या बीजाचा । ओळखा जातीचा अंत्यज तो ॥ १ ॥ वेद श्रुति नाहीं ग्रंथ ज्या प्रमाण । श्रेष्ठांचें वचन न मानी जो ॥ २ ॥ तुका ह्मणे मद्यपानाचें मिष्टान्न । तैसा तो दुर्जन शिवों नये ॥ ३ ॥

७६ नव्हे आंराणूक[2] संवसारा हातीं । सर्व काळ चित्तीं हाचि धंदा ॥ १ ॥ देवधर्म सांदीं पडले सकळ । विषयीं गोंधळ गाजतसे ॥२॥ रात्रि दीस न पुरे कुटुंबाचें समाधान । दुर्लभ दर्शन ईश्वराचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे आत्महत्यारे घातकी । थोर होते चुकी नारायणीं ॥ ४ ॥

७७ किती सांगों तरी नाइकती बटकीचे । पुढें सिंदळीचे रडतील ॥ १ ॥ नका नका करूं रांडेची संगती । नेवोनी अधोगती घालील यम ॥ २ ॥ तुका ह्मणे जरी देवीं नाहीं चाड[3] । ह्मणोनि थोबाड फोडी काळ ॥ ३ ॥

१ महानुभावांचें. २ विश्रांति. ३ इच्छा.

७८ किती उपदेश करावा खळासी । ना-
वडे तयाची बरें कांहीं ॥ १ ॥ शुद्ध हे वास-
ना नाहीं चांडाळाची । होळी आयुष्याची
केली तेणें ॥ २ ॥ नाहीं शुद्ध भाव नायके व-
चन । आपण्या आपण नाडियेलें ॥ ३ ॥ तु-
का ह्मणे त्यासी काय व्याली रांड । करितो
बडबड रात्रंदिवस ॥ ४ ॥

७९ बुद्धिमंदा शिरीं । मार फजिति पद-
रीं ॥ १ ॥ जाय तेथें अपमान । पावे हानि
थुंकी जन ॥ २ ॥ खरियाचा पाड । मागें ला-
वावें लिगाडें ॥ ३ ॥ तुका ह्मणे करी । वर्म
नेणें भरोवरी ॥ ४ ॥

८० साकरेच्या गोण्या बैलाचिये पाठीं ।
तयासी शेवटीं करबाडें ॥ १ ॥ मालाचे पें पे-
टे वाहाताती उंटें । तयालागीं कांटे भक्षाव-
या ॥ २ ॥ वाउगा हा धंदा आशा वाढविती ।
बांधोनियां देती यमा हातीं ॥ ३ ॥ ज्यासी
असे लाभ तोचि जाणे गोडी । येरें तीं बापु-

१ लचांड. २ इतर, अन्य.

डीं शिणलीं वांया ॥ ४ ॥ तुका ह्मणे शाहणा होईं रे गव्हारा[1] । चौऱ्याशीचा फेरा फिरों नको ॥ ५ ॥

८१ संसार करितो मोठ्या महत्त्वानें । दिसे लोकां उणें न कळे त्या ॥ १ ॥ पवित्रपण आपुलें घरच्यासीच दिसे । बाहेर उदास निंदिताती ॥ २ ॥ आपणा कळेना आपले अवगुण । पुढिलांचे[2] दोषगुण वाखाणिती ॥ ३ ॥ विषयाचे ध्यासें जग बांधियेलें । ह्मणोनी लागले जन्ममृत्यु ॥ ४ ॥ तुका ह्मणे माझें संचितचि असें । देवाजीचें पिसें सहजगुण ५

८२ किती सोसितो करंटीं । नेणों संसाराची आटी[3] । सर्वकाळ पोटीं चिंतेची हळहळ ॥ १ ॥ रिकामिया तोंडें राम । काय उच्चारितां श्रम । उफराटा भ्रम । गोंवी विषय माजिरा ॥२॥ कळतां न कळे । उघडे झाकियेले डोळे । भरले त्याचे चाळे । अंगीं वारें मायेचें ॥३॥ तुका ह्मणे जन । ऐसें नांव बुद्धि-

१ मूर्खा. २ दुसऱ्याचे. ३ श्रम.

हीन । बहुरंगें भिन्न । एकीं एक निमालें ॥४॥

८३ जालों[1] ह्मणती त्याचें मज वाटे आश्चर्य । ऐका नव्हे धीर वचन माझें ॥ १ ॥ शिजलिया अन्ना ग्वाही दांत हात । जिव्हेसी चाखत नकळे कैसें ॥ २ ॥ तापलिया तेलीं बावन चंदन । बुंदें[2] एक क्षण शीतळ करी ॥ ३ ॥ पारखी[3] तो जाणे अंतरींचा भेद । मूढ जना छंद लावण्यांचा ॥ ४ ॥ तुका ह्मणे कसीं निवडे आपण । शुद्ध मंद हीन जैसें तैसें ॥५॥

८४ लोभावरी ठेवूनि हेत । करी असत्य न्याय नीत ॥ १ ॥ त्याच्या पूर्वजां पतन । नरकीं किडे होती जाण ॥२॥ कोटि गोहत्या पातक । त्यासी घडेल निशंक ॥ ३ ॥ मासा स्रवे जे सुंदरा । पाजी विटाळ पितरां ॥४॥ तुका ह्मणे ऐसियासी । यम गांजील सायासीं ॥५॥

८५ ह्मणे विठ्ठल पाषाण । त्याच्या तोंडावरी वाहण ॥ १ ॥ नको नको दर्शन त्याचें । गलितकुष्ठ भरो वाचे ॥ २ ॥ शाळिग्रामासि

१ ब्रह्मरूप झालो. २ बिंदु, थेंब. ३ परीक्षा करणारा.

ह्मणे धोंडा । किडे पडोत त्याच्या तोंडा ॥३॥ ॥ ३ ॥ भावी सद्गुरु मनुष्य । त्याचें खंडो कां आयुष्य ॥ ४ ॥ हरिभक्ताच्या करी चेष्टा। त्याचे तोंडीं पडो विष्टा ॥ ५ ॥ तुका ह्मणे किती ऐकों । कोठवरी मर्यादा राखों ॥ ६ ॥

८६ हरीची कथा नावडे जया । अधम ह्मणतां तया वेळ लागे ॥१॥ मनुष्यदेहीं तया नाट लागलें । अघोर साधिलें कुंभपाक ॥२॥ कासया जन्मा आला तो पाषाण । जंत कां होऊन पडिला नाहीं ॥ ३ ॥ उपजे मरोनि वेळोवेळा भांड । परी न धरी लंडें[1] लाज कांहीं ॥ ४ ॥ ऐसियाची माता कासया प्रसवली । वर नाहीं घातली मुखावरी ॥ ५ ॥ देवधर्माविण चांडाळ हा नर । न साहे भूमि भार क्षणभरी ॥ ६ ॥ राम ह्मणतां तुझें कायरे वेंचलें[2] । कां हित आपुलें न विचारिसी ॥७॥ जन्मोजन्मींचा होईल नरकी । तुका ह्मणे चुकी जरी यासी ॥ ८ ॥

---

१ मूर्ख. २ खर्च झालें.

७ भक्ति ज्याची थोडी । पूर्ण विषयांची
ी ॥ १ ॥ तो नरचि नव्हे पाही । खरे[1] जा-
ा तो देहीं ॥ २ ॥ भजन पूजनही नेणे ।
स्वरूपासी[2] जाणे ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्या-
भोवंडून बाहेर घाला ॥ ४ ॥

८ देव अवघे प्रतिपादी । वंदी सकळां
निंदी ॥ १ ॥ तेथें अवघे गेले वायां ।
घास एके ठायां ॥ २ ॥ सर्वांग कुरवा-
। उपटी एक रोमावळी ॥ ३ ॥ तुका ह्मणे
त । नाहीं जयाचें अंकित ॥ ४ ॥

९ कीविलवाणा जाला आतां । दोष क-
ां न विचारी ॥१॥ अभिलाषी नारी धन ।
वी जन लटिकेंचि ॥ २ ॥ विश्वासिया क-
ां घात । न धरी चित्त कांटाळा ॥ ३ ॥
ा ह्मणे नाहीं आला । वृथा गेला जन्मासी ॥ ४ ॥

२० जेणें मुखें स्तवी । तेंचि निंदेपाठीं ला-
॥ १ ॥ ऐसी अधमाची याती[3] । लोपी सोनें
य माती ॥ २ ॥ गुदद्वारा वाटे । मिष्टान्ना-

१ गाढव. २ आत्म्यासीं. ३ जातां.

चा मरक लोटे ॥ ३ ॥ विंचु लाभाविण । तु-
का ह्मणे वाहे शीण ॥ ४ ॥

९१ आसुरी स्वभाव निर्दय अंतर । मान-
सीं निष्ठुर अतिवादी ॥ १ ॥ याति कुळ येथें
असे अप्रमाण । गुणाचें कारण असे अंगीं॥२॥
काळकुट पितळ सोनें शुद्ध रंग । अंगाचेंच
अंग साक्षी देतें ॥ ३ ॥ तुका ह्मणे बरीं जाती-
सवें भेटी । नवनीत[1] पोटीं सांठविलें ॥ ४ ॥

९२ दुर्बळ हे अवघे जन । नारायणीं वि-
न्मुख ॥ १ ॥ झाडोनिया हात जाती । पात्र
होती दंडासी ॥ २ ॥ शिदोरी तें पापपुण्य ।
सवें शिण भिकेचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे पाडिला
वाहो । कैसा पाहा हो लटिक्याचा ॥ ३ ॥

९३ न संडी[2] अवगुण । वेसें[3] मानीतसे शि-
ण ॥ १ ॥ भोग देतां करिती काई । फुटतां
यमदंडें डोई ॥ २ ॥ पापपुण्य झाडा । देतां
तेथें मोठी पीडा ॥ ३ ॥ तुका ह्मणे बोला ।
माझ्या शिणती विठ्ठला ॥ ४ ॥

---

१ लोणी. २ सोडीत नाहीं ३ उणें काढलें असतां.

९४ द्रव्य असतां धर्म न करी। नागवला राजद्वारीं ॥ १ ॥ माय त्यास व्याली जेव्हां। रांड सठवी नव्हती तेव्हां ॥ २ ॥ कथाकाळीं निद्रा लागे। कामीं श्वानापरी जागे ॥ ३ ॥ भोग स्त्रियेसि देतां लाजे। वस्त्र दासीचें घेउनि निजे ॥ ४ ॥ तुका ह्मणे जाण। नर गाढवाहुनी हीन ॥ ५ ॥

९५ सज्जन तो शब्द सत्य जो मानी। कळी दुर्जन आणिकांसी ॥ १ ॥ एक गुण तीं केलासे दोंठायीं। ज्याचा त्यास पाही जैसा तैसा ॥ २ ॥ भाविक तो शब्द बोले वाणीचा। लटिका वाचा वाचाळ तो ॥ ३ ॥ परउपकार घडे तोचि भला। नाठ्याळ तयाला दया नाहीं ॥ ४ ॥ जाणोवंत तोचि पायरी जाणे। अधम तो नेणे खुंट जैसा ॥ ५ ॥ हित तें अनहित केलें कैसें। तुका ह्मणे पिसें[3] लागलें त्या ॥ ६ ॥

९६ तोंडें खाये फार। पादे बोचा करी

१ निर्दय, निष्ठुर. २ शाहाणा. ३ वेड.

मार ॥ १ ॥ एक ऐसे ते शहाणे । आपुलें अधीन तें नेणें ॥ २ ॥ कुले घालुनि उघडे । रागें पाहे लोकांकडे ॥ ३ ॥ खेळे द्यूतकर्म[1] । मग बोंबली जुलूम ॥ ४ ॥ निजतां आला मोहो । वीतां ह्मणे मेला गोहो[2] ॥ ५ ॥ तुका ह्मणे त्यांनीं । मनुष्यपणा केली हानी ॥ ६ ॥

९७ गोविंदावांचोनि वदे ज्याची वाणी । हगवण घाणी पिटपिट ते ॥ १ ॥ मस्तक सांडूनि सिसफुल[3] गुडघां । चार तो अवघा बावळ्याचा ॥ २ ॥ अंगभूत ह्मणू पूजितो वाहाणा । ह्मणतां शाहाणा येईल कैसा ॥३॥ तुका ह्मणे वेश्या सांगे सुवासिणी । इतर पूजनीं भाव तैसा ॥ ४ ॥

९८ यमपुरी त्यांणीं वसविली जाणा । उच्छेद भजना विधी केला ॥ १ ॥ अवघड कोणी न करी सांगतां । सुलभ बहुतां गोड वाटे ॥ २ ॥ काय ते नेणते होते मागें ऋषी । आधार लोकांसी ग्रंथ केले ॥ ३ ॥ द्रव्य दा-

---

१ सोंगटी. २ नवरा. ३ मस्तकावरचा अलंकार.

रा कोणें स्थापियेलें धन । पिंडाचें पाळण विषय भोग ॥ ४ ॥ तुका ह्मणे दोहीं ठायीं हा फजित । पावे यमदूत जना हातीं ॥ ५ ॥

९९ नेदावी सलगी न करावा संग । करी चित्ता भंग वेळोवेळा ॥ १ ॥ सर्प शांतिरूप न ह्मणावा भला । झोंबे खवळिला तात्काळ तो ॥ २ ॥ तुका ह्मणे दुरी राखावा दुर्जन । करावें वचन न घडे तें ॥ ३ ॥

१०० याचा कोणी करी पक्ष । तोही त्यासी समतुल्य ॥ १ ॥ फुकासाठीं पावे दुःखाचा विभाग । पूर्वजांसि लाग निरयेदंडीं ॥ २ ऐके राजा न करी दंड । जरी या लंड दुष्टासि ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्याचें अन्न । मद्यपानासमान ॥ ४ ॥

१०१ दानें कांपे हात । नावडे तेविशीं मात ॥ १ ॥ कथी चावटीचे बोल । हिंग क्षीरीं मिथ्या फोल ॥ २ ॥ न वजती पाय । तीर्था ह्मणे वेंचूं काय ॥३॥ तुका ह्मणे मनीं नाहीं । न ये आकारातें कांहीं ॥ ४ ॥

१ देऊं नये. २ नरक. ३ खिरींत. ४ जाती.

१०२ चाहाडाची[1] माता । व्यभिचारीण तक्वता ॥ १ ॥ पाहे संताचें उणें । छिद्र छळावया सुनें ॥ २ ॥ जाणों त्याच्या बाचें[2] । कांहीं सोडिलें गांठीचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे घात । व्हावा ऐसी जोडी मात ॥ ४ ॥

१०३ तीर्थे जळ देखे पाषाण प्रतिमा । संत ते अधमा माणसां ऐसे ॥ १ ॥ वांजेच्या मैथुनापरी गेले वांया । बांडेल्याचें जाया जालें पीक ॥ २ ॥ अभाविक सदा सुतकी चांडाळ । सदा तळमळ चुकेचिना ॥ ३ ॥ तुका ह्मणे वरदळीं ज्याची दृष्टी । देहबुद्धि कष्टी सदा दुःखी ॥ ४ ॥

१०४ संतनिंदा ज्याचे घरीं । नव्हे घर तें यमपुरी ॥ १ ॥ त्याच्या पापा नाहीं जोडा । संगें जना होय पीडा ॥ २ ॥ संतनिंदा आवडे ज्यासी । तो जिताची नर्कवासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे नष्ट । जाणा गाढव तो स्पष्ट ॥४॥

१०५ संतां नाहीं मान । देव मानी मुसल-

---

१ चाहडी करणाराची. २ बापाचें.

मान ॥ १ ॥ ऐसे पोटाचे मारिले । देवा आ-
शा विटंबिले ॥ २ ॥ घाली लोटांगण । वंदी
नीचाचे चरण ॥ ३ ॥ तुका ह्मणे धर्म । न
कळे माजल्याचा भ्रम ॥ ४ ॥

१०६ विद्या अल्प परी गर्व शिरोमणी ।
मजहुनी ज्ञानी कोण आहे ॥१॥ अंगीं भरला
ताठा कोणाचें मानीना । साधूची छळणा
स्वयें करी ॥ २ ॥ साधूचे देहाचा मानी जो
विटाळ । त्रिलोकीं चांडाळ तोचि एक ॥३॥
संतांची जो निंदा करितो या मुखें । खतेला[1]
सकळ पापें तोचि एक ॥४॥ तुका ह्मणे ऐसे
मावेचे मइंद । त्यापाशीं गोविंद नाहीं नाहीं५

१०७ तुळसीवृंदावनीं उपजला कांदा ।
नावडे गोविंदा कांहीं केल्या ॥ १ ॥ तैसे वं-
शामध्यें जाले जे मानव । जाणावे दानव[2] अ-
भक्त ते ॥२॥ केवड्यामधील निगंध कणसें ।
तैशीं तीं माणसें भक्तिहीन ॥ ३ ॥ तुका ह्मणे
जेवीं चंदनांतील आळी । न चढे निढळीं[3] दे-
वाचिया ॥ ४ ॥

---

१ भरलेला. २ राक्षस. ३ मस्तकीं.

१०८ माकडें मुठीं धरिले फुटाणे । गुंतले तें नेणे हात तेथें ॥ १ ॥ काय तो तयाचा देखावा अन्याय । हित नेणे काय आपुलें तें ॥ ॥ २ ॥ शुकें नळिकेशीं गोवियेलें पाय । विसरोनि जाय पक्ष दोन्ही ॥३॥ तुका ह्मणे एक ऐसे पशु जीव । न चले उपाव कांहीं तेथें ॥४॥

१०९ सोनियाचें ताट क्षीरीनें भरिलें । भक्षावया दिलें श्वानालागीं ॥ १ ॥ मुक्ताफळहार खरासि घातला । कस्तुरी सूकराला चोजविली ॥ २ ॥ वेदपरायण बधिरा सांगे ज्ञान । तयाची ते खूण काय जाणे ॥ ३ ॥ तुका ह्मणे ज्याचें तोचि एक जाणे । भक्तीचें महिमान साधु जाणे ॥ ४ ॥

११० शिकवणें नाक झाडी । पुढील जोडी कळेना ॥ १ ॥ निरयगांवीं भोग देता । तेथें सत्ता आणिकांची ॥ २ ॥ अवगुणांचा सांठा करीं । तेचि धरी जीवासीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे जडबुद्धि । कर्मशुद्धी सांडवी ॥ ४ ॥

---

१ राघूनें. २ गुंतविलें. ३ खिरीनें. ४ मोत्याचा.

१११ फळ्याचे बडबडे चवी ना संवाद। आपुलाचि वाद आपणासी ॥ १ ॥ कोणें या शब्दाचे मरावें घसणीं। अंतरें शाहाणीं राहिजे हो ॥ २ ॥ गाढवाचा भुंक आइकतां कानीं। काय कोडावाणी पेसियेचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे ज्यासी करावें वचन। त्याचे येती गुण आंगास ते ॥ ४ ॥

११२ विष्ठा भक्षी तया अमृत पारिखें। वोंगळचि सखें वोंगळाचे ॥ १ ॥ नये पाहों कांहीं गोऱ्हावाडीचा अंत। ह्मणी ठाका संत दुर्जनापें ॥ २ ॥ भैंसळीच्या बीजा अमंगळ गुण। उपजवी शीण दरुषणें ॥ ३ ॥ तुका ह्मणे छी थूं जया घरीं धन। तेथें तें कारण कासयाचें ॥ ४ ॥

११३ दुर्जनाची जाती। त्याचे तोंडीं पडे माती ॥ १ ॥ त्याची बुद्धि त्यासी नाडी। वाचें अनुचित बडबडी ॥ २ ॥ पाहे संतांकडे। दोषदृष्टी पाहे भिडे ॥ ३ ॥ उंच निंच नाहीं। तुका ह्मणे खळा कांहीं ॥ ४ ॥

---

१ कौतुक. २ गुखाडीचा. ३ नाशकरी.

११४ नागलें[1] देखोनि चांगलें बोले । आपुलें वेंचूनि त्याजपुढें[3] खुले ॥ १ ॥ अधमाचे ओंगळ गुण । उचितें[2] नेणे तो धर्म कोण ॥२॥ आर्तभूता न घाली पाण्याची चूळ । न मागे त्यासी घाली साखरगूळ ॥ ३ ॥ एकासी आड पडोनी होंकरी । एकासी देखोनि लपवी भाकरी ॥ ४ ॥ एकासी धड न बोले वाचा । एकासी ह्मणे मी तुझे बांदीचा[4] ॥ ५ ॥ तुका ह्मणे गाढवपशु । लाभेंविण केला आयुष्यनाशु ॥ ६ ॥

११५ गाढव शृंगारिलें कोडें । कांहीं केल्या नव्हे घोडें ॥ १ ॥ त्याचें भुंकणें न राहे स्वभावासी करील काय ॥ २ ॥ श्वाना शिबिके बैसविलें । भुंकतां न राहे उगलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे स्वभावकर्म । कांहीं केल्या न सुटे धर्म ॥ ४ ॥

११६ पापी तो नाठवी आपुल्या संचिता । ठेवी भगवंता वरी बोल ॥ १ ॥ भेईना करि-

---

१ नागवा. २ योग्य. ३ पुढें. ४ ताब्यांतील गुलाम.

तां पापाचे डोंगर। दुर्जन पामर दुराचारी२
नाठवी तो खळ आपुली करणी। देवासी
निंदोनि बोलतसे ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्याच्या
तोंडा लागो कांटी। नाहीं जगजेठी जया
चित्तीं ॥ ४ ॥

११७ कथा पुराण ऐकतां। झोंपें नाडिलें
तत्त्वता। खाटेवरी पडतां। व्यापी चिंता त-
ळमळ ॥ १ ॥ ऐसी गहन कर्मगति। काय
तयासी रडती। जाले जाणते जो चित्तीं।
कांहीं नेघे आपुला ॥ २ ॥ उदक लावितां न
धरे। चिंता करी केव्हां सरे। जाऊं नका
धीरें। ह्मणे करितां टवाळ्या ॥ ३ ॥ जवळी
गोचिड क्षीरा। जैसी कमळणी दर्दुरां। तु-
का ह्मणे दुरा। देशत्यागें तयासी ॥ ४ ॥

११८ बीजापोटीं पाहे फळ। विघ्न न क-
रितां सकळ ॥ १ ॥ तया मूर्ख ह्मणावें वेडें।
कैसें तुटेल सांकडें ॥ २ ॥ दावितिया वाट।
वेठीं धरूं पाहे चाट ॥ ३ ॥ पुढिल्या उपाया।
तुका ह्मणे राखे काया ॥ ४ ॥

---

१ अडचण केली. २ बेडुकाला. ३ संकट.

११९ अभक्ताचे गांवीं साधु ह्मणजे काय। व्याघ्रवाडां गाय सांपडली ॥ १ ॥ कसाबाचे आळी मांडिलें प्रमाण। बस्वंर्णाची आण त-या काई ॥ २ ॥ केळी आणि बोरी वसती से-जारीं। संवाद कोणे परी घडे तेथें ॥ ३ ॥ तुका ह्मणे खीर केली कान्हेळ्याची। शुद्ध गोडी कैची वसे तेथें ॥ ४ ॥

१२० नाहीं देवाचा विश्वास। करी संतां-च्या उपहांस ॥ १ ॥ त्याचे तोंडीं पडे माती। हीन सूकरांची जाती ॥ २ ॥ घोकुनी अक्षरें। वाद छळणा करीत फिरे ॥ ३ ॥ ह्मणे देवा-सी पाषाण। तुका ह्मणे भावहीन ॥ ४ ॥

१२१ दुबळें सदैवा। ह्मणे नागवेल केव्हां ॥ १ ॥ आपणा ऐसें करूं पाहे। स्वभावासी करिल काये ॥ २ ॥ मूढ सभे आंत। इच्छी पंडिताचा घात ॥ ३ ॥ गांढें देखुनि शूरा। उगी करिती बुरबुरा ॥ ४ ॥ आणिकांचा हे-वा। न करी शरण जाई देवा ॥ ५ ॥ तुका

---

१ बैलाची. २ थटा. ३ डुकराची

ह्मणे किती । करूं दुष्टाची फजिती ॥ ६ ॥

१२२ निंबाचिया[1] झाडा साकरेचें आळें । आपुलीं तीं फळें न संडीच ॥ १ ॥ तैसें अधमाचें अमंगळ चित्त । वमन तें हित करूनि सांडी ॥ २ ॥ परिसाचे अंगीं लाविलें खापर । पालट अंतर नेघे त्याचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे वेळू चंदनासंगतीं । काय ते नसती जवळिके ॥ ४ ॥

१२३ सिंदळीचे सोइरे चोराचीया द्या । तोही जाणा तया संवसर्गीं[2] ॥ १ ॥ फुकासाठीं भोगे दुःखाचा तो वांटा । उभारोनि कांटा वाटेवरी ॥ २ ॥ सर्प पोसोनियां दुधाचाही नास । केलें थीतां[3] विष अमृताचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे यासी न करितां दंडण । पुढिल्या खंडण नव्हे दोघा ॥ ४ ॥

१२४ काय वृंदावन मोहियेलें गुळें । काय जिरें काळें उपचारिलें ॥ १ ॥ तैसी अधमाची जातीच अधम । उपदेश श्रम करावा

---

१ कडुनिंब. २ संबंधी. ३ उगीच, व्यर्थ.

तो ॥२॥ न कळे विंचवासी कुरवाळिलें अंग। आपुले ते रंग दावीतसे ॥ ३ ॥ तुका म्हणे नये पाकासी दगड । सूकरासी[1] गोड जैसी विष्ठा ॥ ४ ॥

१२५ सुगरणीबाई थिता नास केला। गूळ तो घातला भाजीमध्यें ॥ १ ॥ क्षीरीमध्यें[2] हिंग दुधामध्यें बोळ। थितेंचि वोंगळ कैसें केलें ॥ २ ॥ जळण दळोनी भरूं गेली पाळी। भरडोनि वोंगळी नास केला ॥ ३ ॥ कापुराचे सातें आणिला लसूण। वागवितां शीण दुःख होय ॥ ४ ॥ रत्नाचा जोहारी[3] रत्नचि पारखी। येर देखोदेखीं हातीं घेती ॥ ५ ॥ तुका ह्मणे जरी योग घडे निका। न घडतां थुंका तोंडावरी ॥ ६ ॥

१२६ कावळ्याच्या गळां मुक्ताफळमाळा। तरी काय त्याला भूषण शोभे ॥ १ ॥ गजालागीं केला कस्तुरीचा लेप। तिचें तो स्वरूप काय जाणे ॥ २ ॥ बकापुढें सांगे भावा-

---

१ डुकराला. २ खिरीमध्यें. ३ पारखी.

र्थवचन । वाउगाचि शीण होय त्यासी ॥३॥ तुका ह्मणे तैसे अभाविक जन । त्यांसी वाया शीण करूं नये ॥ ४ ॥

१२७ दर्पणासी[1] नखटें लाजे । शुद्ध खिजे देखोनि ॥ १ ॥ ऐसें अवगुणांच्या बाधें । दिसे सुधें विपरीत ॥ २ ॥ अंधळ्यासी काय हिरा । गारांचि तो सारिखा ॥ ३ ॥ तुका ह्मणे भुंके सुणें[2] । ठाया नेणे ठाव तो ॥ ४ ॥

१२८ संसाराचे धांवे वेंठी । आवडी पोटीं केवढी ॥ १ ॥ हागों जातां दगड सांची । अंतरींही संकल्प ॥ २ ॥ लाज तेवढी नारायणीं । वांकडी वाणी पोरांपें ॥ ३ ॥ तुका ह्मणे बेशरमा । अमावरी पडिभरू ॥ ४ ॥

१२९ कैसा सिंदळीचा । नव्हे ऐसी ज्याची वाचा ॥ १ ॥ वाचें नुच्चारी गोविंदा । सदा करी परनिंदा[3] ॥ २ ॥ लाज कैसा निरयगांवा । जाऊं न पवे विसावा ॥ ३ ॥ तुका ह्मणे दंड । कैसा न पवे तो लंड ॥ ४ ॥

---

१ आरशाला. २ कुत्रें. ३ दुसऱ्याची निंदा.

१३० जन्मांतरींचा परिट व्हावी । जात ठावी त्यानें ते ॥ १ ॥ वाखर जैसा चरचरी । तोंड करी संवदणी ॥ २ ॥ पूर्वजन्म शिखा-सूत्र । मळ मूत्र अंतरीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे क-रिती निंदा । धुवटधंदा पुढिलांचा ॥ ४ ॥

१३१ ऐसें ठावें नाहीं मूढा । सोस काकु-लती पुढां ॥ १ ॥ माझी नका जाळूं भांडीं । पोटीं भय सोस तोंडीं ॥ २ ॥ पातलिया का-ळ । तेव्हां काय चाले बळ ॥ ३ ॥ संचित तें करी । नरका जाया मेल्यावरी ॥ ४ ॥ परउ-पकार । न घडावा हा विचार ॥ ५ ॥ तुका ह्मणे लेंसी । आतां भेटों नये ऐसी ॥ ६ ॥

१३२ लाडाच्या उत्तरीं वाढविती कल्हे । हा तो अमंगळ जातिगुण ॥ १ ॥ तमाचे श-रीरीं विटाळचि वसे । विचाराचा नसे लेश तोही ॥ २ ॥ कवतुकें घ्यावे लेंकराचे बोल । साहिलिया मोल ऐसें नाहीं ॥ ३ ॥ तुका ह्म-णे काय उपदेश खळा । न्हाउनि काउळा श्व-तें धुंडी ॥ ४ ॥

१ शेंडी जानवें. २ पिशाच, हाडळ.

१३३ कुतऱ्याऐसें ज्याचें जिणें । संग कोणें न करीजे ॥ १ ॥ जाय तिकडे हाडहाडी । गोऱ्हावाडीच[1] सोइरीं ॥ २ ॥ अवगुणांचा त्याग नाहीं । खवळे पाही उपदेशें ॥ ३ ॥ तुका ह्मणे कैची लवी । ठेंग्या केवीं अंकुर ॥ ४ ॥

१३४ वेद शास्त्र नाहीं पुराण प्रमाण । तयाचें वदन नावलोका ॥ १ ॥ तार्कियाचें अंग आपणा पारिखें । माजिऱ्यासारिखें[2] वाईचाळ ॥ २ ॥ माता निंदी तया कोण तो आधार । भंगलें खापर याचे नांवें ॥ ३ ॥ तुका ह्मणे आडरानें ज्याचे चाली । तयाची ते बोली मिठेंविण ॥ ४ ॥

१३५ दुर्जनाचे जोडी । सज्जनाचें खेटर तोडी ॥ १ ॥ पाहे निमित्य तें उणें । धांवे छळावया सुनें[3] ॥ २ ॥ न ह्मणे रामराम । मनें वाचें हेंचि काम ॥ ३ ॥ तुका ह्मणे भागा । आली निंदा करी मागा ॥ ४ ॥

१३६ दुर्जनासि करी साहे । तोही लाहे

१ गुखाडी. २ मद्यपी. ३ कुत्रें.

दंड हा ॥ १ ॥ सिंदळीच्या शु
संग खोटा खोट्याचा ॥ २ ॥ ये
णी भेटे । आगी उठे तेथूनी ॥
णे कापूं नाकें । पुढें आणिके शि

१३७ दुर्जनाचें अंग अवघेंचि
कांचा कोथळ सांठवण ॥ १ ॥
ळ बोले अमंगळ । उठवी कपाट
सर्पा मंत्र चाले धरावया हातीं
जाती निखळचि ॥ ३ ॥ तुका
साहे उपमा । आणीक अधमा वे

१३८ दुर्जनाचा मान । सुखें
डन ॥ १ ॥ लाता हाणोनियां
वाट शुद्ध करी ॥ २ ॥ बहुतां
त्याचा धरावा विटाळ ॥ ३ ॥ तु
खें । काढूनि टाकिजेती सुखें ॥

१३९ सापें ज्यासी खावें । ते
मुकावें ॥ १ ॥ काय लाधला दुर्
वरी थुंकी जन ॥ २ ॥ विंचू हा

---

१ घर्षण. २ दगड. ३ दुष्ट.

अन्न लावी आणिकां अंगीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे जाती । नरक पाउलीं चालती ॥ ४ ॥

१४० काय ढोरापुढें घालूनि मिष्टान्न । खरा विलेपन चंदनाचें ॥१॥ नको नको देवा खळाची संगति । रस ज्या पंगती नाहीं कथे ॥२॥ काय सेज बाज माकडा विलास । अळंकारा नास करूनी टाकी ॥ ३ ॥ तुका ह्मणे काय पाजूनि नवनीत । सर्पा विष थीत अमृताचें ॥ ४ ॥

१४१ दुर्जनाची गंधी विष्ठेचिया परी । देखोनियां दुरी व्हावें तया ॥ १ ॥ आइका हो तुह्मी मात हे सज्जन । करूं संघट्टन नये बोलों ॥ २ ॥ दुर्जनाचे अंगीं अखंड विटाळ । वाणी रजस्वला स्रवे तैशी ॥ ३ ॥ दुर्जनाचें भय धरावें त्यापरी । पिसाळलेवरी धांवे श्वान ॥ ४ ॥ दुर्जनाचा भला नव्हे अंगसंग । बोलिलासे त्याग देशाचा त्या ॥ ५ ॥ तुका ह्मणे किती सांगावें पृथक । अंग कुंभपाक दुर्जनाचे ॥ ६ ॥

---

१ गाढव. २ विटाळशी. ३ नरक.

१४२ धिग तो दुर्जन नाहीं भूतदया। व्यर्थ तया माया प्रसवली ॥ १ ॥ कठिण हृदय तया चांडाळाचें । जो नेणे पराचें[1] दुःख कांहीं ॥ २ ॥ आपुला हा प्राण तैसे सकळ लोक। न करी विवेक पशु जैसा ॥३॥ तुका ह्मणे सुखें कापीतसे गळे । आपुलिया वेळा रडतसे ४

१४३ नये पाहों मुख मात्रागमन्याचें । तैसें अभक्ताचें गुरुपुत्रा ॥ १ ॥ ह्मणऊनि बरें धरितां एकांत । तेणें नव्हे घात भजनासी ॥२॥ तुका ह्मणे नका बोलों त्यासी गोष्टी । जयाचिया दृष्टी पाप वाढे ॥ ४ ॥

१४४ न विचारितां ठायाठाव । काय भुंके तो गाढव ॥ १ ॥ केला तैसा लोहे[2] दंड । खळ अविचारी लंड ॥ २ ॥ करावें लाताळें । ऐसें नेणे कोण्या काळें ॥ ३ ॥ न कळे उचित[3] । तुका ह्मणे नीत हित ॥ ४ ॥

१४५ एक ते गाढव मनुष्याचे वेष। हालविती पुंस पुढें दाढी ॥ १ ॥ निंदा हें भोजन

१ दुसऱ्याचें. २ प्राप्त होतो. ३ योग्य.

जेवण तयांसी । जोडी घरीं राशी पातकांच्या ॥ २ ॥ तुका ह्मणे सुखें बैसोनिया खाती । कुंभपाकीं होती नर्कवासी ॥ ३ ॥

१४६ गाढवाचें तानें[1] । पालटतें क्षणक्षणें ॥ १ ॥ तैसे अधमाचे गुण । एकविध नाहीं मन ॥ २ ॥ उपजतां बरें दिसे । रूप वाढतां तें नासे ॥ ३ ॥ तुका ह्मणे भुंकते वेळे। वेळ अवेळ न कळे ॥ ४ ॥

१४७ रासभ[2] धुतला महा तीर्थामाजीं । नव्हे जैसा तेजी शामकर्ण[3] ॥ १ ॥ तेवीं खळा केला काय उपदेश । नव्हेचि मानस शुद्ध त्याचें ॥ २ ॥ सर्पासी पाजिलें शर्करापीयूष । अंतरींचें विष जाऊं नेणे ॥ ३ ॥ तुका ह्मणे श्वाना क्षीरीचें भोजन । सवेंचि वमन जेवीं तया ॥ ४ ॥

१४८ गाढवाचे अंगीं चंदनाची उटी । राखेसवें भेटी केली तेणें ॥ १ ॥ सहजें[4] गुण जयाचिये देहीं । पालट ते कांहीं नव्हे तया ॥

---

१ पोर. २ गाढव. ३ घोडा. ४ स्वाभाविक.

॥ २ ॥ माकडाचे गळा मोलाचा तो मणि । घातला चावूनि थुंकोनी टाकी ॥ ३ ॥ तुका ह्मणे खळा नावडे हित । अविद्या वाढवी आपुले मतें ॥ ४ ॥

१४९ भुंकतींतीं द्यावीं भुंको । आपण त्यांचें नये शिकों ॥१॥ भाविकांनीं दुर्जनाचें । मानूं नये कांहीं साचें ॥ २ ॥ होईल तैसें बळ । फजीत करावे ते खळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्यांचें । पाप नाहीं ताडणाचें ॥ ४ ॥

१५० दिवट्या[1] वाद्यें लावूनि खाणें । करुनि मंडण दिली हातीं ॥ १ ॥ नवरा नेई नवरी घरा । पूजन वरा पाद्याचें ॥ २ ॥ गौरविली विहीण व्याही । घडिलें कांहीं ठेवूं नका ॥ ३ ॥ करूं द्यावें न्हावें बरें । ठायींचें कांरे न कळेचि ॥ ४ ॥ वऱ्हाडियांचे लागे पाठीं । जैसी उठी कांतेली[2] ॥ ५ ॥ तुका ह्मणे जोडिला थुंका । पुढें नरका सामुग्री ॥ ६ ॥

१५१ दोराच्या आधारें पर्वत चढला ।

---

१ मशाली. २ रागावलेली.

पाउलासाठीं केला अपघात ॥ १ ॥ अष्टोत्तर[1]-
शें व्याधि ज्या वैद्यें दवडुनी । तो वैद्य मारू-
नि उत्तीर्ण जाला ॥ २ ॥ नव मास माया वा-
इले उदरीं । ते माता चौबारीं नग्न केली ॥३॥
गायत्रीचें क्षीर पिळुनी घेउनी । उपवासी
बांधोनी ताडन करी ॥ ४ ॥ तुका ह्मणे दा-
सां निंदी त्याचें तोंड । पाहातां नरककुंड
पूर्वजांसी ॥ ५ ॥

१५२ रोगिया मिष्टान्न मर्कटा चंदन । का-
गासी लेपन कर्पूराचें ॥ १ ॥ निर्नासिका[2] जै-
सा नावडे आरिसा । मूर्खालागीं तैसा शा-
स्त्रबोध ॥ २ ॥ दास तुका ह्मणे विठ्ठलें उदा-
रें । अज्ञानअंधारें दूरी केलें ॥ ३ ॥

१५३ जातीचा ब्राह्मण । न करितां संध्या-
स्नान ॥ १ ॥ तो एक नांवाचा ब्राह्मण । होय
हीनाहूनि हीन ॥२॥ सांडूनियां शाळिग्राम ।
नित्य वेश्येचा समागम ॥ ३ ॥ नेघे संताचें
जो तीर्थ । अखंड वेश्येचा जो आर्त[3] ॥ ४ ॥

१ एकशें आठ. २ नाक नसलेला. ३ इच्छा करणारा.

तुका ह्मणे ऐसे पापी । पाहूं नका पुनरपि ५

१५४ अभक्त ब्राह्मण जळो त्याचें तोंड। काय त्यासी रांड प्रसवली ॥ १ ॥ वैष्णव चांभार धन्य त्याची माता। शुद्ध उभयतां कुळयाती ॥ २ ॥ ऐसा हा निवाडा जालासे पुराणीं । नोहे माझी वाणी पदरींची ॥ ३ ॥ तुका ह्मणे आगी लागो थोरपणा । दृष्टि त्या दुर्जना न पडो माझी ॥ ४ ॥

१५५ जेवीं नवज्वरें तापलें शरीर । लागे तया क्षीर विषातुल्य ॥ १ ॥ तेवीं परमार्थ जींहीं दुराविला । तयालागीं जाला सन्निपात ॥ २ ॥ कामिनी जयाच्या जाहाली नेत्रासी । देखे तो चंद्रासी पीतवर्ण[1] ॥३॥ तुका ह्मणे मद्यपानाची आवडी । न रुचे त्या गोडी नवनीताची ॥ ४ ॥

१५६ स्मशान ते भूमि प्रेतरूप जन । सेवाभक्तिहीन ग्रामवासी[2] ॥ १ ॥ भरतील पोट श्वानाचिया परी । वस्ति दिली घरीं यमदू-

---

१ पिंवळा. २ गांवांत राहणारे.

तां ॥ २ ॥ अपूज्य लिंग तेथें अतीत नेघे था-
रा । ऐसी वस्ती चोरां कंटकाची ॥३॥ तुका
ह्मणे नाहीं ठावी तिथी[1] मित्ती । यमाची नि-
श्चिती कुळवाडी ॥ ४ ॥

१५७ श्वान शीघ्रकोपी । आपणा घातकर
पापी ॥ १ ॥ नाहीं भीड आणि धीर । उपदे-
श न जिरे क्षीर ॥ २ ॥ माणसांसि भुंके । वि-
जातीनें द्यावे थुंके ॥ ३ ॥ तुका ह्मणे चित्त ।
मळिण करा ते फजित ॥ ४ ॥

१५८ वृंदावना केलें साकरेचें आळें । न
संडे वेगळें कडूपण ॥ १ ॥ कावळ्याचें पिलूं
कौतुकें पोशिलें । न राहे उगलें विष्ठेविण २
क्षेम देतां अंगा गांधेलाची पोळी । करवी
नादाळी महाशब्द ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसे न
होती ते भले । घालिती ते घाले साधुजना ४

१५९ मणि पडिला दाढेसी मकरें[2]तोंडीं ।
सुखें हस्तेंचि काढवेल प्रौढी ॥ १ ॥ परी मू-
र्खाचें चित्त बोधवेना । दुधें कूर्मीच्या पाळ-

१ तिथी, वार, नक्षत्र इत्यादि. २ सुसर.

वेल सेना ॥ २ ॥ सकळ पृथ्वी हिंडतां कदाचित । शशशृंगाची प्राप्त होय तेथें ॥ ३ ॥ अतिप्रयत्नें गाळितां वाळुवेतें । दिव्य तेलाची प्राप्त होय तेथें ॥ ४ ॥ अतिक्रोधें खवळला फेणी पाही । धरूं येतो मस्तकीं पुष्पपार्थी ॥ ५ ॥ पहा ब्रह्मानंदेंचि एकी हेळा । महापातकी तो तुका मुक्त केला ॥ ६ ॥

१६० दावूनियां मांड । पुरे न करिती भांड ॥ १ ॥ जळो जळो तैसें जिणें । फटमर लाजिरवाणें ॥ २ ॥ घेतलें तैसें सोंग । बरवें संपादावें सांग ॥ ३ ॥ तुका ह्मणे धीरें । देव नुपेक्षील खरें ॥ ४ ॥

१६१ गुरुपादाग्रीचें जळ । त्यास मानी जो विटाळ ॥ १ ॥ संतीं चाळिला जो खळ । नरकीं पचे चिरकाळ ॥ २ ॥ गुरुतीर्थी अवमान । यथासांग मद्यपान ॥ ३ ॥ गुरुअंगुष्ठा न चोखी । मुख घाली वेश्येमुखीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे सांगों किती । मुखीं पडो त्याचे माती५

१ सशाचें शिंग. २ सर्प.

१६२जेवितांही धरी। नाक हागतिया परी १ ऐसियाचा करी चाळा। आपुलीच अवकळा ॥ २ ॥ सांडावें मांडावें। काय ऐसें नाहीं ठावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे करी। ताकादुधा एकसरी ॥ ४ ॥

१६३ शिंदळा साल्याचा नाहीं हा विश्वास। बाईल तो त्यास न विसंबे ॥ १ ॥ दुष्ट बुद्धि चोरी करी निरंतर। तो ह्मणे इतर लोक तैसे ॥ २ ॥ तुका ह्मणे जया चित्तीं जे वासना। तयाची भावना तयापरी ॥ ३ ॥

१६४ चुंबळीचा करी चुंबळीशीं संग। अंगीं वसे रंग क्रियाहीन ॥ १ ॥ बीजा ऐसें फळ दावी परिपाकीं। परिमळ[1] लौकिकीं जाती ऐसा ॥ २ ॥ माकडाच्या गळां रत्न कुळांगना। सांडूनियां सुनों[2] बिदी धुंडी ॥३॥ तुका ह्मणे ऐसा व्याली ते गाढवी। फजिती ती व्हावी आहे पुढें ॥ ४ ॥

१६५ आधींच आळशी। वरी गुरूचा उ-

---

१ सुवास. २ कुत्रा.

पदेशी ॥ १ ॥ मग त्या कैंची आडकाठी[1] । विधिनिषेधाची भेटी ॥ २ ॥ नाचरवे धर्म । न करवे विधिकर्म ॥ ३ ॥ तुका ह्मणे ते गाढव। घेती मनासवें धांव[2] ॥ ४ ॥

१६६ नेणे सुनें चोर पाहुणा मागता । देखून भलता भुंकतसे ॥ १ ॥ शिकविलें कांहीं न चले तें तया । बोलियेले वायां बोल जाती ॥ २ ॥ क्षीर वोकूनियां खाय अमंगळ । आपुली ते ढाळ जाऊं नेदी ॥ ३ ॥ वंदूं निंदूं संता काय दुराचार । खळाचा विचार तुका ह्मणे ॥ ४ ॥

१६७ शादीचें तें सोंग । संपादितां राजा व्यंग ॥ १ ॥ पहा कैसी विटंबना । मूर्खा अभाग्याची जना ॥ २ ॥ दिसतें तें लोपी । झिंज्या वोढूनियां पापी ॥३॥ सिंदळी त्या सती। तुका ह्मणे थुंका घेती ॥ ४ ॥

१६८ गयाळाचें काम हिताचा आवारा । लाज फजितखोरा असत नाहीं ॥ १ ॥ चित्ता

१ आडचण. २ वर्तन, स्वभाव.

न मिळे तें डोळां सलों येतें । असावें परतें जवळूनि ॥ २ ॥ न करावा संग न बोलावी मात । सावधान[1] चित्त नाहीं त्यासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे दुःख देतील माकडें । घालिती सांकडें उफराटें ॥ ४ ॥

१६९ मदें मातलें नागवें नाचे । अनुचित[2] वाचें बडबडी ॥ १ ॥ आतां शिकवावा कोणासी विचार । कर्म तें दुस्तर करवी वीट ॥२॥ आलें अंगासी तें बळिवंत गाढें । काय वेड्यापुढें धर्मनीत ॥ ३ ॥ तुका ह्मणे कळों येईल तो भाव । अंगावरी घाव उमटतां ॥४॥

१७० कर्कशे संगति । दुःख उदंड फजिती ॥ १ ॥ नाहीं इह ना परलोक । मजुर दिसे जैसें रंक ॥ २ ॥ वचन सेंटावर । त्याचें ठेवूनि धिक्कार ॥ ३ ॥ तुका ह्मणे पायीं बेडी । पडिली कपाळीं कुऱ्हाडी ॥ ४ ॥

१७१ कामातुरा[3] भय लाज ना विचार । शरीर असार तृणतुल्य ॥ १ ॥ नवल हे ली-

१ स्थिर. २ अयोग्य. ३ अत्यंत विषयीं.

ळा करी त्याचें लाघव । प्रारब्धें भाव दाखविले ॥२॥ लोभालोभ एका धनाचिया ठायीं । आणिकांची सोई चाड नाहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे भूक न विचारी प्रकार । योजे तें तें सार यथाकाळीं ॥ ४ ॥

१७२ दिहा[1] लावी वातं[2] । पालव[3] घाली जाली रात ॥ १ ॥ वेडी ते वेडी बहुतच वेडी । चाखतां गोडी चवी नेणे ॥ २ ॥ कडियें मूल भौंवतें भौंये । मोकलुनि रडे धाये ॥ ३ ॥ लेंकरें वित्त पुसे जगा । माझा गोहो कोण तो सांगा ॥ ४ ॥ आपुली शुद्धि जया नाहीं । आणिकांची ते जाणे काई ॥ ५ ॥ तुका ह्मणे ऐसे जन । नर्का जातां राखे कोण ॥ ६ ॥

१७३ मांडवाच्या दारा । पुढें आणिला ह्मातारा ॥ १ ॥ ह्मणे नवरी आणा रांड । जाळा नवऱ्याचें तोंड ॥ २ ॥ समय न कळे । काय उपयोगीं ये वेळे ॥३॥ तुका ह्मणे खरीं[4] । येथूनिया दूर करा ॥ ४ ॥

---

१ दिवसा. २ दिवा. ३ पदर. ४ गाढवाला,

१७४ मातेची जो थानें फाडी । तया जोडी कोण ते ॥ १ ॥ वेदां निंदी तो चांडाळ । भ्रष्ट सुतकीया खळ ॥२॥ अगी लावी घरा । मग वसती कोठें थारा ॥ ३ ॥ तुका जाणे वर्म । येरा नाचवितो भ्रम ॥ ४ ॥

१७५ अति जालें उत्तम वेश्येचें लावण्य । परी ते सवासीण न ह्मणावी ॥ १ ॥ उचित अनुचित केले ठाया ठाव । गुणां मोल वाव थोरपणा ॥ २ ॥ शूरत्वावांचूनि शूरांमाजीं ठाव । नाहीं आविर्भाव आणिलिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे सोंग पोटाचे उपाय । कारण कमाईविण[1] नाहीं ॥ ४ ॥

१७६ सावित्रीचें विटंबण । रांडपण करीतसे ॥१॥ काय जाळावें तें नांव । अवघे वाव असे तें ॥ २ ॥ कुबेर नांव मोळी वाहे । कैसी पाहें फजिती ॥ ३ ॥ तुका ह्मणे ठुणगुण देखे । उगी मूर्ख फुंदतां ॥ ४ ॥

१७७ आचरे दोष न धरी धाकें[2] । परिपा-

१ कमावणें, मिळवणें. २ भीति.

क दुःखाचा ॥ १ ॥ चांडाळ तो दुराचारी। अंगीकारी कोण त्या ॥२॥ नव्हे संतान वोस घर। अंधकार कुळासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्याचें दान। घेतां पतन दुःखासी ॥ ४ ॥

१७८ सदा तळमळ। चित्ताचिये हळहळ ॥ १ ॥ त्याचें दर्शन न व्हावें। शव[1] असतां तो जिवें ॥ २ ॥ कुशब्दाची घाणी। अमंगळविली वाणी ॥ ३ ॥ नेणे शब्द पर। तुका ह्मणे परउपकार ॥ ४ ॥

१७९ अंगीं भरला ताठा। नये वळणीं जैसा खुंटा॥ १ ॥ कैसें न कळे त्या डेंगा[2]। हित आदळलें अंगा ॥ २ ॥ जीव जाते वेळे। मरे लकडा ताठी डोळे ॥ ३ ॥ मुसळाचें धनु। तुका ह्मणे नव्हे अनु ॥ ४ ॥

१८० काय ह्याचें घ्यावें। नित्यनित्य कोणें गावें ॥ १ ॥ केलें हरिकथेनें वांज। अंतरोनि जाते निज ॥ २ ॥ काम संसार। अंतरीं हे करकर ॥ ३ ॥ तुका ह्मणे हेंड। ऐसें मानिती ते लंड[3] ॥ ४ ॥

१ प्रेत. २ मूर्खा. ३ अडाणी.

१८१ जाळें घातलें सागरीं। बिंदु न राहे भीतरीं ॥ १ ॥ तैसें पापियाचें मन। तया नावडे कीर्तन ॥ २ ॥ गाढव गंगेसी न्हाणिलें। जाउनि उकरड्यावरी लोळे ॥ ३ ॥ प्रीति पोसिलें काउळें। जाउनि विष्ठेवरी लोळे ॥४॥ तुका ह्मणे तैसी हरी। कीरव्यां[1] नावडे कस्तुरी ॥ ५ ॥

१८२ निंदक तो परउपकारी। काय वर्णूं त्याची थोरी। तो रजकाहूनि भला। परि सर्व गुणें आगळा ॥ १ ॥ नेघे मोल धुतो फुका। पाप वरच्यावरी देखा। करीतसे साधका। शुद्ध सरते तिहीं लोकीं ॥ २ ॥ मुखसंवदेणी[2] सांगातें। अवघें सांठविलें तेथें। जिव्हा साबण निरुतें। दोष काढी जन्माचे ३ तया ठाव यमपुरीं। वास करणें अघोरीं। त्यासी दंडण करी। तुका ह्मणे न्हाणी ते ४

१८३ मेलियांच्या रांडा इच्छित लेंकरूं। लाज नाहीं धरूं प्रीत कैशी ॥ १ ॥ मागिलां

---

१ एक. पक्षी. २ परिटाचा वस्त्रें धुण्याचा वाईट पदार्थ.

पुढिलां एका सरोवरी । काळाची पेटारी खांदा वाहे ॥ २ ॥ आन दिसे परी मरणेंचि खरें । सांपळा उंदिरें सामाविलीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे जाली मनाची परती । निवळली ज्योती दिसों आली ॥ ४ ॥

१८४ चाकरीवांचून । खाणें अनुचित वेतन[1] ॥ १ ॥ धणी काढोनियां निजा । करील ये कामाची पूजा ॥ २ ॥ उचितां वेगळें । अभिळासें तोंड काळें ॥ ३ ॥ सांगे तरी तुका । लाज नाहीं लोकां ॥ ४ ॥

१८५ गोमट्या बीजाचीं फळेंही गोमटीं[2] । बाहे तेचि पोटीं समतुक ॥ १ ॥ जातीच्या संतोषें चित्तासी विश्रांति । परतोनि मागुती फिरों नेणे ॥ २ ॥ खऱ्याचे पारखीं येत नाहीं तोटा । निवडे तो खोटा ढाळें दुरी ३ तुका ह्मणे मज सत्याची आवडी । करितां तांतडी येत नाहीं ॥ ४ ॥

१८६ जाणे वर्तमान । परि तें न वारे त्या-

---

१ पगार. २ चांगली.

च्यानें ॥ १ ॥ तोंही कारणांचा दास । देव ह्मणवितां पावे नास ॥ २ ॥ वेची अनुष्ठान । सिद्धी कराया प्रसन्न ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्याचें । मुद्दल गेलें हाटवेंचें ॥ ४ ॥

१८७ चंदनाचे गांवीं सर्पांचि वसति । भोगिती ते होती द्वीपांतरीं ॥ १ ॥ एका ओझें एका लाभ घडे देवा । संचिताचा ठेवा वेगळाला ॥ २ ॥ क्षीराची वसति अशुद्ध सेवावें । जळली तें जावें भोग दुरी ॥३॥ तुका ह्मणे ऐसी बुद्धि ज्याची जड । त्याहुनी दगड बरे देवा ॥ ४ ॥

१८८ बांधी सोडी हें तों धन्याचिये हातीं । हेंकडें गोविती आपणां बळें ॥ १ ॥ भुललियासी नाहीं देहाचा आठव । धोतऱ्यानें भावें[१] पालटिला ॥ २ ॥ घरांत रिघावें दाराचिये सोई । भिंतीसवें डोई घेउनि फोडी ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा गेलीं विसरोन । आतां वर्म कोण दावी यांसी ॥ ४ ॥

---

१ आग्रही. २ वृत्ति.

१८९ पूर्वजांसी नर्का । जाणे तें आइका १
निंदा करावी चाहाडी । मनीं धरूनि आव-
डी ॥ २ ॥ मात्रागमना ऐसी । जोडी पातकां-
ची रासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे वाट । कुंभपा-
कांची ते नीट ॥ ४ ॥

१९० नाहीं पाइतन[1] भूपतीशीं दावा । धि-
ग त्या कर्तव्या आगी लागो ॥ १ ॥ मुंगियां-
च्या मुखा गजाचा[2] आहार । न साहावे भार
जाय जीवें ॥ २ ॥ तुका ह्मणे आधीं करावा
विचार । शूरपणीं तीर मोकलावा[3] ॥ ३ ॥

१९१ चावळलें काय न करी बडबड । न
ह्मणे फिकें गोड भुकेलें तें ॥ १ ॥ उमजल्या-
विण न धरी सांभाळ । असो खळखळ जना-
ची हे ॥ २ ॥ गरज्या न कळे आपुलिया चा-
डा । करावी ते पीडा कोणा काई ॥३॥ तुका
ह्मणे भोग भोगितील भोगें । संचित तें जोगें
आहे कोणा ॥ ४ ॥

१९२ आचरणा ठाव । नाहीं अंगीं स्वतां

१ वाहाण. २ हत्तीचा. ३ सोडावा.

भाव ॥ १ ॥ करवी आणिकांचे घात । खोडी काढूनि पंडित ॥ २ ॥ श्वानाचिया परी । मिष्टान्ना[illegible] विटाळ करी ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसा । सटवेचिना पाचां दिसां ॥ ४ ॥

१९३ जीवीचें जाणावें या नावें आवडी । हेंकड तें ओढी अमंगळ ॥१॥ चित्ताच्या संकोचें कांहींच न घडे । अतिशय वेडे चार तेचि ॥ २ ॥ काळाविण कांहीं नाहीं रुचों येत । करूनि संकेत ठेवियेला ॥ ३ ॥ तुका ह्मणे कळे वचनें चांचणी । काय बोलवूनि वेळोवेळीं ॥ ४ ॥

१९४ गेला तरी जावो सुखें नरकासी । कळंकी याविशीं शिवों नये ॥ १ ॥ रजस्वला करी वेलासी आघात । अंतरें तों हित दुरी बरें ॥ २ ॥ उगीच कां आलीं नासवावीं फळें विटाळ विटाळें कालवूनि ॥ ३ ॥ तुका ह्मणे लोणी घालोनि शेणांत । उपेगांची मात काय असे ॥ ४ ॥

---

१ मरेना. २ उपयोगाची गोष्ट.

१९५ अतित्याई बुडे गंगे । पाप लागे त्याचें त्या ॥ १ ॥ हें तों आपुलिया गुणें । असे जेणें योजिलें ॥ २ ॥ अवचटें[1] अग्नि जाळी । न सांभाळी दुःख पावे ॥ ३ ॥ जैसें तैसें दावी आरसा । नकटा कैसा पालटे ॥ ४ ॥

१९६ हेंदऱ्यांचे[2] भरितां कान । हलवी मान भोंक रितें ॥ १ ॥ नाहीं मी येथें सांगों स्पष्ट । भावें नष्ट घेत नाहीं ॥ २ ॥ अवगुणी बाटलें चित्त । तया हित आतळेना[3] ॥ ३ ॥ तुका ह्मणे फजितखोरा । ह्मणतां बरा उगी रहा ॥ ४ ॥

१९७ न मिळती एका एक । जये नगरीचे लोक ॥ १ ॥ भलीं तेथें राहूं नये । क्षणें होइल नकळे काय ॥ २ ॥ न करितां अन्याय । बळें करिती अपाय ॥ ३ ॥ नाहीं पुराणाची प्रीति । ठायीं ठायीं पंचायती ॥ ४ ॥ भल्या बुऱ्या मारी । होतां कोणी न निवारी ॥ ५ ॥ अविचाऱ्या हातीं । देऊनि प्रजा नागविती ६

१ अकस्मात. २ मूर्खांचे. ३ मिळेना.

तुका ह्मणे दरी । खसुं सेवावी ते बरी ॥ ७ ॥

१९८ मायबापें सांभाळिती । लोभाकारणें पाळिती ॥ १ ॥ तैसा नव्हे देवराव । त्याचा कृपाळु स्वभाव ॥२॥ मनासारिखें न होतां । बाळकासी मारी माता ॥ ३ ॥ तुका ह्मणे सांगूं किती । बाप लेंकासी मारिती ॥ ४ ॥

१९९ सत्यसंकल्पाचा दाता नारायण। सर्व करी पूर्ण मनोरथ ॥ १ ॥ येथें अलंकार शोभती सकल । भावबळें फळ इच्छेचें तें २ अंतरींचें बीज जाणे कळवळा । व्यापक सकळा ब्रह्मांडांचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं चालत तांतडी । प्राप्तकाळ[1] घडी आल्याविण ४

२०० काळाचिया सत्ता ते नाहीं घटिका। पंढरीनायका आठवितां ॥ १ ॥ सदा काळ गणना करी आयुष्याची । कथेचे वेळेची आज्ञा नाहीं ॥ २ ॥ याकारणें माझ्या विठोबाची कीर्ति । आहे हे त्रिजगतीं[2] थोर वाट ३ तुका ह्मणे जन्मा आलियाचें फळ । स्मरावा गोपाळ तेंचि खरें ॥ ४ ॥

---

१ मिळण्याची वेळ. २ त्रैलोक्यांत.

२०१ जाणे अंतरींचा भाव । तोचि करि-
तो उपाव ॥ १ ॥ नलगे सांगावें मागावें ।
जीवें भावें अनुसरावें । अविनाश द्यावें । फ-
ळ धीर धरोनि ॥ २ ॥ बाळा न मागतां भो-
जन । माता घाली पाचारून[1] ॥ ३ ॥ तुका
ह्मणे तरी । एकीं लंघियेले गिरी ॥ ४ ॥

२०२ करीं ऐसी धांवाधांवी । चित्त लावी
चरणापें ॥ १ ॥ मग तो माझा मायबाप । घे-
ईल ताप हरूनी ॥२॥ बहुतांच्या मतें गोवा[2] ।
होऊं जीवा नेदावा ॥ ३ ॥ तुका ह्मणे करुणा
बोलें । धीर विठ्ठलें निघेना ॥ ४ ॥

२०३ देव भक्तालागीं करूं नेदी संसार ।
अंगें वारासार करीतसे ॥ १ ॥ भाग्य द्यावें
तरी अंगें भरे ताठा । ह्मणोनि करंटा करोनि
ठेवी ॥ २ ॥ स्त्री द्यावी गुणवंती नसती गुंते
आशा । यालागीं कर्कशा पाठी लावी ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज प्रचिती[3] आली देखा । आणी-
क या लोकां काय सांगों ॥ ४ ॥

---

१ बोलावून. २ गुंती. ३ अनुभव.

२०४ विश्वंभरा बोळे । बहुत हात कान डोळे ॥ १ ॥ जेथें असे तेथें देखे । मागितलें तें आइके ॥ २ ॥ जें जें वाटे गोड । तैसें पुरवितो कोड ॥ ३ ॥ तुका ह्मणे भेटी । कांहीं पडों नेदी तुटी ॥ ४ ॥

२०५ पांचारितां[1] धांवे । ऐसी ठायींची हे सवे ॥ १ ॥ बोले करुणा वचनीं । करी कृपा लावी स्तनीं ॥ २ ॥ जाणे कळवळा । भावसिद्धींचा जिव्हाळा ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाम । मागें मागें धांवे प्रेम ॥ ४ ॥

२०६ वर्णावे ते किती । केले पवाडे श्रीपति ॥ १ ॥ विश्वासिया घडे लाभ । देईल तरी पद्मनाभ ॥ २ ॥ भाव शुद्ध तरी । सांगितलें काम करी ॥ ३ ॥ तुका ह्मणे भोळा देव । परी हा नागवी संदेहें[2] ॥ ४ ॥

२०७ पाठवील ठाया । पांडुरंग चिंतिलिया ॥ १ ॥ त्यासी चिंतिलिया मनीं । चिंता करी गवसणी ॥ २ ॥ पावावया फळ । अंगीं

---

१ हाका मारता. २ संशय.

असावें हें बळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे तई[1] । सिद्धि वोळंगती पायीं ॥ ४ ॥

२०८ न करावी चिंता । भय न धरावें सर्वथा ॥ १ ॥ दासां साहे नारायण । होय रक्षिता आपण ॥ २ ॥ नलगे परिहार । कांहीं योजावें उत्तर ॥ ३ ॥ न धरावी शंका । नये बोलों ह्मणे तुका ॥ ४ ॥

२०९ भय हरिजनीं । कांहीं न धरावें मनीं ॥ १ ॥ नारायण ऐसा सखा । काय जगाचा हा लेखा ॥ २ ॥ चित्त वित्त हेवा । समर्पून राहा देवा ॥ ३ ॥ तुका ह्मणे मन । असों द्यावें समाधान ॥ ४ ॥

२१० अभिमानी पांडुरंग । गोवा[2] काशाचा हो मग ॥ १ ॥ अनुसरा लवलाहीं । नका विचार करूं कांहीं ॥ २ ॥ कोठें राहतील पापें । झालिया हो अनुताप ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐचि घडी । उभ्या पाववील थडी ॥ ४ ॥

२११ वैद्य एक पंढरीराव । अंतर्भाव[3] तो

१ तरी. २ गुंता. ३ आंतील भाव.

जाणे ॥ १ ॥ रोगा ऐशा द्याव्या वल्ली[1] । जाणे झाली बाधा ते ॥ २ ॥ नेदी रुका वेचों मोल । पाहे बोल प्रीतीचे ॥ ३ ॥ तुका ह्मणे दयावंता । सदा चिंता दीनांची ॥ ४ ॥

२१२ चित्तीं नाहीं आस । त्याचा पांडुरंग दास ॥ १ ॥ असे भक्तांचिये घरीं । काम न सांगतां करी ॥ २ ॥ अनाथाचा बंधु । असे अंगीं हा संबंधु ॥ ३ ॥ तुका ह्मणे भावें । देवा सत्ता राबवावें ॥ ४ ॥

२१३ भाविकां हें वर्म सांपडलें निकें[2] । सेविती कवतुकें धणीवरि[3] ॥ १ ॥ इच्छितील तैसा नाचे त्यांचे छंदें । वंदिती पदें सुकुमारें ॥ २ ॥ विसरले मुक्ती भक्तिअभिलासें । ओढत सरिसें सुख आलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं मागायाची आस । पांडुरंग त्यांस विसंबेना ॥ ४ ॥

२१४ सत्य सत्यें देतें फळ । नाहीं लागतचि बळ ॥ १ ॥ ध्यावे देवाचे ते पाय । धीर

---

१ वनौषधी. २ चांगलें. ३ तृप्ति.

सकळ उपाय ॥ २ ॥ करावीच चिंता । नाहीं लागत तत्वतां ॥ ३ ॥ तुका ह्मणे भावें । शरण ह्मणवितां बरवें ॥ ४ ॥

२१५ लाभ पुढें करी । घात नारायण वारी ॥ १ ॥ ऐसी भक्तांची माउली । करी कृपेची सांउली ॥ २ ॥ माय बाळकासी । जीव भाव वेंची तैसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाड । नाहीं शरणांगता आड ॥ ४ ॥

२१६ अनंत ब्रह्मांडें । एके रोमीं ऐसें घेंडें ॥ १ ॥ तो या गौळियांचे घरीं । उंबरा चढतां टेंका धरी ॥ २ ॥ मारी दैत्य गाढे । ज्यांचे पुराणीं पवाडे ॥ ३ ॥ तुका ह्मणे कळा । अंगीं जयाच्या सकळा ॥ ४ ॥

२१७ कृपावंत किती । दीनें बहु आवडती ॥ १ ॥ त्यांचा भार वाहे माथां । करी योग[२]क्षेम चिंता ॥ २ ॥ भुलों नेदी वाट । करीं धरूनि दावी नीट ॥ ३ ॥ तुका ह्मणे जीवें । अनुसरतां एका भावें ॥ ४ ॥

---

१ अंतराय २ अप्राप्ताची प्राप्ति व प्राप्ताचें रक्षण.

२१८ करितां कोणाचेंही काज। नाहीं लाज देवासी ॥ १ ॥ बरें करावें हें काम। धरिलें नाम दीनबंधु ॥ २ ॥ करूनि आराणूक[1] पाहे। भलत्या साहाय्य व्हावया ॥ ३ ॥ बोले तैसी करणी करी। तुका ह्मणे एक हरि ॥४॥

२१९ घेऊनियां चक्र गदा। हाचि धंदा करी तो ॥ १ ॥ भक्ता राखे पायांपाशीं। दुर्जनांसी संहारी ॥ २ ॥ अव्यक्त तें आकारलें। रूपा आलें गुणवंत ॥ ३ ॥ तुका ह्मणे पुरवी इच्छा। जया तैसा विठ्ठल ॥ ४ ॥

२२० भक्ताविण देवा। कैंचें रूप घडे सेवा ॥ १ ॥ शोभविलें येर येरां। सोनें एके ठायीं हिरा ॥ २ ॥ देवाविण भक्ता। कोण देता निष्कामता ॥ ३ ॥ तुका ह्मणे बाळ। माता जैसें स्नेहजाळ ॥ ४ ॥

२२१ भक्त देवाघरींचा सुना[2]। देव भक्ताचा पोसणा[3] ॥ १ ॥ येर येरां जडलें कैसें। जीवा अंग जैसें तैसें ॥ २ ॥ देव भक्ताची

१ विश्रांति. २ कुत्रा. ३ रक्षणकर्ता.

कृपाळु माता । भक्त देवाचा जनिता ॥ ३ ॥ तुका ह्मणे अंगें । एक एकाचिया संगें ॥ ४ ॥

२२२ देव राखे तया मारील कोण । न मोडे कांटा हिंडतां वन ॥ १ ॥ न जळे न बुडे नव्हे कांहीं । विष तेंही अमृत पाहीं ॥ २ ॥ न चुके वाट न पडे फंदीं । नव्हे कधीं यमबाधा ॥ ३ ॥ तुका ह्मणे नारायण । येतां गोळ्या वारी बाण ॥ ४ ॥

२२३ आवडीनें धरिलीं नांवें । प्रियभावें चिंतन ॥ १ ॥ वेडा जाला वेडा जाला । लोंचावला भक्तीसी ॥ २ ॥ निचाडे हा चाड धरी । तुळसी करीं दळ मागे ॥ ३ ॥ धरिला मग न करी बळ । तुका ह्मणे कळ पायीं ४

२२४ प्रथम भेटी आलिंगन । मग चरण वंदावे ॥ १ ॥ ऐसा माझा भोळा बाप । हरी ताप कवळोनि ॥ २ ॥ न सांगतां शीणभाग । पांडुरंग जाणतसे ॥ ३ ॥ तुका ह्मणे कृपावंतें । धांवें मातें न मागतां ॥ ४ ॥

---

१ बाप. २ लुब्ध झाला. ३ निगरजु.

२२५ देवाच्या प्रसादें करा रे भोजन। व्हाल कोण कोण अधिकारी ते ॥ १ ॥ ब्रह्मादिकांसि हें दुर्लभ उच्छिष्ट । नका मानूं वीट ब्रह्मरसीं ॥ २ ॥ अवघियांपुरतें वोसंडलें पात्र । अधिकार सर्वत्र आहे येथें ॥ ३ ॥ इच्छादानी येथें वळला समर्थ । अवघेंचि आर्त पुरवितो ॥ ४ ॥ सरे येथें ऐसें नाहीं कदाकाळीं। पुढती वाटे कवळीं घ्यावें ऐसें ५ तुका ह्मणे पाक लक्ष्मीच्या हातें। कामारी सांगातें निरुपम ॥ ६ ॥

२२६ देव आमुचा देव आमुचा। जीव सकळ जीवांचा ॥ १ ॥ देव आहे देव आहे। जवळी आह्मां अंतर बाहे ॥ २ ॥ देव गोड देव गोड। पुरवी कोडांचेंही कोड ॥ ३ ॥ देव आह्मां राखे राखे। घाली कळीकाळासी काखे ॥ ४ ॥ देव दयाळ देव दयाळ। करी तुक्याचा सांभाळ ॥ ५ ॥

२२७ देव पाहों देव पाहों। उंचे ठायीं

१ इच्छा. २ आसांत. ३ कवतूक.

उभे राहों ॥ १ ॥ देव देखिला देव देखिला । तो नाहीं कोणां भ्याला ॥ २ ॥ देवासी कांहीं मागों मागों । जीवभाव[1] त्यासी सांगों ॥ ३ ॥ देव जाणे देव जाणे । पुरवी मनींचिये खुणे ॥ ४ ॥ देव कातर देव कातर । तुका ह्मणे अभ्यंतर ॥ ५ ॥

२२८ देव भला देव भला । मिळोनि जाय जैसा त्याला ॥ १ ॥ देव उदार देव उदार । देतां नाहीं थोडें फार ॥ २ ॥ देव बळी देव बळी । जोडा नाहीं भूमंडळीं ॥ ३ ॥ देव व्हावा देव व्हावा । आवडे तो सर्वां जीवां ॥ ४ ॥ देव चांगला देव चांगला । तुका चरणांसीं लागला ॥ ५ ॥

२२९ देव दयाळ देव दयाळ । सोहे[2] कोल्हाळ बहुतांचा ॥ १ ॥ देव उदार देव उदार । थोड्यासाठीं फार देऊं जाणे ॥ २ ॥ देव चांगला देव चांगला । तुका लागला चरणीं ३

२३० देव बराडी देव बराडी । घाली दे-

१ अंतरांतील भाव. २ सहन करतो.

ठासाठीं उडी ॥ १ ॥ देव भ्याड[1] देव भ्याड । राखे बळीचें कवाड ॥ २ ॥ देव भाविक देव भाविक । होय दासांचा सेवक ॥ ३ ॥ देव होया देव होया । जैसा ह्मणे तैसा तया ॥४॥ देव लाहान देव लाहान । तुका ह्मणे अणुरेणु४

२३१ देव मजूर देव मजूर । नाहीं उजूर सेवेपुढें ॥ १ ॥ देव गांढ्योळ[2] देव गांढ्याळ । देखोनियां बळ लपतसे ॥ २ ॥ देव तर काई देव तर काई । तुका ह्मणे राई तरी मोठी ३

२३२ देव जाणता देव जाणता । आपलीया सत्ता एकाएकीं ॥ १ ॥ देव चतुर देव चतुर । जाणोनि अंतर वर्ततसे ॥ २ ॥ देव निराळा देव निराळा । अलिप्त विटाळा तुका ह्मणे ॥ ३ ॥

२३३ देव निढळ देव निढळ । मूळ नाहीं डाळ परदेशी ॥ १ ॥ देव अकुळी देव अकुळी । भलते ठायीं सोयरीक ॥ २ ॥ देव लिगाड्या[3] देव लिगाड्या । तुका ह्मणे भाड्या दंभ ठकी ॥ ३ ॥

---

१ भित्रा. २ भित्रा. ३ लचांड करणारा.

२३४ देव घ्या कोणी देव घ्या कोणी। आइता आला घर पुसोनी ॥ १ ॥ देव न लगे देव न लगे। सांठवणेचे रुझले जागे ॥ २ ॥ देव मंदला देव मंदला। भाव बुडाला काय करूं ॥ ३ ॥ देव घ्या फुका देव घ्या फुका। न लगे रुका मोल कांहीं ॥ ४ ॥ दुबळा तुका भावहीन। उधारा देव घेतला ऋणें ॥ ५ ॥

२३५ अंतरींची घेतो गोडी। पाहे जोडी भावाची ॥ १ ॥ देव सोयरा देव सोयरा। देव सोयरा दीनाचा ॥ २ ॥ आपुल्याच वैभवें। शृंगारावें निर्मळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे जेंवी सवें[1]। प्रेम द्यावें प्रीतीचें ॥ ४ ॥

२३६ हरिहरां भेद। नाहीं वाद करूं नये१ एक एकाचे हृदयीं। गोडी साखरेच्या ठायीं२ भेदकासी नाड[2]। एक वेलांटीच आड ॥ ३ ॥ उजवें वामांग[3]। तुका ह्मणे एकचि अंग ॥४॥

२३७ सांठविला हरी। जांहीं हृदयमंदिरीं ॥ १ ॥ त्यांची सरली येरझार। झाला स-

१ बरोबर. २ बाध, नाश. ३ डावें अंग.

फळ व्यापार ॥ २ ॥ हरी आला हातां । मग कैंची भयचिंता ॥३॥ तुका ह्मणे हरी । कांहीं उरों नेदी उरी ॥ ४ ॥

२३८ भक्तऋणी देव बोलती पुराणें । निर्धार वचनें साच करी ॥ १ ॥ मागें काय जाणों अइकिली वार्ता । कबिर सांतें जातां घडिया वांटी ॥ २ ॥ माघारिया धन आणिलें घरासि । न घे केला त्यासि त्याग तेणें ॥ ३ ॥ नामदेवाचिया घरासि आणिलें । तेणें लुटविलें द्विजां हातीं ॥४॥ प्रत्यक्षासि काय द्यावें हें प्रमाण । येंकोबाचें ऋण फेडियलें ॥ ५ ॥ बीज दळोनियां केली आराधना । लागे नारायणा पेरणें तें ॥ ६ ॥ तुका ह्मणे नाहीं जयासि निर्धार । नाडला साचार तोचि एक७

२३९ कांहीं न मागती देवा । त्यांची करूं धांवे सेवा ॥ १ ॥ हळूहळू फेडी ऋण । होऊनियां रूपें दीन ॥ २ ॥ होऊं न सके वेगळा । क्षण एक त्या निराळा ॥३॥ तुका ह्मणे

---

१ बाजारांत. २ दृढनिश्चय.

भक्तिभाव । हाचि देवाचाही देव ॥ ४ ॥

२४० अंगीकार ज्यांचा केला नारायणें । निंद्य तेहि तेणें वंद्य केले ॥ १ ॥ अजामेळ भिल्ली तारिली कुंटणी । प्रत्यक्ष पुराणीं वंद्य केली ॥ २ ॥ ब्रह्महत्याराशी पातकी अपार । वाल्मीक किंकर वंद्य[1] केला ॥ ३ ॥ तुका ह्मणे येथें भजन प्रमाण । काय थोरपण जाळावें तें ॥ ४ ॥

२४१ ऐका महिमा आवडीची । बोरें खाय भिलटीचीं[2] ॥ १ ॥ थोर प्रेमाचा भुकेला । हाचि दुष्काळ तयाला ॥ २ ॥ अष्टमा सिद्धींला । न मनी क्षीरसागराला ॥ ३ ॥ पोहे सुदाम देवाचे । फके मारी कोरडेच ॥ ४ ॥ न ह्मणे उच्छिष्ट अथवा थोडें । तुका ह्मणे भक्तीपुढें ॥ ५ ॥

२४२ तयासी नेणतीं बहु आवडती । होय जया चित्तीं एक भाव ॥ १ ॥ उपमन्यु धुरु हे काय जाणती । प्रल्हादाच्या चित्तीं ना-

१ वंदन करण्याला योग्य. २ शबरीची.

रायण ॥ २ ॥ कोळी भिल्ल पशु श्वापदें[1] अपारें । कृपेच्या सागरें तारियेलीं ॥ ३ ॥ काय तीं गोपाळें चांगलीं शहाणीं । तया चक्रपाणी जेवी सवें ॥ ४ ॥ तुका ह्मणे भोळा भाविक हा देव । आह्मी त्याचे पाव धरुनी ठेलों५

२४३ गौळीयांचीं ताकपिरें । कोण पोरें चांगलीं ॥१॥ येवढा त्यांचा छंद देवा । काय सेवा भक्ती ते ॥ २ ॥ काय उपास पडिले होते । कण्याभोंवते विदुराच्या ॥ ३ ॥ तुका ह्मणे कुब्जा दासी । रूपरासी हीनकळा ॥४॥

२४४ शुकसनकादिकीं उभारिला बाहो । परिक्षितीला हो दिसां सातां ॥ १ ॥ उठाउठी करी स्मरणांचा धांवा । धरवत देवा नाहीं धीर ॥ २ ॥ त्वरा जाली गरुड टाकियेला मागें । द्रौपदीच्या लागें[2] नारायणें ॥३॥ तुका ह्मणे करी बहुच तांतडी । प्रेमाची आवडी लोभ फार ॥ ४ ॥

२४५ सोडिला संसार । माया तयावरि

---

१ जनावरें. २ धांव्यानें.

फार ॥१॥ धांवे चाले मागें मागें । सुखदुःख साहे अंगें ॥ २ ॥ यानें घ्यावें नाम । तीसी करणें त्याचें काम ॥ ३ ॥ तुका ह्मणे भोळी । विठ्ठल कृपेची कोंवळी ॥ ४ ॥

२४६ बोलिलों उत्कर्षें । प्रेमरस दासत्वें १ सांच करिता नारायण । जया शरण गेलों तों ॥ २ ॥ समर्थ तो आहे ऐसा । धरिली इच्छा पुरवी ॥ ३ ॥ तुका ह्मणे लडिवाळा-चें । द्यावें साचें करूनियां ॥ ४ ॥

२४७ पाहातां रूप डोळां भरे । अंतर नुरे वेगळें । इच्छावशें खेळ मांडी । अवघें सांडी बाहेरी ॥ १ ॥ तो हा नंदनंदन बाइये । यासी काय परिचार वो ॥ २ ॥ दिसतो हा न-व्हे तैसा । असे दिशाव्यापक । लाघव हा खोळेसाठीं । होतां भेटी परतेना ॥ ३ ॥ ह्म-णोनि उभी ठाकलीये । परतलीये या वाटा । आड करोनिया तुका । जो या लोका दाख-वितो ॥ ४ ॥

---

१ खरें. २ लाडक्याचें.

२४८ भाविकांचें काज अंगें देव करी। काढी धर्माघरीं उच्छिष्ट तें ॥ १ ॥ उच्छिष्ट तीं फळें खाय भिल्लटीचीं। आवडी तयांची मोंठी देवा ॥ २ ॥ काय देवा घरीं न मिळेचि अन्न। मागे भाजीपान द्रौपदीसी ॥ ३ ॥ अर्जुनाचीं घोडीं धुतलीं अनंतें। संकटें बहुतें निवारिलीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे ऐसीं आवडती लडिवाळें। जाणिवेचें[1] काळें तोंड देवा ॥५॥

२४९ आपुलिया बळें नाहीं बोलवत। सखा कृपावंत वाचा त्याची ॥ १ ॥ साळुंकी मंजूळ बोलतसे वाणी। शिकविता धनी वेगळाची ॥ २ ॥ काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें। परि त्या विश्वंभरें बोलविलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्याची कोण जाणे कळा। वागवी पांगुळा पायांविण ॥ ४ ॥

२५० आवडीचें दान देतो नारायण। बांह्या[2] उभारोन राहिलासे ॥ १ ॥ जें जयासी रुचे तें करी समोर। सर्वज्ञ[3] उदार मायबाप २

---

१ परोक्ष ज्ञान. २ हात. ३ सर्व जाणता.

२५३ वर्णावी ते थोरी एका विठ्ठलाची । कीर्ति मानवाची बोलों नये ॥ १ ॥ उदंडचि जाले जन्मोनियां मेले । होवोनियां गेले राव रंक ॥२॥ त्याचें नाम कोणी नेघे चराचरीं । साही वेद चारी वर्णिताती ॥ ३ ॥ अक्षय[1] अढळ चळेना ढळेना । तया नारायणा ध्यात जावें ॥ ४ ॥ तुका ह्मणे तुह्मी विठ्ठल चित्तीं ध्यातां । जन्म मरण व्यथा दूर होती ॥ ५ ॥

२५४ येणें मागें आले । त्यांचें निसंतान केलें ॥ १ ॥ ऐसी अवघड वाट । ऐकोन आलों मी बोभाट ॥ २ ॥ नागविल्या थोटी[2] । उरों नेदीच लंगोटी ॥ ३ ॥ तुका ह्मणे चोर । तो हा उभा कटीं कर ॥ ४ ॥

२५५ जें जें केलें तें तें साहे । कैसे पाहे भाविक ॥ १ ॥ ओंवाळूनि माझी काय । सांडिली यावरूनि ॥ २ ॥ काय होय नव्हे करूं । नेणें धरूं सत्ता ते ॥३॥ तुका ह्मणे कटीं कर । उभे धीर धरूनि ॥ ४ ॥

---

१ अविनाशी. २ मंडळ्या.

ठायीं पडिलिया तेंचि लागे खावें। ठायींचें-
चि घ्यावें विचारूनि ॥ ३ ॥ बीज पेरूनियां
तेंचि घ्यावें फळ। डोरलीस केळ कैचें ला-
गे ॥ ४ ॥ तुका ह्मणे देवा कांहीं बोल नाहीं।
तुझा तूंचि पाहीं शत्रू सखा ॥ ५ ॥

२५१ बैसोनि निश्चळ[1] करीं त्याचें ध्यान।
देईल तो अन्नवस्त्रदाता ॥ १ ॥ काय आह्मां
करणें अधिक सांचुनी। देव जाला ऋणी
पुरविता ॥ २ ॥ दयाळ मयाळ जाणे कळव-
ळा। शरणागतां लळा राखों जाणे ॥ ३ ॥
नलगे मागणें सांगणें तयासी। जाणे इच्छा
तैसी पुरवी त्याची ॥ ४ ॥ तुका ह्मणे लेई
अलंकार अंगीं। विठ्ठल हा जगीं तूंचि होसी५

२५२ जैसा निर्मळ गंगा ओघ। तैसा भा-
ग वोगरीं[2] ॥ १ ॥ प्रेम वाढे ग्रासोग्रासीं। ब्र-
ह्मरसीं भोजन ॥ २ ॥ तृप्तीवरि आवडी उरे।
ऐसे बरे प्रकार ॥ ३ ॥ तुका ह्मणे पाख[3] मन।
नारायण तें भोगी ॥ ४ ॥

---

१ स्थिर. २ वाढणें. ३ स्वच्छ.

२५३ वर्णावी ते थोरी एका विठ्ठलाची। कीर्ति मानवाची बोलों नये ॥ १ ॥ उदंडचि जाले जन्मोनियां मेले। होवोनियां गेले राव रंक ॥२॥ त्याचें नाम कोणी नेघे चराचरीं। साही वेद चारी वर्णिताती ॥ ३ ॥ अक्षय[1] अढळ चळेना ढळेना। तया नारायणा ध्यात जावें ॥ ४ ॥ तुका ह्मणे तुह्मी विठ्ठल चित्तीं ध्यातां। जन्म मरण व्यथा दूर होती ॥ ५ ॥

२५४ येणें मार्गें आले। त्यांचें निसंतान केलें ॥ १ ॥ ऐसी अवघड वाट। ऐकोन आलों मी बोभाट ॥ २ ॥ नागविल्या[2] थोंटी। उरों नेदीच लंगोटी ॥ ३ ॥ तुका ह्मणे चोर। तो हा उभा कटीं कर ॥ ४ ॥

२५५ जें जें केलें तें तें साहे। कैसे पाहे भाविक ॥ १ ॥ ओंवाळूनि माझी काय। सांडिली यावरूनि ॥ २ ॥ काय होय नव्हे करूं। नेणें धरूं सत्ता ते ॥३॥ तुका ह्मणे कटीं कर। उभे धीर धरूनि ॥ ४ ॥

---

१ अविनाशी. २ मंडळ्या.

२५६ जिव्हा जाणे फिकें मधुर कीं क्षार। येर मास पर हाता न कळे॥ १ ॥ देखावें नेत्रीं बोलावें मुखें। चित्ता सुखदुःखें कळों येती॥ २ ॥ परिमळासी[1] घ्राण[2] ऐकती श्रवें[3]ण। एकाचें कारण एका नये॥ ३ ॥ एक देहीं भिन्न दावियेल्या कळा। नाचवी पुतळा सूत्रधारी॥ ४ ॥ तुका ह्मणे ऐसी जयाची हे सत्ता। कां तया अनंता विसरलेली॥ ५ ॥

२५७ सोंवळा तो जाला। अंगीकार देवें केला॥ १ ॥ येर करिती भोजन। पोट पोसाया दुर्जन॥ २ ॥ चुकला हा भार। तयाचीच येरझार॥ ३ ॥ तुका ह्मणे दास। झाला तया नाहीं नास॥ ४ ॥

२५८ स्वामीच्या सामर्थ्यें। चाले बोलिला पुरुषार्थ॥ १ ॥ पाठी देवाचें हें बळ। मग लाभे हातीं काळ॥ २ ॥ देव ज्यासी साह्य। तेणें केलें सर्व होय॥ ३ ॥ तुका ह्मणे स्वामीसत्ता। मग नाहीं भय चिंता॥ ४ ॥

१ सुवास. २ नाक. ३ कान.

२५९ न करि त्याचें गांढेपण । नारायण सिद्ध उभा ॥ १ ॥ भवसिंधूचा थडवा केला । बोलाविला पाहिजे ॥ २ ॥ याचे सोई पाउल वेंचे । मग कैंचे आढथळे ॥ ३ ॥ तुका ह्मणे खरें खोटें । न ह्मणे मोठें लहान ॥ ४ ॥

२६० स्वामिकाज गुरुभक्ति । पितृवचन सेवा पति ॥ १ ॥ हेचि विष्णूची महापूजा । अनुभव नाहीं दुजा ॥ २ ॥ सत्य बोले मुखें । दुखवे आणिकाच्या दुःखें ॥ ३ ॥ निश्चयाचें बळ । तुका ह्मणे तेंच फळ ॥ ४ ॥

२६१ आह्मां घरीं एक गाय दुभताहे । पान्हा न समाये त्रिभुवनीं ॥ १ ॥ वाण[2] ते सांवळी नांव तें श्रीधरा । चरे वसुंधरा[3] चौदा भुवनीं ॥ २ ॥ वत्स नाहीं माय भलत्या सवें जाय । कुर्वाळी तो लाहे भात्रभरणा ३ चहूं धारीं क्षीर वोळली अमुप । धाले सनकादिक सिद्ध मुनी ॥ ४ ॥ तुका ह्मणे माझी भूक तेथें काय । जोगाविती माय तिन्ही लोकां ॥ ५ ॥

---

१ भिन्नपण, हीनपण. २ वर्ण. ३ पृथ्वी.

२६२ देवाच्या संबंधें विश्वचि सोयरें। सूत्र ओढें दोरें एका एक ॥ १ ॥ आहाच हें नव्हे विटायासारिखें । जीव जीवनीं देखें सामावलें ॥ २ ॥ आणिकाचें सुख दुःख उमटे अंतरीं । येर्थ.ल इतरीं तेणें न्यायें ॥ ३ ॥ तुका ह्मणे ठसावलें शुद्ध जाती । शोभाचि पुढती विशेषता ॥ ४ ॥

२६३ धन्य भावशीळ[१]। ज्याचें हृदय निर्मळ ॥ १ ॥ पूजी प्रतिमेचे[२] देव । संत ह्मणती तेथें भाव ॥ २ ॥ विधिनिषेध नेणती । एकनिष्ठा धरूनी चित्तीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे तैसें देवा । होणें लागे त्यांच्या भावा ॥ ४ ॥

२६४राजा करी तैसे दाम। तेही चाम चालती ॥१॥ कारण ते सत्ता शिरीं। कोण करी अव्हेर२ वाइलें तें सुने खांदीं । चाले पदीं बैसविलें ३ तुका ह्मणे विश्वंभरें । करुणाकरें रक्षिलें ॥४॥

२६५ सुखाचे व्यवहारीं सुखलाभ जाला। आनंद कोंदला[३] मागें पुढें ॥ १ ॥ संगती पं-

---

२ मूर्तिपूजा. ३ आंत बाहेर भरला.

२६२ देवाच्या संबंधें विश्वचि सोयरें। सूत्र ओढें दोरें एका एक ॥ १ ॥ आहाच हें नव्हे विटायासारिखें । जीव जीवनीं दें सामावलें ॥ २ ॥ आणिकाचें सुख दुःख उमटे अंतरीं । येथील इतरीं तेणें न्यायें ॥ ३ ॥ तुका ह्मणे ठसावलें शुद्ध जाती । शोभाचि पुढती विशेषता ॥ ४ ॥

२६३ धन्य भावशीळ[1]। ज्याचें हृदय निर्मळ ॥ १ ॥ पूजी प्रतिमेचे[2] देव । संत ह्मणती तेथें भाव ॥ २ ॥ विधिनिषेध नेणती । एकनिष्ठा धरूनी चित्तीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे तैसें देवा । होणें लागे त्यांच्या भावा ॥ ४ ॥

२६४ राजा करी तैसे दाम। तेही चाम चालती ॥१॥ कारण ते सत्ता शिरीं। कोण करी अव्हेर २ वाइलें तें सुने खांदीं । चाले पदीं बैसविलें ३ तुका ह्मणे विश्वंभरें । करुणाकरें रक्षिलें ॥४॥

२६५ सुखाचे व्यवहारीं सुखलाभ जाला। आनंद कोंदला[3] मागें पुढें ॥ १ ॥ संगती पं-

---

१ श्रद्धाळू. २ मूर्तिपूजा. ३ आंत बाहेर भरला.

गती देवासवें घडे। नित्यानित्य पडे तेंचि साचा ॥ २ ॥ समर्थांचे घरीं सकळ संपदा। नाहीं तुटी[3] कदा कासयाची ॥ ३ ॥ तुका ह्मणे येथें लाभाचिया कोटी। बहु वाव पोटीं समर्थांचे ॥ ४ ॥

२६६ संसारा आलिया एक सुख आहे। आठवावे पाय विठोबाचे ॥ १ ॥ येणें होय सर्व संसार सुखाचा। नलगे दुःखाचा लेश कांहीं ॥ २ ॥ घेतील तयांसी सोपें आहे सुख। बोलियेलें मुखें नारायण ॥ ३ ॥ सांगितली सोय करुणासागरें। तुह्मां कां हो खरें न वाटे तें ॥ ४ ॥ तुका ह्मणे तेणें उपकार केला। भोळ्या भाविकांला तरावया ॥ ५ ॥

२६७ सुख नाहीं कोठें आलिया संसारीं। वायां हांवभरी[3] होऊं नये ॥ १ ॥ दुःख बांदवडी आहे हा संसार। सुखाचा विचार नाहीं कोठें ॥ २ ॥ चवदा कलेंवरी आयुष्य जयाला। परी तो राहीला ताटी खालीं ॥३॥

१ बरोबर. २ तोटा. ३ उतावळा, उच्छृंखल.

तुका ह्मणे वेगीं जाय सुटोनिया । धरूनि हृदयामाजीं हरि ॥ ४ ॥

२६८ सुख पाहतां जवापाडें[1] । दुःख पर्वता एवढें ॥ १ ॥ धरी धरी आठवण । मानी संतांचें वचन ॥ २ ॥ नेलें रात्रीनें तें अर्ध । बाळपण जराव्याध ॥ ३ ॥ तुका ह्मणे पुढा । धाणा जुंतीजसी[2] मूढा ॥ ४ ॥

२६९ सावधान ऐसें काय तें विचारा । आले हो संसारा सकळही ॥ १ ॥ अंतीं समयाचा करणें विचार । वेंचती[3] सादर घटिकापळें ॥ २ ॥ मंगळ हें नोहे कन्यापुत्रादिक । राहिला लौकिक अंतरपाट ॥ ३ ॥ तुका ह्मणे देव अंतरला दुरी । डोळिया अंधारी पडलीसे ॥ ४ ॥

२७० वैभव तें राज्य संपत्ति टाकावी । उदरार्थ मागावी माधोकरी ॥ १ ॥ आपुलें तें आधीं करावें स्वहित । ऐसी आहे नीत स्वधर्माची ॥ २ ॥ वर्ण कुळ जाति याचा अभि-

---

१ जवायेवढें. २ जुंपला जाशील. ३ खर्च होतात.

मान । त्यजावा सन्मान लौकिकाचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे राहे एकाकी निःशंक । देऊनिया हांक कंठीं काळ ॥ ४ ॥

२७१ क्षणक्षणा हाचि करावा विचार । तरावया पार भवसिंधु ॥ १ ॥ नाशिवंत देह जाणार सकळ । आयुष्य खातो काळ साव-धान ॥ २ ॥ संतसमागमीं धरावी आवडी । करावी तांतडी[1] परमार्थी ॥ ३ ॥ तुका ह्मणे इहलोकींच्या वेव्हारें । नका डोळे धूरें भरूनि राहों ॥ ४ ॥

२७२ येऊनि नरदेहा विचारावें सार । धरावा पैं धीर भजनमार्गी ॥ १ ॥ चंचळ चित्तासी ठेवूनियां ठायीं । संतांचिये पायीं लीन व्हावें ॥ २ ॥ भावाचा पैं हात धरावा निश्चयें । तेणें भवभय[2] देशधडी ॥ ३ ॥ नामापरतें जगीं साधन सोपें नाहीं । आवडीनें गाई सर्व काळ ॥ ४ ॥ तुका ह्मणे धन्य वंश त्या नराचा । ऐसा निश्चयाचा मेरू[3] जाला ॥ ५

१ त्वरा. २ प्रपंचभय. ३ शिरोभाग.

२७३ उपजला प्राणी न राहे संसारीं। बैसला सेजेरीं[1] काल उसां ॥ १ ॥ पाहा तो उंदीर घेउनि जाय बोका। तैसा काळ लोकां नेत असे ॥ २ ॥ खाटिकाचे घरीं अजापुत्र पाहे। कसाबाची गाय वांचे कैसी ॥३॥ तुका ह्मणे कांहीं करा काढाकाढी। जाती ऐसी घडी पुन्हां नये ॥ ४ ॥

२७४ कोणाशीं विचार करावा शेवटीं। एवढ्या लाभें तुटी[2] जाल्या तरे ॥ १ ॥ सांभाळितो शूर आला घावडाव। पुढें दिला पाव न करी मागें ॥ २ ॥ घात तो या नांवें तेथें अंतरायें[3]। अंतरल्या पाय गोविंदाचे ॥ ३ ॥ तुका ह्मणे गडसंदीचा ठाव। केला तो उपाव कार्या येतो ॥ ४ ॥

२७५ पोटापुरतें काम। परी अगत्य तो राम ॥ १ ॥ कारण तें हेंचि करी। चित्तीं पांडुरंग धरी ॥ २ ॥ प्रारब्धीं हेवा। जोडी देवाची ते सेवा ॥ ३ ॥ तुका ह्मणे बळ। बुद्धि वेंचूनि सकळ ॥ ४ ॥

---

१ आंथरुणावर. २ नुकसान. ३ विघ्न.

२७६ नये जरी तुज मधुर उत्तर। दिध-ला सुस्वर नाहीं देवें ॥ १ ॥ नाहीं तयाविण भुकेला विठ्ठल। येईल तैसा बोल रामकृष्ण ॥ २ ॥ देवापाशीं मागे आवडीची भक्ति। विश्वासेंशी प्रीति भावबळें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मना सांगतों विचार। धरावा निर्धार दि-सेंदिस ॥ ४ ॥

२७७ साधनें तरी हींच दोन्ही। जरी कोणी साधील ॥ १ ॥ परद्रव्य परनारी। यांचा धरी विटाळ ॥ २ ॥ देव भाग्यें घरा येती। संपत्ती त्या सकळा ॥ ३ ॥ तुका ह्मणे तें शरीर। गृह भांडार देवाचें ॥ ४ ॥

२७८ विटाळ तो परद्रव्य परनारी। येथुनि जो दुरी सोंवळा तो ॥ १ ॥ गद्य पद्य काहीं न धरावी उपाधी। स्वाधीनचि बुद्धि करूनी ठेवा ॥ २ ॥ विचाराचें करावें स्वहित। पापपुण्यातीत भांडवल ॥ ३ ॥ तुका ह्मणे न लगे जावें वनांतरा। विश्व विश्वंभरा सारिखेंचि ॥ ४ ॥

१ नुसतें भाषण २ कविता. ३ वनामध्यें.

२७९ शांतीपरतें नाहीं सुख । येर अवघें-
चि दुःख ॥ १ ॥ ह्मणउनी शांति धरा । उत-
राल पैल तीरा ॥ २ ॥ खवळलिया कामक्रो-
धीं । अंगीं भरती आधिव्याधी[1] ॥ ३ ॥ तुका
ह्मणे त्रिविध ताप । जाती मग आपेंआप॥४॥

२८० सांडूनियां सर्व लौकिकाची लाज ।
आळवा यदुराज भक्तिभावें ॥ १ ॥ पाहूनि-
यां झाडें वरबडूनि पाला । खाऊनि विठ्ठला
आळवावें ॥ २ ॥ वेंचूनिया चिंध्या भरूनिया
धागा । गुंडाळूनि ढुंगा आळवावें ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऐसें मांडिल्या निर्वाण । तया ना-
रायण उपेक्षीना ॥ ४ ॥

२८१ भावें गावें गीत । शुद्ध करूनिया
चित्त ॥ १ ॥ तुज व्हावा आहे देव । तरि हा
सुलभ उपाव ॥ २ ॥ आणिकांचे कानीं । गुण
दोष मना नाणीं ॥ ३ ॥ मस्तक ठेंगणा[2] । करीं
संतांच्या चरणा ॥ ४ ॥ वेंची तें वचन । जेणें
राहे समाधान ॥ ५ ॥ तुका ह्मणे फार । थो-
डा तरी परोपकार ॥ ६ ॥

---

१ मानसिक व शारीरिक दुखणीं. २ नम्र.

२८२ आलिया भोगासी असावें सादर। देवावरी भार घालूं नये ॥ १ ॥ मग तो कृपासिंधु निवारी सांकडें[1]। येर तें बापुडें काय रंक ॥२॥ भवांचिये[2] पोटीं दुःखाचिया रासी। शरण देवासी जातां भलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे नव्हे काय त्या करितां। चिंतावा तो आतां विश्वंभर ॥ ४ ॥

२८३ तरीच जन्मा यावें। दास विठ्ठलाचें व्हावें ॥ १॥ नाहीं तरी काय थोडीं। श्वान सूकरें बापुडीं ॥ २ ॥ जन्मल्याचें तें फळ। अंगीं लागों नेदी मळ ॥३॥ तुका ह्मणे भले। ज्याच्या नांवें मानावले ॥ ४ ॥

२८४ थोर ती गळाली पाहिजे अहंता। उपदेश घेतां सुख वाटे ॥ १ ॥ व्यर्थ भाराभर केलें पाठांतर। जोंवरि अंतर[3] शुद्ध नाहीं॥२॥ घोडें काय थोडें वागवितें ओझें। भावाविण वांझ पाठांतर ॥ ३ ॥ तुका ह्मणे धरा निष्ठावंत भाव। जरी पंढरीराव पाहिजे तो ॥४॥

---

१ संकट. २ प्रपंचात. ३ अंतःकरण.

२८५ जिंकावा संसार। येणें नांवें तरी शूर ॥ १ ॥ येरें काय तीं बापुडीं। कीरे अहंकाराचीं घोडीं ॥ २ ॥ पण ऐशा नांवें। देव धरिजेतो भावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे जावें। संत कीर्तीनें बरवें ॥ ४ ॥

२८६ हालवूनि खुंट। आधीं करावा बळकट ॥ १ ॥ मग तयाच्या आधारें। करणें तें अवघें बरें ॥ २ ॥ सुख दुःख साहे हर्षामर्षीं भंगा नये ॥ ३ ॥ तुका ह्मणे जीवें। आधीं मरोनि रहावें ॥ ४ ॥

२८७ होऊं नको कांहीं या मना आधीन। नाइकें वचन याचें कांहीं ॥ १ ॥ हटीयाची गोष्टी मोडून टाकावी। सोई ही धरावी विठोबाची ॥ २ ॥ आपुले आधीन करूनिया ठेवा। नाहीं तरी जीव घातक हें ॥ ३ ॥ तुका ह्मणे झाले जे मना आधीन। तयांसी बंधन यम करी ॥ ४ ॥

२८८ कथनीं पठणीं करूनि काय। वांचू-

१ निश्चयेंकरून. २ आनंदद्वेष. ३ हठानें.

नि रहाणी[1] वायां जाय ॥ १ ॥ मुखीं वाणी अमृत गोडी । मिथ्या भुकें चरफडी ॥ २ ॥ पिळणी पाक करितां दगडा । काय जडा होय तें ॥ ३ ॥ मधु मेळवूनि माशी । आणि-कां सांसी[2] पारधिया ॥ ४ ॥ मेळवूनि धन मेळवी माती । लोभ्या हातीं तेंचि मुखीं॥५॥ आपलें केलें आपण खाय । तुका वंदी त्याचे पाय ॥ ६ ॥

---

# नीतिपर अभंग.

—:०:—

१ देह तंव असे भोगाचे आधीन । याचें सु-खशीण क्षणभंगुर ॥ १ ॥ अविनाश जोडी दे-वापायीं भाव । कल्याणाचा ठाव सकळही ॥ २ ॥ क्षणभंगुर हा येथील पसारा । आलि-या आकारा अवघें नासे ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें सकळ विश्रांति । आठवावा चित्तीं नौ-रायण ॥ ४ ॥

---

१ आचरण. २ संचय. ३ नरांच्या हृदयीं रहाणारा.

२ बहुतां पुरे ऐसा वाण । आलें धन घरासी ॥ १ ॥ घ्या रे फुका मोलेंविण । नारायण न भुंला ॥ २ ॥ ऐका निवळल्या मनें । बरवें कानीं सादर ॥ ३ ॥ तुका ह्मणे करूनि अंतीं । निश्चिती हे ठेवावी ॥ ४ ॥

३ मेघवृष्टीनें करावा उपदेश । परी गुरूनें न करावा शिष्य । वांटा लाभे त्यास । केल्या अर्ध कर्मांचा ॥ १ ॥ द्रव्य वेंचावें अन्नछत्रीं । भूतीं द्यावें सर्वत्र । नेदावा हा पुत्र । उत्तमयाती पोसणा ॥ २ ॥ बीज तें पेरावें खडकीं । ओल नाहीं ज्याचे बुडखीं । थीतां ठके सेकीं। पाठी लागे दिवाण ॥ ३ ॥ गुज बोलावें संतांशीं । पत्नी राखावी जैसी दासी । लाड देतां तियेसी । वांटा पावे कर्मांचा ॥ ४ ॥ शुद्ध करूनि पाहावें । वरिल रंगा न भुलावें । तुका ह्मणे घ्यावें । जया नये तुटी तें ॥ ५ ॥

४ मारगीं चालतां पाउला पाउलीं । चिंतावी माउली पांडुरंग ॥ १ ॥ सर्व सुख लागे

१ विषयांस भुलूं नका. २ शेवटीं.

घेऊनियां पाठी । आवडीचा कंठीं रस ओती ॥ २ ॥ पीतांबर छाया करी लोभापर । पाहे तें उत्तर आवडीचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे हेंचि करावें जीवन । वाचें नारायण तान भूक ॥४॥

५ नका वांटूं मन विधिनिषेधासी । स्मरावा मानसीं पांडुरंग ॥ १ ॥ खादलिया[1] अन्ना माशी बोलों नये । अवघेंचि जाय एका घासें ॥ २ ॥ जोडी होते परी ते बहु कठिण । करितां जतन सांभाळावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे येथें न मना विषाद[2] । निंबेंविण व्याध[3] तुटों नये ॥ ४ ॥

६ भागल्याचें तारूं शिणल्याची साउली । भुकेलिया घाली प्रेमपान्हा ॥ १ ॥ ऐसी हे कृपाळू अनाथांचेविशीं । सुखाचीच राशी पांडुरंग ॥२॥ सकळां सन्मुख कृपेचिया दृष्टी । भे[illegible] बहु भेटी उतावीळां ॥ ३ ॥ तुका ह्मणे यथें आतां उरला कैंचा । अनंता जन्मींचा शीणभाग ॥ ४ ॥

---

१ खाल्लेल्या. २ खेद. ३ रोग.

७ मनीं भाव असे कांहीं । तेथें देव येती पाहीं ॥ १ ॥ पाहा जनाई सुंदरी । तेथें देव पाणी भरी ॥ २ ॥ शुद्ध पाहोनियां भाव । त्याचे हृदयीं वसे देव ॥ ३ ॥ तुका ह्मणे विठोबासी । ठाव देई चरणांपाशीं ॥ ४ ॥

८ ऐका पंडितजन । तुमचे वंदितों चरण ॥ १ ॥ नका करूं नरस्तुती । माझी परिसा हे विनंती ॥ २ ॥ अन्न आच्छादन[1] । हें तों प्रारब्धा अधीन ॥ ३ ॥ तुका ह्मणे वाणी । सुखें वेंचा नारायणीं ॥ ४ ॥

९ पर उपकारें कायावाचामन । वेंचे[2] सुदर्शन रक्षी तया ॥ १ ॥ याजसाठीं असें योजिलें श्रीपति । संकल्पाचे हातीं सर्व जोडी ॥२॥ परपीडे ज्याची जिव्हा मुंडताळे । यमदूत डाळे करिती पूजा ॥ ३ ॥ तुका ह्मणे अंबरूषी दुर्योधना । काय जालें नेणां दुर्वासया ॥४॥

१० ऊंस वाढवितां वाढली गोडी । गुळ साखर हे त्याची परवडी[3] ॥ १ ॥ सत्यकर्में

१ वस्त्रें. २ खर्चें. ३ प्रकार.

आचरे रे । बापा सत्यकर्मे आचरे रे ॥ २ ॥ सत्यकर्में आचरें होईल हित । वारेल दुःख असत्याचें ॥ ३ ॥ साकरेच्या आळां लाविला कांदा । स्थूळ सानापरी वाढे दुर्गंधा ॥ ४ ॥ सत्य असत्य हे ऐसिया परी । तुका ह्मणे याचा विचार करीं ॥ ५ ॥

११ नयो वाचे अनुचित[1] वाणी । नसो मनीं कुंडी[2] बुद्धि ॥ १ ॥ ऐसें मागा अरे जना । नारायण विनवूनि ॥२॥ कामक्रोधां पडो चिरा । ऐसा बरा सायास ॥३॥ तुका ह्मणे नाना छंदें । या विनोदें न पडावें ॥ ४ ॥

१२ भार घाली देवा । नलगे देश डोई घ्यावा ॥१॥ देह प्रारब्धा आधीन । सोसें अधिक वाढे शीण ॥ २ ॥ व्यवसाय निमित्त । फळ देतसे संचितें[3] ॥ ३ ॥ तुका ह्मणे फिरे । भोंवडीनें दम जिरे ॥ ४ ॥

१३ सेवकासी आज्ञा स्वामीची प्रमाण । जोंवरी हा प्राण जाय त्याचा ॥ १ ॥ आणि-

---

१ अयोग्य. २ कपटी. ३ दैव.

कांचा धाक न धरावा मनीं। निरोपावचनीं टळों नये ॥ २ ॥ समय सांभाळूनि आगळें उत्तर। द्यावें भेदी वज्र तयापरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे तरी ह्मणवावें सेवक। खादलें तें अन्न एक होय ॥ ४ ॥

१४ बीज पेरी शेतीं। मग गाडेवरी वाहती[१] वायां गेलें ऐसें दिसे। लाभ त्याचे अंगीं वसे ॥ २ ॥ पाल्याची जतन। तरी प्रांतीं येती कण ॥ ३ ॥ तुका ह्मणे आळां। उदक देतां लाभे फळा ॥ ४ ॥

१५ देव कैंचा तया दुरी। भाकी बरी करुणा ॥ १ ॥ आळविल्या नलगे घर। माय जाणे रे भातुकें ॥ २ ॥ नावेवरी ज्याचा भार। पैलें पार जवळी त्या ॥ ३ ॥ आतां परदेशी तुका। जाला लोकां वेगळा ॥ ४ ॥

१६ किती या काळाचा सोसावा ओळसा। लागला सरिसा पाठोपाठीं ॥ १ ॥ लक्ष चौऱ्यांशींची करा सोडवण। रिघा या शरण

१ आळ्याला. २ खाऊ. ३ त्रास.

पांडुरंगा ॥ २ ॥ उपजल्या पिंडा मरण सां-
गातें । मरतें उपजतें सर्वेंचि तें ॥ ३ ॥ तुका
ह्मणे माळ गुंतली राहाटीं । गाडग्याची सुटी
फुटलिया ॥ ४ ॥

१७ चिंतनासी नलगे वेळ । सर्व काळ
करावें ॥ १ ॥ सदा वाचें नारायण । तें वदन
मंगळ ॥ २ ॥ पढिये सर्वोत्तम भाव । येरे[1]
वावं[2] पसारा ॥ ३ ॥ ऐसें उपदेशी तुका । अ-
वघ्या लोकां सकळां ॥ ४ ॥

१८ कृपेचीं उत्तरें देवाचा प्रसाद । आनं-
दीं आनंद वाढवाचा ॥ १ ॥ बहुतांच्या भाग्यें
लाधलें जहाज । येथें आतां काज लवलाहें २
अलभ्य तें आलें द्वारावरी फुका । येथें आतां
चुका न पाहिजे ॥ ३ ॥ तुका ह्मणे जिव्हाश्र-
वणाच्या द्वारें । माप भरा बरें सिगेवरि ॥४॥

१९ तप तीर्थें दान व्रत आचरण । गातां
हरिगुण वारूं नये ॥ १ ॥ कोटि कुळें त्यांची
वाटुली[3] पाहाती । त्या तया घडती ब्रह्महत्या

---

१ दुसरा. २ व्यर्थ ३ वाट.

॥ २ ॥ आपुलिया पापें न सुटे सायासें । कोणा काळें ऐसें निस्तरेल ॥ ३ ॥ व्हावें साह्य तया न घालावें भय । फुकासाठीं पाहे लाभ घात ॥ ४ ॥ तुका ह्मणे हित माना या वचना । सुख दुःख जाणा साधे फुकट ॥ ५ ॥

२० देवासाठीं जाणा तयासीच आटी । असेल ज्या गांठीं पुण्यराशी ॥ १ ॥ निर्बळा पाठवी बळें वाराणसी । मेला आला त्यासी अर्ध पुण्य ॥२॥ कथे निद्राभंग करा भोजनीं । तया सुखा धणी पार नाहीं ॥ ३ ॥ यागीं ऋण घ्यावें द्यावें सुख लाहीं । बुडतां चिंता नाहीं उभयतां ॥ ४ ॥ तुका ह्मणे वर्म जाणोनि करावें । एक न घालावें एकावरी ॥ ५ ॥

२१ परस्त्रीतें ह्मणतां माता । चित्त लाजवितें ॥ १ ॥ काय बोलोनियां तोंडें । मनामाजीं कानकोंडें ॥२॥ धर्मधारिष्ट गोष्टी सांगे । उष्ट्या हातें नुडवी कागें ॥ ३ ॥ जें जें कर्म वसे अंगीं । तें तें आठवे प्रसंगीं ॥ ४ ॥ बोले

१ समाधान २ कवळा.

तैसा चाले । तुका ह्मणे तो अमोल ॥ ५ ॥

२२ असत्य वचन होतां सर्व जोडी । जरी लग्नघडी परउपकार ॥ १ ॥ जाईल पतना यासि संदेह नाहीं । साक्ष आहे कांहीं सांगतों तें ॥ २ ॥ वदविलें मुखें नारायणें धर्मा । अंगुष्ठ त्या कर्मासाठीं गेला ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां सांभाळारे पुढें । अंतरींचें कुडें देइल दुःख ॥ ४ ॥

२३ जैसें चित्त जयावरी । तैसें जवळी तें दुरी ॥ १ ॥ नलगे द्यावा परिहार । या कोरडें[1] उत्तर ॥ २ ॥ असे अभ्यंतरें[2] । साक्षभूत जवळी ॥ ३ ॥ अवघें जाणें सूत्रधारी । कोण नाचे कोणे परी ॥ ४ ॥ तुका ह्मणे बुद्धि । ज्याची तेच तया सिद्धि ॥ ५ ॥

२४ द्रव्याचिया कोटी । नये गांडीची लंगोटी ॥ १ ॥ अंतीं बोळवणेंसाठीं । पांडुरंग धरा कंठीं ॥ २ ॥ लोभाची लोभिकें । यांचें

---

१ वाईटपणा २ मन.

सन्निधान[1] फिकें ॥ ३ ॥ तुका ह्मणे हितें । जग नहो पडो रितें ॥ ४ ॥

२५ ब्रह्मचारी धर्म घोकावें अक्षर । आश्रमीं विचार षट्कर्मे ॥ १ ॥ वानप्रस्थ तरी संयोगीं वियोग । संन्यास तो त्याग संकल्पाचा ॥ २ ॥ परमहंस तरी जाणे सहज वर्म[2] । तेथें याती[3] धर्म कुळ नाहीं ॥ ३ ॥ बोले वर्म जो चाले याविरहित । तो जाणा पतित श्रुति बोले ॥४॥ तुका ह्मणे कांहीं नाहीं नेमाविण । मोकळा तो शीण दुःख पावे ॥ ५ ॥

२६ कामिनीसी जैसा आवडे भ्रतार । इच्छीत चकोर चंद्र जैसा ॥ १ ॥ तैसी हे आवडी विठ्ठलाचे पायीं । लागलिया नाहीं गर्भवास ॥ २ ॥ दुष्काळें पीडिल्या आवडे भोजन । आणिक जीवन तृषाक्रांता ॥ ३ ॥ कामातुर जैसा भय लज्जा सोडोनी । आवडे कामिनी सर्वभावें ॥ ४ ॥ तुका ह्मणे तैसी राहिली आवडी । पांडुरंग थडी पाववील ॥५॥

---

१ सांनिध्य. २ तत्व. ३ जात. ४ देव.

२७ लटिका तो प्रपंच एक हरि साच । हरिविण आहाच[1] सर्व इंद्रियें ॥ १ ॥ लटिकें तें मौन भ्रमाचें तें स्वप्न । हरिविण ध्यान नैश्वर्य अवघें[2] ॥ २ ॥ लटिकिया व्युत्पत्ति हरिविण करिती । हरि नाहीं चित्तीं तो शव जाणा ॥ ३ ॥ तुका ह्मणे हरि हें धरिसि निर्धारी । तरी तूं झडकरी जासी वैकुंठा ॥ ४ ॥

२८ प्रपंच परमार्थ संपादीन दोन्ही । एकही निदानीं न घडे त्यासी ॥ १ ॥ दोहीं पेंवावरी ठेवूं जातां हात । शेवटीं अपघात शरीराचा ॥ २ ॥ तुका ह्मणे तया दोहींकडे धका । शेवटीं तो नरकामाजीं पडे ॥ ३ ॥

२९ दीप न देखे अंधारा । आतां जतन हेंचि करा ॥ १ ॥ नारायण नारायण । गांठीं धन बळकट ॥ २ ॥ चिंतामणीपाशीं चिंता । तत्वता ही न येईल ॥ ३ ॥ तुका ह्मणे उभयलोकीं । हेंचि निकी[3] सामग्री ॥ ४ ॥

३० मढें झांकुनियां करिती पेरणी । कुण-

---

१ वरवर. २ नाशवंत. ३ नेटकी.

२७ लटिका तो प्रपंच एक हरि साच। हरिविण आंहाच[1] सर्व इंद्रियें ॥ १ ॥ लटिकें तें मौन भ्रमाचें तें स्वप्न। हरिविण ध्यान नैश्वर्य[2] अवघें ॥ २ ॥ लटिकिया व्युत्पत्ति हरिविण करिती। हरि नाहीं चित्तीं तो शव जाणा ॥ ३ ॥ तुका ह्मणे हरि हें धरिसि निर्धारी। तरी तूं झडकरी जासी वैकुंठा ॥ ४ ॥

२८ प्रपंच परमार्थ संपादीन दोन्ही। एकही निदानीं न घडे त्यासी ॥ १ ॥ दोहीं पेंवावरी ठेवूं जातां हात। शेवटीं अपघात शरीराचा ॥ २ ॥ तुका ह्मणे तया दोहींकडे धका। शेवटीं तो नरकामाजीं पडे ॥ ३ ॥

२९ दीप न देखे अंधारा। आतां जतन हेंचि करा ॥ १ ॥ नारायण नारायण। गांठीं धन बळकट ॥ २ ॥ चिंतामणीपाशीं चिंता। तत्वता ही न येईल ॥ ३ ॥ तुका ह्मणे उभयलोकीं। हेंचि निकी[3] सामग्री ॥ ४ ॥

३० मढें झांकुनियां करिती पेरणी। कुण-

१ वरवर. २ नाशवंत. ३ नेटकी.

बियाचे वांणी लवलाहें ॥ १ ॥ तयापरी करीं स्वहित आपुलें जयासी फावलें नरदेह ॥२॥ ओटीच्या परीस मुठींचें तें वाढ । यापरी कें-वाडें स्वहिताचें ॥ ३ ॥ नाहीं काळसत्ता आ-पुलिये हातीं । जाणते हे गुंती उगविती ॥४॥ तुका ह्मणे पाहें आपुली सूचना । करितो शा-हाणा मृत्युलोकीं ॥ ५ ॥

३१ देव सखा जरी । जग अवघें कृपा करी ॥ १ ॥ ऐसा असोनि अनुभव । कासाविस होती जीव ॥ २ ॥ देवाची जतन । त्यासी बाधूं न शके अन्न ॥ ३ ॥ तुका ह्मणे हरी । प्रऱ्हादासि यत्न करी ॥ ४ ॥

३२ वैष्णव मुनि विप्रांचा सन्मान । क-रावा आपण घेऊं नये ॥ १ ॥ प्रभु जाला त-री संसाराचा दास । विहित तयासी यांची सेवा ॥ २ ॥ तुका ह्मणे हे आशीर्वादें बळी । जाईल तो छळी नरका यांसी ॥ ३ ॥

३३ परिमळ ह्मणूं चोळूं नये फूल । खाऊं

---

१ तोटा, २ घोंटाळा, ३ छळणारा.

नये मूल आवडतें ॥ १ ॥ मोतियाचें पाणी चाखूं नये स्वाद । यंत्र भेदुनि नाद पाहूं नये ॥ २ ॥ कर्मफळ ह्मणुनी इच्छूं नये काम । तुका ह्मणे वर्म दावूं लोकां ॥ ३ ॥

३४ मारगीं बहुत । याचि गेले साधुसंत १ नका जाऊं आडरानें[1] । ऐसीं गर्जती पुराणें २ ओळखाळिल्या[2] वाटा । न लगे पुसाव्या धोपटा ॥ ३ ॥ झळकती पताका । गरुड टके ह्मणे तुका ॥ ४ ॥

३५ लेखी दुखण्यासमान । वेचला नारायणीं क्षण । उद्यांचें आजिच मरण । आणोनि ह्मणे हरि बोला ॥ १ ॥ नाहीं कांहीं पडों येत तुटी । जाणें तो आहे शेवटीं । लाभ विचारोनि पोटीं । होईं शेवटीं जागृत ॥ २ ॥ आहे तें उरे कटा । लावुनि चळ आपुला फाटा । पुरे हें न पुरे शेवटा । तरण्या बळकटा सदा वास ॥ ३ ॥ ह्मणोनि मोडावा कांटोळा[3] । अविद्यात्मक कोंवळा । होतील

---

१ वाटेनें. २ ओळखीच्या. ३ कंटाळा.

प्रबळा । आशा तृष्णा माया ॥ ४ ॥ क्षण या देहाच्या अंतीं । जड होउनि राहेल माती । परदेश ते परवर होती । चिळसविती नाकडोळे ॥ ५ ॥ जंव या नाहीं पातल्या विपत्ति । आयुष्य भविष्य आहे हातीं । लाभ विचारोनी गुंती । तुका ह्मणे अंतीं सर्व पिशुनें[1] ॥६॥

३६ चुकली ते वाट । पुढें सांपडवी नीट ॥ १ ॥ ह्मणवूनी गर्भवास । नेणती[2] ते हरीचे दास ॥ २ ॥ संचिताचा संग । काय जाणों पावे भंग ॥ ३ ॥ तुका ह्मणे दृष्टी । उघडि तों नव्हे कष्टी ॥ ४ ॥

३७ गर्भीं असतां बाळा । कोण पाळी त्याचा लळा ॥ १ ॥ कै[illegible] लाघवी सूत्रधारी। कृपाळुवा माझा हरी ॥ २ ॥ सर्प पिलीं वितांचि खाय । वांचलिया कोण माय ॥ ३ ॥ गगनीं लागला कोसेरा[3] । कोण पुरवी तेथें चारा ॥ ४ ॥ पोटीं पाषाणांचे जीव । कवण

१ दुष्ट. २ चुकविती. ३ आधार.

जीव त्याचा भाव ॥ ५ ॥ तुका ह्मणे निश्चळ[1] राहे । होईल तें सहज पाहें ॥ ६ ॥

३८ भावापुढें बळ । नाहीं कोणाचें सबळ ॥ १ ॥ करी देवावरी सत्ता । कोण त्याहूनि परता ॥ २ ॥ बैसे तेथें येती । न पाचारितां सर्व शक्ति ॥ ३ ॥ तुका ह्मणे राहे । तयाकडे कोण पाहे ॥ ४ ॥

३९ धांवे माते सोई । बाळ न विचारितां कांहीं ॥ १ ॥ मग त्याचें जाणें निकें[2] । अंग वोडवी कौतुकें ॥ २ ॥ नेणें सर्प दोरी । अंगीं भलतें हातीं धरी ॥ ३ ॥ तीविणें तें नेणें । आणीक कांहीं तुका ह्मणे ॥ ४ ॥

४० अगी देखोनियां सती । अंगीं रोमांच उठती ॥ १ ॥ हा तो नव्हेच उपदेश । सुख अंतरीं उल्हास ॥ २ ॥ वित्तगोतांकडे[3] । चित्त न घालीं न रडे ॥ ३ ॥ आठवूनि एका । उडी घाली ह्मणे तुका ॥ ४ ॥

४१ सकलगुणें संपन्न । एक देवाचें ल-

१ शांत. २ नेटकें. ३ आप्ताकडे.

क्षण ॥ १ ॥ वरकड कोठें कांहीं । एक आहे एक नाहीं ॥ २ ॥ षड्गुण ऐश्वर्य संपन्न । एक भगवंतीं जाण ॥ ३ ॥ तुका ह्मणे जें जें बोला । तें तें साजे[1] या विठ्ठला ॥ ४ ॥

४२ पाषाण देव पाषाण पायरी । पूजा एकावरी पाय ठेवी ॥ १ ॥ सार तो भाव सार तो भाव । अनुभवीं देव तेचि जाले ॥२॥ उदका भिन्न पालट काई । गंगा गोड येरां चवी काय नाहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे हें भावि-कांचें वर्म[2] । येरी धर्माधर्म विचारावे ॥ ४ ॥

४३ ऐसा कोणी नाहीं हें जया नावडे । कन्या पुत्र घोडे दारा धन ॥ १ ॥ निंब घेतें रोगी कवणीया सुखें । हरावया दुःखें व्याधि पीडा ॥ २ ॥ काय पळे सुख चोर लागे पाठीं । न घालावी काठी आड तया ॥ ३ ॥ जयाचें कारण तोचि जाणे करूं । नये कोणां वारूं आणिकासीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे तरी सांपडे निधान[3] । द्यावा ओंवाळून जीव बळी ॥५॥

१ शोभे. २ खूण. ३ ठेवा.

४४ नव्हे मतोळ्याचा वाण। नीच नव नारायण ॥ १ ॥ सुख उपजे श्रवणें। खरें टांकसाळी नाणें ॥ २ ॥ लाभ हातोहातीं। अधिक पुढतो पुढतीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे नेणों किती। पुरोनि उरले पुढती ॥ ४ ॥

४५ संकल्पासी अधिष्ठान। नारायण गोमटे ॥ १ ॥ अवघीयांचें पुरे कोडें। फिटे जड देहत्व ॥ २ ॥ उभय लोकीं उत्तम कीर्ती। देव चित्तीं राहिलीया ॥ ३ ॥ तुका ह्मणे जीव धायें। नये हाय जवळी ॥ ३ ॥

४६ दह्यांचिया अंगीं निघे ताक लोणी। एका मोलें दोन्ही मागों नये ॥ १ ॥ आकाशाचे पोटीं चंद्र तारागणें। दोहींशीं समान पाहों नये ॥ २ ॥ पृथ्वीच्या पोटीं हिरा गारगोटी। दोहोंसी संसाटी करूं नये ॥३॥ तुका ह्मणे तैसे संत आणि जन। दोहींसी समान भजूं नये ॥ ४ ॥

४७ जीव जीती जीवना संगें। मत्स्या म

१ चांगलें. २ कौतुक. ३ हंबरडा.

रण त्या वियोगें ॥ १ ॥ जया चित्तीं जैसा भाव । तया जवळी तैसा देव ॥ २ ॥ सकळां पढिये भानु । परि त्या कमळाचें जीवनु ॥३॥ तुका ह्मणे माता । वाहे तान्हयाची चिंता ॥४॥

४८ करिती तया वेवसाव आहे । येथें व्हारे साहे एकां एक ॥ १ ॥ गातां आइकतां समानचि घडे । लाभें लाभ जोडे विशेषता ॥ २ ॥ प्रेमाचें भरतें भातें घ्यावें अंगीं । नटे टाळी रंगी शूरत्वेंसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे बहु- जन्मांचें खंडण । होईल हा शीण निवारोनी ॥ ४ ॥

४९ भाग्यवंता हे परवडी । करिती जोडी जन्माची ॥ १ ॥ आपुल्याला लाहो भावें । जें ज्या व्हावें तें आहे ॥ २ ॥ इच्छाभोजना- चा दाता । नलगे चिंता करावी ॥ ३ ॥ तुका ह्मणे आल्या थान्या । वस्तु बन्या मोलाच्या४

५० बरें सावधान । राहावें समय राखोन ॥ १ ॥ नाहीं सारखिया वेळा । अवघ्या पा-

१ आवर्डीचा. २ निवारण. ३ प्रकार.

वतां अवकळा ॥ २ ॥ लाभ अथवा हानी । थोड्यामध्येंच भोवनी ॥ ३ ॥ तुका ह्मणे राखा । आपणा नाहीं तोचि वाखा[1] ॥ ४ ॥

५१ कस्तुरीचे अंगी मीनली[2] मृत्तिका । मग वेगळी कां येईल लेखूं ॥ १ ॥ तयापरि भेद नाहीं देवभक्ती । संदेहाच्या युक्ति सरों द्याव्या ॥ २ ॥ इंधनें तें आगी संयोगाच्या गुणें । सागरा दरुशनें वाहाळ तोचि ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझें साक्षीचें वचन । येथें तो कारण शुद्ध भाव ॥ ४ ॥

५२ धरितां इच्छा दुरी पळे । पाठीं सोहळे उदासा ॥ १ ॥ ह्मणवूनि असट[3] मन । नका खूण सांगतों ॥ २ ॥ अमिषापाशीं अवघें वर्म । सोस श्रम पाववी ॥ ३ ॥ तुका ह्मणे बीज न्यावें । तेथें यावें फळानें ॥ ४ ॥

५३ देह निरसे तरी । बोलावया नुरे उरी ॥ १ ॥ येर वाचेचें वाग्जाळ । अळंकारापुरतें बोल ॥ २ ॥ काचें तरी कढे । जाती ऐसें

१ दुःखें. २ भिसळली. ३ पानचट.

चित्त ओढे ॥ ३ ॥ विष्णुदास तुका । पूर्ण धनी जाणे चुका ॥ ४ ॥

५४ याची नांवें दोष । राहे अंतरीं किल्मिष[1] ॥ १ ॥ मना अंगीं पुण्य पाप । शुभ उत्तम संकल्प ॥ २ ॥ बिजाऐसीं फळें । उत्तम कां अमंगळें ॥ ३ ॥ तुका ह्मणे चित्त । शुद्ध करावें हें हित ॥ ४ ॥

५५ वेळोवेळां हेंचि सांगें । दान मागें जगासी ॥ १ ॥ विठ्ठल हे मंगळवाणी । घेऊं धणी पंगती ॥ २ ॥ वेंचतसे[2] पळें पळ । केलें बळ पाहिजे ॥ ३ ॥ तुका ह्मणे दुश्चित नका । राहों फुका नाड[3] हा ॥ ४ ॥

५६ ब्राह्मण तो याती अंत्यज असतां । मानावा तत्वतां निश्चयेसीं ॥ १ ॥ रामकृष्णनामें उच्चारी सरळें । आठवी सांवळें रूप मनीं ॥ २ ॥ शांति क्षमा दया अलंकार अंगीं । अभंग प्रसंगीं धैर्यवंत ॥३॥ तुका ह्मणे गेल्या षडूर्मी अंगें । सांडूनियां मग ब्रह्मचि तो ॥४॥

१ पाप. २ जातसें. ३ अडचण.

चित्त ओढे ॥ ३ ॥ विष्णुदास तुका । पूर्ण
धनी जाणे चुका ॥ ४ ॥

५४ याची नांवें दोष । राहे अंतरीं कि-
ल्मिष[1] ॥ १ ॥ मना अंगीं पुण्य पाप । शुभ उ-
त्तम संकल्प ॥ २ ॥ बिजाऐसीं फळें । उत्तम
कां अमंगळें ॥ ३ ॥ तुका ह्मणे चित्त । शुद्ध
करावें हें हित ॥ ४ ॥

५५ वेळोवेळां हेंचि सांगें । दान मागें ज-
गासी ॥ १ ॥ विठ्ठल हे मंगळवाणी । घेऊं
धणी पंगती ॥ २ ॥ वेंचतसे[2] पळें पळ । केलें
बळ पाहिजे ॥ ३ ॥ तुका ह्मणे दुश्चित नका ।
राहों फुका नाड[3] हा ॥ ४ ॥

५६ ब्राह्मण तो याती अंत्यज असतां । मा-
नावा तत्वतां निश्चयेसीं ॥ १ ॥ रामकृष्णना-
में उच्चारी सरळें । आठवी सांवळें रूप
मनीं ॥ २ ॥ शांति क्षमा दया अलंकार अंगीं ।
अभंग प्रसंगीं धैर्यवंत ॥३॥ तुका ह्मणे गेल्या
षड्डूर्मी अंगें । सांडूनियां मग ब्रह्मचि तो ॥४॥

---

१ पाप. २ जातसें. ३ अडचण.

५७ पुढें आतां कैंचा जन्म । ऐसा श्रम वारेसा ॥ १ ॥ सर्वथाही फिरों नये । ऐसी सोय लागलिया ॥ २ ॥ पांडुरंगा ऐसी नाव। तारू भाव असतां ॥ ३ ॥ तुका ह्मणे चुकती बापा । पुन्हा खेपा सकळां ॥ ४ ॥

५८ टाळ दिंडी हातीं । वैकुंठींचे ते सांगाती ॥ १ ॥ जाल तरी कोणी जा गा । करा सिंदोरी[1] ते वेगा ॥ जाती सादेवीत[2] । तेथें असों द्यावें चित्त ॥ ३ ॥ तुका ह्मणे बोल । जाती बोलत विठ्ठल ॥ ४ ॥

५९ तेलणीशीं रुसला वेडा । रागें कोरडें खातो भिडा ॥१॥ आपुलें हित आपण पाही । संकोच तो न धरी कांहीं ॥ २ ॥ नाडिलें लोकां टाकिला गोहो । बोडिलें डोकें सांडिला मोहो ॥ ३ ॥ शेजारणीच्या गेली रागें । कुतऱ्यांनीं घर भरिलें मागें ॥४ ॥ पिसा रागें भाजिलें घर । नागविलें तें नेणे फार ॥ ५ ॥ तुका ह्मणे यांच्या रागें । फेडिलें सांवळें देखिलें जगें ॥ ६ ॥

---

१ पाळ्या. २ भाकरी. ३ शब्द करीत.

६० आलें देवाचिया मना । तेथें कोणाचें चालेना ॥ १ ॥ हरिश्चंद्र ताराराणी । वाहे डोंबा[1] घरीं पाणी ॥ २ ॥ पांडवांचा साहाकारी । राज्यावरोनि केले दुरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे उगेचि राहा । होईल तें सहज पाहा ४

६१ मजुराचें पोट भरे । दाता उरे संचला ॥१॥ या रे या रे हातोहातीं । काम माती सारावी ॥ २ ॥ रोजकीर्दी होतो झाडा । रोकडाचि पर्वत ॥ ३ ॥ तुका ह्मणे खोल पाया। वेचों काया क्लेशेसीं ॥ ४ ॥

६२ शहाणपणें वेद मुका । गोपिका त्या ताकटी[2] ॥ १ ॥ कैसें येथें कैसें तेथें । शहाणे ते जाणती ॥२॥ यज्ञमुखें सोडी काढी । कोण गोडी बोरांची ॥ ३ ॥ तुका ह्मणे भावाविण । अवघा सीण[3] केला तो ॥ ४ ॥

६३ गुरुशिष्यपण । हें तों अधमलक्षण १ मूर्ती नारायण खरा । आप तैसाची दुसरा ॥ २ ॥ न कळतां दोरी साप । राहूं नेदावा

१ महाराघरीं. २ घामट. ३ श्रम.

तो कांप ॥ ३ ॥ तुका ह्मणे गुणदोषी । ऐसें न पडावें सोसीं ॥ ४ ॥

६४ सेजेचा एकांत अगीपाशीं कळे । झांकिलिया डोळे अधःपात[1] ॥ १ ॥ राहो अथवा मग जळो आगीमधीं । निवाड तो आधीं होऊनि गेला ॥ ५ ॥ भेणें झडपणी[2] नाहीं येथें दुजें । पादराधिटा ओझें हतियारें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज नाहीं जी भरंवसा । तोंवरि सहसा निवाड तो ॥ ४ ॥

६५ एक एका साह्य करूं । अवघे धरूं सुपंथ ॥ १ ॥ कोण जाणे कैसी परी । पुढें उ[3]री ठेवितां ॥ २ ॥ अवघे धन्य होऊं आतां । स्मरवितां स्मरण ॥ ३ ॥ तुका ह्मणे अवघी जोडी । ते आवडी चरणांची ॥ ४ ॥

६६ सोन्याचे पर्वत करवती पाषाण । अवघे रानोरान कल्पतरु ॥ १ ॥ परि या दुर्लभ विठोबाचे पाय । तेथें हे उपाय न सरती ॥ २ ॥ अमृतें सागर भरवती गंगा । ह्मणवे-

१ पतन. २ झपाटणें. ३ बाकी.

ल उगा राहे काळा ॥ ३ ॥ भूत भविष्य क-
ळों येईल वर्तमान । करवती प्रसन्न रिद्धि-
सिद्धि ॥ ४ ॥ स्थान मान कळों येती योग-
मुद्रा । नेववेल वारा ब्रह्मांडासी ॥ ५ ॥ तुका
ह्मणे मोक्ष राहे ऐलीकडे । इतर बापुडें काय
तेथें ॥ ६ ॥

६७ नारे तरि काय [2]नुजेडे कोंबडें । करू-
नियां वेडें आग्रो दावी ॥ १ ॥ आइत्याचे सा
हे फुकाचा विभाग । विक्षेपानें जग छी थू
करी ॥ २ ॥ नेमून ठेविला कर्त्यानें काळ ।
नव्हायेसें बळ करूं पुढें ॥ ३ ॥ तुका ह्मणे दे-
व साहे जाल्यावरी । असांगाचि करी सर्व
सांग ॥ ४ ॥

६८ अधिकार तैसा दावियेला मार्ग । चा
लतां हें मग कळों येतें ॥ १ ॥ जाळूं नये ना-
व पाव[3]लेनि पार । मागील आधार बहुतांचा
॥ २ ॥ तुका ह्मणे रोग वैद्याचे अंगीं । नाहीं
करी जगीं उपकार ॥ ३ ॥

---

१ एकीकडे. २ उजेडे. ३ उतरल्यावर.

६९ देहबुद्धि वसे लोभ जया चित्तीं । आपुलें जाणतीं पॅरावें जे ॥ १ ॥ तयासी चालतां पाहिजे सिदोरी । दुःख पावे करी असत्य तो ॥ २ ॥ तुका ह्मणे धर्म रक्षाया कारणें । छाया इच्छी उन्हें तापला तो ॥ ३ ॥

७० अवघे देव साध । परी या अवगुणांचा बाध ॥ १ ॥ ह्मणवूनी नव्हे सरी । राहे एका एक दुरी ॥ २ ॥ ऊंस कांदा एक आळां । स्वाद पाहतां निराळा ॥ ३ ॥ तुका ह्मणे नव्हे सॅरी । विष अमृताची परी ॥ ४ ॥

७१ करी संध्यास्नान । वारी खाउनियां अन्न ॥ १ ॥ तया नाहीं लाभहानी । आदा वेंचाचिये मानीं ॥ २ ॥ मजुराचें धन । विळा दोरचि जतन ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं । अधीरासी देव कांहीं ॥ ४ ॥

७२ अवगुण तो कोणीं नाहीं प्रॅतिष्ठिले । मागें होत आले शिष्टाचार ॥ १ ॥ दुर्बळाच्या नांवें पिटावा डांगोरा । हा तो नव्हे ब-

१ परसें. २ बरोबरी. ३ स्थापिलें.

रा सत्यवाद ॥ २ ॥ मद्य आणि मधु[1] एकाराशी नांवें । तरि कां तें खावें आधारें त्या ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझा उच्छिष्ट प्रसाद । निवडी भेदाभेद वृष्टिन्यायें ॥ ४ ॥

७३ न सांगावें वर्म । जनीं असो द्यावा भ्रम ॥ १ ॥ उगीच लागतील पाठीं । होती रितींच हिंपुटी[2] ॥ २ ॥ शिकविल्या गोष्टी । शिकोनि न धरिती पोटीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे शीण । होईल अनुभवाविण ॥ ४ ॥

७४ नसावें ओशाळ । मग मानिती सकळ ॥ १ ॥ जाय तेथें पावे मान । चाले बोलिलें वचन ॥ २ ॥ राहों नेदी बाकी । दान ज्याचें त्यासी टाकी ॥ ३ ॥ हेवा वाटे जना । तुका ह्मणे साठीं गुणां ॥ ४ ॥

७५ नसतां अधिकार । उपदेशासी बलात्कार । तरि ते केले हो चार । माकडा आणि गारोडी ॥ १ ॥ धन धान्य राज्य बोल । वृथा रंजवणें[3] फोल । नाहीं तेथें ओल । बीज

---

१ अमृत. २ निराशा. ३ खुशामत.

वेंची मूर्ख तो ॥ २ ॥ नये बांधों गांठीं । पद-रा आणी ऐसी तुटी । असोन कसोटी । शि-ष्टाचार अनुभव ॥ ३ ॥ उपदेशी तुका । मेघ-वृष्टीनें आइका । संकल्पासी धोका । सहज तें उत्तम ॥ ४ ॥

७६ मन गुंतलें लुलयां । जाय धांवोनी त्या ठायां ॥ १ ॥ मागें परतवी तो बळी । शूर एक भूमंडळीं ॥ २ ॥ येऊनियां घाली घाला । नेणों काय होईल तुला ॥ ३ ॥ तुका ह्मणे येणें । बहु नाडिले[2] शहाणे ॥ ४ ॥

७७ न कळतां कोणीं मोडियेलें[3] व्रत । त-या प्रायश्चित्त चाले कांहीं ॥ १ ॥ जाणतिया वज्रलेप जालें थोर । तयांस अघोर कुंभपा-क ॥ २ ॥ आतां जरी कोणी नाइके सांगतां । नया शिकवितां तेंचि पाप ॥ ३ ॥ काय करूं मज देवें बोलविलें । माझें खोळंबलें काय होतें ॥ ४ ॥ तुका ह्मणे जना पाहा विचारूनी सुख वाटे मनीं तेंचि करा ॥ ५ ॥

---

१ पेरीं. २ लुटलें. ३ अंगिलें.

७८ ढेंकणासी बाज गड[1] । उतर चढ केवढी ॥ १ ॥ होता तैसा कळों भाव । आला वाव अंतरींचा ॥ २ ॥ बोरामध्यें बसे अळी । अठोळीच भोंवतीं ॥ ३ ॥ पोटासाठीं वेंची चणे । राजा ह्मणे तोंडें मी ॥ ४ ॥ बेडकानें चिखल खावा । काय ठावा सागर[2] ॥ ५ ॥ तुका ह्मणे ऐसें आहे । काय पाहे त्यांत तें ५

७९ पर्जन्यें पडावें आपुल्या स्वभावें । आपुलाल्या दैवें पिके भूमि ॥ १ ॥ बीज तेंचि फळ येईल शेवटीं । लाभहानि तुटी[3] ज्याची तया ॥ २ ॥ दीपाचिये अंगीं नाहीं दुजा भाव । धणी चोर साव सारिखेचि ॥ ३ ॥ काउळें ढोंपरा कंकर तित्तिरा । राजहंस चारा मुक्ताफळें ॥ ४ ॥ तुका ह्मणे येथें आवडी कारण । पिकला नारायण जयां तैसा५

८० दुर्बळा वाणीच्या एक दोनि सिद्धि । सदैवा समाधि विश्वरूपीं ॥ १ ॥ काय त्याचें वांयां गेलें तें एक । सदा प्रेमसुख सर्वकाळ

१ किल्ला. २ समुद्र. ३ तोटा.

॥ २ ॥ तीर्थं देव दुरी तया भाग्यहीना । वि-
श्व सज्जना दुमदुमिलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे ए-
क वाहाती मोळिया । भाग्यें आगळिया घ-
रा येती ॥ ४ ॥

८१ वैद्य वांचविती जीवा । तरी कोण
ध्यातें[1] देवा ॥ १ ॥ काय जाणों कैसी परी ।
प्रारब्ध तें ठेवी उरी ॥ २ ॥ अंगीं दैवत सं-
चरे । मग तेथें काय उरे ॥ ३ ॥ नवसें कन्या
पुत्र होती । तरि कां करणें लागे पती ॥ ४ ॥
जाणे हा विचार । स्वामी तुकायाचा दा-
तार ॥ ५ ॥

८२ कांहीं न मागें कोणांसी । तोचि आ-
वडे देवासी ॥ १ ॥ देव तयासी ह्मणावें ।
त्याचे चरणीं लीन व्हावें ॥ २ ॥ भूतदया
ज्याचे मनीं । त्याचे घरीं चक्रपाणी ॥ ३ ॥
नाहीं नाहीं त्या समान[2] । तुका ह्मणे मी
जमान ॥ ४ ॥

८३ कासिया पाषाण[3] पूजिती पितळ ।

---

१ भजतें. २ सारखें. ३ दगड.

अष्टधातूखळ भावहीना ॥ १ ॥ भावची कारण भावची कारण । मोक्षाचें साधन बोलियलें ॥ २ ॥ काय करील जपमाळा कंठमाळा । करिशी वेळोवेळां विषयजप ॥ ३ ॥ काय करिशील पंडित हे वाणी । अक्षराभिमानी थोर होय ॥ ४ ॥ काय करिशील कुशल गायन । अंतरीं मळीण कुबुद्धि ते ॥ ५ ॥ तुका ह्मणे भाव नाहीं करी सेवा । तेणें काय देवा योग्य होशी ॥ ६ ॥

८४ दिली चाले वाचा । क्षय मागिलया तपाचा ॥ १ ॥ रिद्धि सिद्धि येती घरा । त्याचा करिती पसारा ॥ २ ॥ मानदंभांसाठीं । पडे देवासवें तुटी ॥ ३ ॥ तुका ह्मणे मेवा । कैंचा वेठीच्या निर्दैवा ॥ ४ ॥

८५ बोलावें तें धर्मा मिळे । बरे डोळे उघडूनी ॥ १ ॥ काशासाठीं खावें शेण । जेणें जन थुंकतें ॥ २ ॥ दुजें ऐसें काय बळी । जे या जाळी अग्नीसि ॥ ३ ॥ तुका ह्मणे शूर रणीं । गांढे मनीं बुरबुरी ॥ ४ ॥

---

१ चांगलें. २ बिगाराच्या. ३ दुर्बळ.

ं आणितां त्या गती । हंस काउळे न
॥ १ ॥ सांडा सांडा रे मठारे । येथें
सवें धुरे ॥ २ ॥ नाकेंविण मोतीं । उ-
रें फजिती । ॥ ३ ॥ हुकुमदाज तुका ।
कोणी फुंदों नका ॥ ४ ॥

वंचुनिया पिंड । माता दान करी लं-
॥ जैसी याची चाली वरी । तैसा
ञा दुरी ॥ २ ॥ मेला राखे दिस । ज्या-
जालें वोर्स ॥३॥ तुका ह्मणे देवा। लोभें
चि सेवा ॥ ४ ॥

धनवंतालागीं । सर्वमान्यता आहे ज-
॥ माता पिता बंधु जन । सर्व मा-
वचन ॥ २ ॥ जंव मोठा चाले धंदा ।
हेणी ह्मणे दादा ॥ ३ ॥ सदा शृंगारभू-
कांता लवे बहुमानें ॥ ४ ॥ तुका ह्मणे
भाग्य अशाश्वत जाण ॥ ५ ॥

मायबापें केवळ काशी । तेणें नवजा-
र्थासी ॥ १ ॥ पुंडलीकें काय केलें ।

---

डा. २ बंदा. ३ टाकूनिया. ४ ओसाड.

परब्रह्म उभें ठेलें ॥ २ ॥ तैसा होईं सावधान। हृदयीं धरीं नारायण ॥ ३ ॥ तुका ह्मणे मायबापें । अवघीं देवाचीं स्वरूपें ॥ ४ ॥

९० धाकुट्याचे मुखीं घांस घाली माता। वरी करी सत्ता शाहाणीयां ॥ १ ॥ ऐसें जाणपणें पडिलें अंतर। वाढे तों तों थोर अंतराय ॥ २ ॥ दोन्ही उभयतां आपणची व्यालीं । आवडीची चाली भिन्न भिन्न ॥३॥ तुका ह्मणे अंगापासूनि निराळें । निवडिलें बळें रडतें स्तनीं ॥ ४ ॥

९१ साधूनी बचनाग खाती तोळा तोळा। आणिकातें डोळां न पाहवे ॥ १ ॥ साधूनी भुजंग धरितील हातीं । आणिकें कांपती देखोनियां ॥ २ ॥ असाध्य तें साध्य करितां सायास । कारण अभ्यास तुका ह्मणे ॥ ३ ॥

९२ हित जाणें चित्त । कळों येतसे उचित ॥ १ ॥ परिहार ते संपादणी । सत्य कारण कारणीं ॥ २ ॥ वरदळ तें नुतरे कसीं । आ-

---

१ समाधान. २ प्रसविली. ३ प्रकार.

गीमध्यें तें रसीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे करूनी ख-
रें । ठेवितां तें पुढें बरें ॥ ४ ॥

९३ उचिताचा काळ । साधावया युक्ति-
बळ । आपलें सकळ । ते प्रसंगीं पाहिजे ॥१॥
नेम नाहीं लाभ हानि । अवचित घडती दो-
नी । विचारूनि मनीं । पाहिजे तें प्रयोजावें२
जाळ जाळा काळें । करपों नेदावें आगळें ।
जेवितां वेगळें । ज्याचें त्याचें तेथें शोभे ॥३॥
पाळी नांगर पाभारीं । तन निवडूनि सोक-
री । तुका ह्मणे थरी । सेज जमा सेवटीं ॥४॥

९४ करणें न करणें वारलें जेथें । जातों
तेणें पंथें संतसंगें ॥ १ ॥ संतीं हें पाहिलें
लाविलें निशाण । ते खुणा पाहोन गर्जे ना-
म ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी चला याची वाटे ।
भरंवशानें भेटे पांडुरंग ॥ ३ ॥

९५ मारूं नये सर्प संतांचिया दृष्टीं । हो-
तील ते कष्टी व्यायकपणें ॥ १ ॥ एक सूत्र
जीवशिवीं आइक्यता । रोमें उपडितां अंग

१ रस. २ योजावें. ३ केस.

कांपे ॥ २ ॥ नाहीं साहों येत दुःखाची ते जाती । परपीडा भूतीं साम्य जालें ॥३॥ तुका ह्मणे दिला नीतीचा संकेत । पूजा नावें चित्त सुखी तेणें ॥ ४ ॥

९६ क्षुधेलिया अन्न । द्यावें पात्र न विचारून ॥ १ ॥ धर्म आहे वर्मी अंगीं । कळलें पाहिजे प्रसंगीं ॥२॥ द्रव्य आणि कन्या । येथें कुळ कर्म शोधण्या ॥ ३ ॥ तुका ह्मणे पुण्य गाठीं । तरिच उचितासी भेटी ॥ ४ ॥

९७ सर्वांभूतीं द्यावें अन्न । द्रव्य पात्र विचारोन । उपतिष्ठे कारण । तेथें बीज पेरीजे ॥ १ ॥ पुण्य करितां होय पाप । दुग्ध पाजोनि पोशिला साप । करोनि अघोराचा जप । दुःख विकत घेतलें ॥ २ ॥ भूमी पाहातां नाहीं वेगळी । माळ बेरड एक काळी। उत्तम निराळी । मध्यम ते कनिष्ठ ॥ ३ ॥ ह्मणोनि विवेकें । कांहीं करणें तें निकें । तुका ह्मणे फिकें । रुची नेदी मिष्टान्न ॥ ४ ॥

---

१ कूण. २ दूध. ३ वाईट.

९८ कवण दिस येइल कैसा । न कळे संपत्तीचा भरंवसा ॥ १ ॥ चौदा चौकडिया लंकापति । त्याची कोण जाली गति ॥ २ ॥ लंकेसारिखें भुवन । त्याचें त्यासी पारखें जाण ॥ ३ ॥ तेहतीस कोटी बांदवेंडी[1] । राज्य जातां न लगे घडी ॥ ४ ॥ ऐसें अहंतेनें नाडिले । तुका ह्मणे वांयां गेले ॥ ५ ॥

९९ लंकेमाजीं घरें किती तीं आइका । सांगतसे संख्या जैसी तैसी ॥ १ ॥ पांच लक्ष घरें पाषाणांचीं जेथें । सात लक्ष तेथें विटेबंदी ॥ २ ॥ कोटि घरें जेथें कांशा आणि तांब्याचीं । शुद्ध कांचनाचीं[2] सप्त कोटी ॥ ३ ॥ तुका ह्मणे ज्याची संपदा एवढी । सांगातें कवडी गेली नाहीं ॥ ४ ॥

१०० पायरवें अन्न । मग करी क्षीदक्षीण ॥ १ ॥ ऐसे होती घातपात । लाभेंविण संगें थीत ॥ २ ॥ जन्माची जोडी । वांताहात[3] एके घडी ॥ ३ ॥ तुका ह्मणे शंका । हित आड या लौकिका ॥ ४ ॥

---

१ बांधव. २ सोन्याचीं. ३ नाश.

१०१ पुढें जेणें लाभ घडे। तेंचि वेडे नाशिती ॥ १ ॥ येवढी कोठें नागवण। अंधारून विष द्यावें ॥२॥ होणारासी मिळे बुद्धि। नेदी शुद्धी धरूं तें ॥ ३ ॥ तुका ह्मणे जना सांग। दावी रंग आणीक ॥ ४ ॥

१०२ ग्रंथाचे ते अर्थ नेणषी खळ। बहु अनर्गळ जाले विषयीं ॥१॥ नाहीं भेद ह्मणुन भलतेंचि आचरे। मोकळा विचरे मनासवें ॥ २ ॥ तुका ह्मणे विषा नांव तें अमृत। पापपुण्या भीत नाहीं नष्ट ॥ ३ ॥

१०३ चालती आड वाटा। आणिकां दाविती जे नीटा ॥ १ ॥ न मनीं तयांचे उपकार। नाहीं जोडा तो गव्हार ॥ २ ॥ विष सेवूनि वारी मागें। प्राण जातां जेणें संगें ॥ ३ ॥ बुडतां हाक मारी। ठाव नाहीं आणिकां वारी ॥ ४ ॥ तुका ह्मणे न करीं हिंका। गुण घेऊन अवगुण टाका ॥ ५ ॥

१०४ जरी आलें राज्य मोळिविक्या हातां।

---

१ दुर्जन. २ अनावर. ३ रानटी. ४ हट्ट.

तरी तो मागुता व्यवसायी[1] ॥ १ ॥ तृष्णेचीं मजुरें नेणती विसांवा । वाढे हांव हांवा काम कामीं ॥ २ ॥ वैभवाचीं सुखें नातळतां अंगा । चिंता करी भोगा विघ्न जाळी ॥ ३ ॥ तुका ह्मणे वाहे मरणाचें भय । रक्षण उपाय करूनि असे ॥ ४ ॥

१०५ अभिमानाचें तोंड काळें । दावी बळें अंधार ॥ १ ॥ लाभ न्यावा हातोहातीं । तोंडीं माती पाडोनि ॥ २ ॥ लागलीसे पाठी लाज । जालें काज नासाया ॥३॥ तुका ह्मणे कुश्चळ[2] मनीं । विटंबनीं पडिलीं तीं ॥ ४ ॥

१०६ चातुर्याच्या अनंत कळा । सत्या विरळा जाणता ॥ १ ॥ हांसत्यासवें हांसे जन । रडतां भिन्न पालटे ॥ २ ॥ जळो ऐसे वांजट बोल । गुणां मोल भूस मिथ्या ॥ ३ ॥ तुका ह्मणे आंधळ्याऐसें । वोंगळ पिसें कौतुक ॥४॥

१०७ गेली वीरसरी । मग त्यासी रांड मारी ॥ १ ॥ मग नये तैसी सत्ता । गेली मा-

१ संसारतापग्रस्त. २ कुशंका घेणारा.

१११ या रे हरिदासांनो जिंको कळिकाळा । आमुचिया बळा पुढें किती बापुडें ॥१॥ रंग सुरंग घमंडी नाना छंदें । हास्यविनोदें मनाचिये आवडी ॥२॥ येणें तेणें प्रकारें बहुतां सुख जोडे । पूजन तें घडे नारायणा अंतरीं ३ वांकड्या माना बोल बोलावे आर्ष[1] । येईल तो त्यांस छंद पढीये गोविंदा ॥ ४ ॥ आपुलाले आवडी एकापुढें एक नटा । नाहीं थोर मोठा लहान या प्रसंगीं ॥ ५ ॥ तुका ह्मणे येथें प्रेम भंगू नये कोणीं । देव भक्त दोन्ही निवडितां पातक ॥ ६ ॥

११२ वचनांचे मांडे[3] दावावे प्रकार । काय त्या साचार कौतुकाचे ॥ १ ॥ जातां घरा मागें उरों नेणें खंती । मिळाल्या बहुती फांकलियां[3] ॥ २ ॥ उदयींच अस्त उदयो संपादला । कल्पनेचा केला जागेपणें ॥ ३ ॥ साणोनियां गेला हांडोरियां पोरां । सावध इतरां करूनी तुका ॥ ४ ॥

---

1 वेडगळपणाचे. २ इच्छिलेलें. ३ दूर गेल्या.

गील आणितां ॥ २ ॥ भंगलिया चित्ता । न ये काशानें सांधितां ॥ ३ ॥ तुका ह्मणे धीर । भंगलिया पाठीं कीर ॥ ४ ॥

१०८ खोट्याचा विकरा । येथें नव्हे कांच हिरा ॥ १ ॥ काय दावायाचें काम । उगाच वाढवावा श्रम ॥ २ ॥ परीक्षकाविण । मिरवों जाणा तें तें हीणें[1] ॥ ३ ॥ तुका पायां पडे । वाद पुरे हे झगडे ॥ ४ ॥

१०९ सर्वथाही खोटा संग । उपजे भंग मनासी ॥ १ ॥ बहु रंगें भरलें जन । संपन्नचि अवगुणीं ॥ २ ॥ सेविलिया निष्कामबुद्धि । मदें शुद्धी सांडावी ॥ ३ ॥ त्रासोनियां बोले तुका । आतां लोकां दंडवत ॥ ४ ॥

११० भोगें[2] घडे त्याग । त्यागें अंगा येती भोग ॥ १ ॥ ऐसें उफराटें वर्म । धर्मा अंगींच अधर्म ॥ २ ॥ देव अंतरे तें पाप । खोटे उगवा संकल्प ॥ ३ ॥ तुका ह्मणे भीड खोटी । लाभ विचारावा पोटीं ॥ ४ ॥

---

१ कमी मोलाचें. २ इच्छा पूर्ण करणें.

१११ या रे हरिदासांनो जिंकों कळिकाळा । आमुच्चिया बळा पुढें किती बापुडें ॥१॥ रंग सुरंग घमंडी नाना छंदें । हास्यविनोदें मनाचिये आवडी ॥२॥ येणें तेणें प्रकारें बहुतां सुख जोडे । पूजन तें घडे नारायणा अंतरीं ३ वांकड्या माना बोल बोलावे आर्ष[1] । येईल तो त्यांस छंद पढीये गोविंदा ॥ ४ ॥ आपुलाले आवडी एकापुढें एक नटा । नाहीं थोर मोठा लहान या प्रसंगीं ॥ ५ ॥ तुका ह्मणे येथें प्रेम भंगू नये कोणीं । देव भक्त दोन्ही निवडितां पातक ॥ ६ ॥

११२ वचनांचे मांडे[1] दावावे प्रकार । काय त्या साचार कौतुकाचे ॥ १ ॥ जातां घरा मागें उरों नेणें खंती । मिळाल्या बहुती फांकलियां[3] ॥ २ ॥ उदयींच अस्त उदयो संपादला । कल्पनेचा केला जागेपणें ॥ ३ ॥ साणोनियां गेला हांडोरियां पोरां । सावध इतरां करूनी तुका ॥ ४ ॥

---

१ वेडगळपणाचे. २ इच्छिलेलें. ३ दूर गेल्या.

११३ न पालटे जाती[1] जीवाचिये साठीं। बाहे तेंचि पोटीं दावी वरी ॥ १ ॥ अंतरीं सबाहीं[2] सारिखाचि रंग। वीट आणि भंग नाहीं रसा ॥ २ ॥ घणाचिया घायें पोटीं शिरे हिरा। सांडूं नेणे धीरा आपुलिया ॥३॥ तुका ह्मणे कढे करावी शीतळ। ऐसें जातिबळ चंदनाचें ॥ ४ ॥

११४ प्राक्तनाच्या योगें आळशावरी गंगा। स्नान काय जगा करूं नये ॥ १ ॥ उभी कामधेनु मांगाचे अंगणीं। तिसी काय ब्राह्मणीं वंदूं नये ॥ २ ॥ कोडियाचे हातें परिसें होय सोनें। अपवित्र ह्मणोन घेऊं नये ॥ ३ ॥ यातिहीन[3] जाला गावींचा मोकासी[4]। त्याच्या वचनासी मानूं नये ॥ ४ ॥ भावारूढ तुका मुद्रा विठोबाची। न मनी तयाचीं तोंडें काळीं ॥ ५ ॥

११५ शीतळ तें शीतळाहुनी। पायवणी चरणींचें ॥ १ ॥ सेवन हें शिरसा धरीं। अं-

---

१ मूळची जात. २ वरतीं. ३ नीच. ४ कुळकर्णी.

तरीं ही वरदळा[1] ॥ २ ॥ अवघेंचि नासी पाप । तीर्थ बाप माझ्याचें ॥ ३ ॥ बैसोनियां तुका तळीं । त्या कल्लोळीं डौरला[2] ॥ ४ ॥

११६ विष पोटीं सर्पा । जन भीत तया दर्पा ॥ १ ॥ पंच भूतें नाहीं भिन्न । गुण दुःख देती शीण ॥ २ ॥ चंदन प्रिय वासें । आवडती जाती ऐसें ॥ ३ ॥ तुका ह्मणे दाणा । कुचरें[3] मिळों नये अन्ना ॥ ४ ॥

११७ कारणापें असतां दृष्टी । शंका पोटीं उपजेना ॥१॥ शूर मिरवे रणांगणीं । मरणींच संतोष ॥ २ ॥ पाहिजे तो कळवळा । मग बळा काय उणें ॥ ३ ॥ तुका ह्मणे उदारपणें । काय उणें मनाचें ॥ ४ ॥

११८ झरा लागला सुखाचा । ऐसा मापारी कईचा ॥ १ ॥ जो हें माप तोंडें धरी । सळी जाली ते आंवरी ॥ २ ॥ जाले बहु काळ । कोणा नाहीं ऐसें बळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे तळ । नाहीं पाहेसा सकळ ॥ ४ ॥

---

१ बाह्यरंग. २ शोभला. ३ खवट.

११९ जायाचें अंगुलें लेत[1]
शोभा नेदी जन हांसविलें ॥
ताक कांडितां भूस । साध्य
ती वायां ॥ २ ॥ तुका ह्मणे न
डवल । भिकेचें तें फोल बीज
१२० समर्थाचें केलें । को
डिलें ॥ १ ॥ वायां करावी ते
सोसं[3] पुरे ॥ २ ॥ ठेविला जो
ला तैसा खावा ॥ ३ ॥ ज्यानें
भुंके तयाची फजिती ॥ ४ ॥
टी । वाळे जाले शूळ पोटीं ।
१२१ इच्छिलें ते शकुनवं
तात्काळ ॥ १ ॥ क्षीरीं नीरा
वरावरी विठ्ठल ॥ २ ॥ भाग्य
ळ । अंतर मळमूत्राचें ॥ ३ ॥
चित कुडें । तें बापुडें करीत
१२२ वैभवाचे धणी सक
सत्यभावें चित्त अर्पिलें तें ॥

१ धारण करतां. २ ज्ञान. ३ ह

देव आपणावेगळें । भावाचिया बळें ठायांठाव ॥ २ ॥ जाणोनि नेणोनि अंगा आली दशा । मग होय इच्छा आपणास ॥ ३ ॥ तुका ह्मणे बरें धाकट्याचें जिणें । माता स्तनपानें वाढविते ॥ ४ ॥

१२३ जें जें व्हावें संकल्पें[1] । तेंचि पुण्य होय पाप ॥ १ कारण तें मनापाशीं । मेळविल्या मिळे राशी ॥ २ ॥ सांडी मांडी हाली चाली । राहे तरि भली बोली ॥३॥ तुका ह्मणे सार । नांव जीवनाचें सागर ॥ ४ ॥

१२४ आणिकांच्या घातें[2] मानितां संतोष । सुखदुःख दोष अंगीं लागे ॥ १ ॥ ऐसे मनीं वाहूं न येती संकल्प । करूं नये पाप भांडवल ॥ २ ॥ किल्मिषाची[3] चिंत्तीं राहातां कांचणी[4] । अग्नींत टाकुनी ठाव जाळी ॥ ३ ॥ तुका ह्मणे कोपें घडे पुण्यक्षय । होणार तें होय प्रारब्धींचें ॥ ४ ॥

१२५ मथनासाठीं धर्माधर्म । त्याचें वर्म

१ शंचितें. २ नाशनें. ३ पापाची. काळजी.

नवनीत ॥ १ ॥ तैंचि तें घाटूं[1] नये । आलें जाय नासूनि ॥२ ॥ सांभाळावें बरावर । वर्म दूर नवजावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे धालें पोट । मग बोट चाटणी ॥ ४ ॥

१२६ वदे साक्षत्वेंसीं वाणी । नारायणीं मिश्रित ॥१॥ नलगे कांहीं चांचपावें । जातों भावें पेरीत ॥ २ ॥ भांडार त्या दातियाचें मी कैंचें ये ठायीं ॥ ३ ॥ सादावीत[3] गेला तुका । येथें एकाएकीं तो ॥ ४ ॥

१२७ फळ पिकें देंठीं । निमित्य वारियाची भेटी ॥ १ ॥ हा तो अनुभव रोकडा । कळों येतो खरा कुडा ॥ २ ॥ तोडिलिया बळें । वायां जाती कांचीं[4] फळें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मन । तेथें सकळ कारण ॥ ४ ॥

१२८ फळ देंठींहून झडे । मग मागुतें न जोडे ॥ १ ॥ ह्मणउनि तांतडी खोटी । कारण उचिताचे पोटीं ॥ २ ॥ पुढें चढे हात । त्याग मागिला उचित ॥ ३ ॥ तुका ह्मणे रणीं । नये पाहों परतोनि ॥ ४ ॥

---

१ वाटूं. २ भरले. ३ वावाज करीत. ४ कच्चीं.

१२९ अवघी मिथ्या आटी[1] । राम नाहीं तंव कंठीं ॥ १ ॥ सावधान सावधान । उगवीं संकल्पीं हें मन । सांडिलें तें मांडे । आग्रह उरल्या काळ दंडे ॥ ३ ॥ तुका ह्मणे आलें भागा[2] । देउनि चित्तीं पांडुरंगा ॥ ४ ॥

१३० नये इच्छूं सेवा स्वइच्छा जगाची । अवज्ञा देवाची घडे तेणें ॥ १ ॥ देहाचा निग्रही त्याचें तो सांभाळी। मग नये कळि अंगावरी ॥ २ ॥ आपलिया इच्छा माता सेवा करी । न बाधी ते थोरी येणें क्षोभें ॥ ३ ॥ तुका ह्मणे सांडा देखीचे[3] दिमाख। मोडशीचें दुःख गांड फाडी ॥ ४ ॥

१३१ अंतरींचें गोड । राहे आवडीचें कोड ॥ १ ॥ संघष्टणें येती अंगा । गुणदोष मनोभंगा ॥ २ ॥ उचिताच्या कळा । नाहीं कळत सकळा ॥ ३ ॥ तुका ह्मणे अभावना[4] । भावीं मूळ तें पतना ॥ ४ ॥

१३२ धनवंता घरीं । करी धनचि चाक-

१ खटाटोप. २ भोगा. ३ बाहेरचें ४ भाव नाहीं असा.

री ॥ १ ॥ होय बैसल्या व्यापार । नलगे स
[1]डावेंचि घर ॥ २ ॥ रानीं वनीं दीपीं[2] । अ
तीं होतीं सोपीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे मोल ।
तां कांहीं नव्हे खोल ॥ ४ ॥

१३३ कल्तरूअंगीं इच्छिलें तें फळ । अभ
गी दुर्बळ भावें सिद्धी ॥१॥ धन्य त्या जात
धन्य त्या जाती । नारायण चित्तीं सांठविल
॥ २ ॥ बीजाऐसा द्यावा उदकें अंकुर । गु
णाचे प्रकार ज्याचे तया ॥ ३ ॥ तुका ह्मणे
कळे [3]पारखिया हिरा । ओझें पाठी खरा चं-
दनाचे ॥ ४ ॥

१३४ जळो अगी पडो खाण । नारायण
भोगितां ॥ १ ॥ ऐसी ज्याची वदे वाणी ।
नारायणीं ते पावे ॥ २ ॥ भोजनकाळीं करि-
तां धंदा । ह्मणा गोविंदा पावलें ॥ ३ ॥ तुका
ह्मणे नलगे मोल[4] । देवा बोल आवडती ॥४॥

१३५ नाहीं लोपों येत गुण । वेधी आणि-
कां चंदन ॥ १ ॥ न सांगतां पडे ताळा । रूप

१ सोडणें. २ घरीं. ३ परिक्षक. ४ किंमत.

ं सकळां ॥ २ ॥ सारविलें वरी । आ-
ते क्षणभरीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे वोहळें[2] ।
ाच्या ऐसें व्हावें ॥ ४ ॥

६ कल्पतरूखालीं । फळें येती मागी-
॥ १ ॥ येथें बैसल्याचा भाव । विचारू-
ले ठाव ॥ २ ॥ द्यावें हें उत्तर । येतो
ाचा फेर ॥ ३ ॥ तुका ह्मणे मनीं । आ-
ाचि लाभ हानि ॥ ४ ॥

७ चोराचिया धुडका मनीं । वसे ध्या-
छन ॥ १ ॥ ऐशा आह्मीं करणें काय ।
न्यायें पर्जन्य ॥ २ ॥ ज्याच्या बैसे ख-
। ते चुरचुरी दुखवूनि ॥ ३ ॥ तुका
ाची खोडी । त्याची जोडी त्या पीडी

८ कुंभ[3] अवघा एक आवा । पाकीं ए-
डावा ॥ १ ॥ ऐसे भिन्न साटे । केले
नें वाटे ॥ २ ॥ हिरे दगड एक खा-
चें विजातीला[4] पाणी ॥३॥ तुका ह्मणे
एक एकाची पायरी ॥ ४ ॥

---

ानें. २ ओढा. ३ मडकें ४ दुसऱ्याला.

१३९ भले ह्मणवितां संताचे सेवक । अ
इत्याची भीक सुखरूप ॥ १ ॥ ठसावितां[1] ब
लागती सायास । चुकल्या घडे नास अल
वर्म ॥ २ ॥ पाकसिद्धी लागे संचित आइतें
घडतां सोई तें तेव्हां गोड ॥ ३ ॥ तुका ह्मणे
बरें सांगताचि गोष्टी । रणभूमि दृष्टी न पडे
तों ॥ ४ ॥

१४८ येथील हा ठसा[3] । गेला पडोनियां
ऐसा ॥ १ ॥ घरीं देवाचे अबोला । त्यासि ते-
चि सवे त्याला ॥ २ ॥ नाहीं पाहावें लागत ।
एकाएकींच तें रितें[4] ॥ ३ ॥ तुका ह्मणे जन ।
तयामध्यें येवढें भिन्न ॥ ४ ॥

१४१ एकाचीं उत्तरें । गोड अमृत मधुरें १
ऐशा देवाच्या विभूती । भिन्न प्रारब्धाची
गती ॥ २० ॥ एकाचीं वचनें । कडू अत्यंत
तीक्ष्णें ॥ ३ ॥ प्रकाराचें तीन । तुका ह्मणे
केलें जन ॥ ४ ॥

१४२ सांठविला वाण । पैसा घातला दु-

---

१ बोधितां. २ कष्ट. ३ छाप. ४ रिकामें.

कान ॥ १ ॥ जें ज्या पाहिजे जे काळीं । आहे सिद्धचि जवळी ॥ २ ॥ निवडिलें साचें । उत्तममध्यमकनिष्ठाचें ॥ ३ ॥ तुका बैसला दुकानीं । दावी मोला[1] ऐसी वाणी ॥ ४ ॥

१४३ घातला दुकान । पढीये तैसा आहे वाण[2] ॥ १ ॥ आह्मी भांडारी देवाचे । द्यावें घ्यावें माप वाचें ॥ २ ॥ उगवूं जाणे मोडी । जाली नव्हे त्याची जोडी ॥ ३ ॥ तुका ह्मणे पुडी । मोला तैसी खरी कुडी[3] ॥ ४ ॥

१४४ राजा चाले तेथें वैभव सांगातें । हें काय लागतें सांगावें त्या ॥ १ ॥ कोणी कोणा येथें न मनी जी फुका । कृपेंविण एका देवाचिया ॥ २ ॥ शृंगारिलें नाहीं तगों येत वरि । उमटे लौकरि जैसें तैसें ॥ ३ ॥ तुका ह्मणे घरीं वसे नारायण । कृपेचि[4] ते खूण साम्या येते ॥ ४ ॥

१४५ मोहोऱ्याच्या संगें । सुत नव्हे आगीजोगें ॥ १ नाहीं तरी त्याचें भक्ष । काय

---

१ किमती. २ माल. ३ देह. ४ प्रसादाची.

सांगणें तें साक्ष ॥ २ ॥ स्वामीचिया अंगें। रूप नव्हे कोणाजोगें ॥ ३ ॥ तुका ह्मणे खोडी देवमनीं न देती दडी[1] ॥ ४ ॥

१४६ महुरा ऐसीं फळें नाहीं। आलीं कांहीं गळती ॥१॥ पक्कदशे येती थोडीं। नास आ-ढी वेचे तों ॥२॥ विरुळा पावे विरुळा पावे। अवघड गोवे सेवटाचे ॥ ३ ॥ उंच निंच प-रिवार देवीं। धन्या ठावी चाकरी ॥ ४ ॥ झ-ळके तेथें पावे आणी। ऐसे क्षणीं बहु थोडे ॥ ५ ॥ पावेल[2] तो पैल थडी[3]। ह्मणों गडी आ-पुला ॥ ६ ॥ तुका ह्मणे उभाऱ्यानें। कोण खरें मानितसे ॥ ७ ॥

१४७ धन्य शुद्ध जाती। धरीं लौकरी प-रती ॥ १ ॥ ऐकिलें तेंचि कानीं। होय परि-पाक[4] मनीं ॥ २ ॥ कळवळा पोटीं। सावधा-न हितासाठीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे भाव। ज्याचा तोचि जाणा देव ॥ ४ ॥

१४८ आणिकांसी तारी ऐसा नाहीं कोणी।

---

१ लपती. २ उतरेल. ३ तिरास. ४ परिणाम.

धड[1] तें नासोनि भलता टाकी ॥ १ ॥ सोनें शुद्ध होतें अविट तें घरीं । नासिलें सोनारीं अळंकारीं ॥ २ ॥ ओल शुद्ध काळी काळें जिरें बीज । कैंचें लागे निज हातीं तेथें ॥ ३ ॥ एक गहु करिती अनेक प्रकार । सांजा दिवशीं क्षीर घुगरिया ॥ ४ ॥ तुका ह्मणे विषा रुचि एका हातीं । पाधानी नासिती नवनीत[2] ५

१४९ दधिमाजीं लोणी जाणती सकळ । तें काढी निराळें जाणे मथन ॥ १ ॥ अग्नि कष्टामाजीं ऐसें जाणे जन । मथिलियाविण कैसा जाळी ॥ २ ॥ तुका ह्मणे मुख मळीण दर्पणीं । उजळिल्यावांचूनि कैसें भासे ॥ ३ ॥

१५० आपुल्याचा भोत चाटी[3] । मारी करंटी पारख्यां ॥ १ ॥ ऐसें जन भुललें देवा । मिथ्या हेवा वाढवी ॥ २ ॥ गळ गिळी आमिषें मासा । प्राण आशा घेतला ॥ ३ ॥ तुका ह्मणे बोकडमोहो[4] । धरी पहाहो खाटिक ॥४॥

१५१ विषय तो मरणसंगीं । नेणे सुटिका

---

१ चांगलें. २ लोणी. ३ वाईट भाग. ४ भुलतो.

अभागी ॥ १ ॥ शास्त्राचा केला लुंडा । तोंडीं पडियेला धोंडा ॥ २ ॥ अगदीं मोक्ष नाहीं ठावा । काय सांगावें गाढवा ॥ ३ ॥ तुका ह्मणे ग्यानगड । सुखें पावो देवा नाड ॥ ४ ॥

१५२ उकरडा आधीं अंगीं नरकाडी । जातीची ते जोडी तेचि चित्तीं ॥ १ ॥ कासयानें देखे अंधळें माणिकें । चवीविण फिकें वायां जाय ॥ २ ॥ काय जाणे विष पालटों उपचारें । मुखासी अंतर तोंचि बरें ॥ ३ ॥ तुका ह्मणे काय उपदेश वेड्या । संगें होतो रेड्यासवें कष्ट ॥ ४ ॥

१५३ विंचा पीडी नांगी । ज्याचा दोष त्याचे अंगीं ॥ १ ॥ केला पाहिजे विचार । मन मित्र दावेदार ॥ २ ॥ मधुरा उत्तरीं । रावा खेळे उरावरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे रेडा । सुखें जाती ऐशा पीडा ॥ ४ ॥

१५४ मुळीं नेणपण । जाला तरी अभिमान ॥ १ ॥ वायां जावें हेंचि खरें । केलें ते-

---

१ गोळा. २ ज्ञानाचे गड. ३ वैरी. ४ अज्ञानपण.

प्रकारें ॥ २ ॥ अराणूक[1] नाहीं कधीं ।
। तरी भेदबुद्धि ॥ ३ ॥ अंतरली नाव ।
ह्मणे नाहीं ठाव[2] ॥ ४ ॥

१५ प्रायश्चित्तें देतो तुका । जातो लोकां
ठां ॥ १ ॥ धरितील ते तरती मनीं । जा-
ाणी वायां त्या ॥ २ ॥ निग्रहअनुग्रहाचे
। देतो घाय पाहोनि ॥ ३ ॥ तुका जाला
नही । भय नाहीं कृपेनें ॥ ४ ॥

१६ वेंचावें[3] तें जीवें । पूजा घडे ऐशा
॥ १ ॥ बिगारीची ते बिगारी । साक्षी
ांचा हरी ॥ २ ॥ फळ बीजा ऐसें । का-
रणासारिसें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मान । ल-
ज्ञारिखें लवण ॥ ४ ॥

१७ बारा वर्षें बाळपण । तेंही वेचलें
नें ॥ १ ॥ ऐसा जन्म गेला वायां । न भ-
पंढरिराया ॥ २ ॥ बाकी उरलीं आठ्या-
तीस वेंचलीं[4] कामासी ॥ ३ ॥ बाकी
ों आठावन्न । तीस वेंचलीं ममतेनें ॥४॥

---

आराधना. २ ठिकाण. ३ ध्यावें. ४ खर्चली,

बाकी उरलीं आठावीस । देहगेह विसरला-
स ॥ ५ ॥ तुका ह्मणे ऐसा झाडा । संसार हा
आहे थोडा ॥ ६ ॥

१५८ बाळपणें ऐसीं वरुषें गेलीं बारा ।
खेळतां या पोरा नानामतें ॥ १ ॥ विटू दांडू
चेंडू लगोऱ्या वाघोडीं[1] । चंपे पेंड घडी ए-
कीबेकी ॥ २ ॥ हमामा हुंबरी पकव्याच्या
बारे । खेळे जंगीभोंवरे चुंबाचुंबी ॥ ३ ॥ से-
लडेरा आणि निसरभोवडी । उचली बाले
घोंडी अंगबळें ॥ ४ ॥ तुका ह्मणे ऐसें बाळ-
पण गेलें । मग तारुण्य आलें गर्वमूळ ॥ ५ ॥

१५९ तारुण्याचथा मदें[2] न मनी कोणासी ।
सदा मुसमुसी घुळी जैसा ॥ १ ॥ आटोनी
वेठोनी बांधला मुंडासा[3] । फिरतसे ह्मैसा
जनामधीं ॥ २ ॥ हातीं दीडपान वरती क-
री मान । नाहीं तो सन्मान भलियांसी ॥ ३ ॥
श्वानांचिया[4] परी हिंडे दारोदारीं । पाहे पर
नारी पापदृष्टीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे ऐसी थोर

---

१ कुरघोडी. २ धुंदीनें. ३ पागोटें. ४ कुत्याप्रमाणें.

जाली । करितां टवाळी जन्म गेला ॥ ५ ॥

६० ह्मातारपणीं थेरें पडसें खोकला । कपाळाला लावुनि बैसे ॥ १ ॥ खोबरी-ो वाटी जालें असे मुख । गळतसे नाक ।पुरीं ॥ २ ॥ बोलों जातां शब्द नयेचि नीट । गडगडी कंठ कफ भारी ॥ ३ ॥ ·री ह्मणती मरे ना कां मेला । आणिला ळा येणें आह्मां ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां नी द्या काम । स्मरा राम राम क्षण ॥ ५ ॥

६१ बरें जालीयाचे अवघे सांगाती । वा-r अंतीं कोणी नाहीं ॥ १ ॥ नोहे माता नोहे कांतासुतें । इतरांची मात काय ॥ २ ॥ तुका ह्मणे जन दुतोंडी सावज । इ सहज तिकडे धरी ॥ ३ ॥

२ वृद्धपणीं आली जरा । शरीर कांपे ा ॥ १ ॥ आयुष्य गेलें हें कळेना । वेगीं पंढरिराणा ॥ २ ॥ दांत दाढा प-

---

डी. २ सोडूनी. ३ मुलगा.

डिल्या ओस । हनुवटि भेटे नाकास ॥ ३ ॥
हात पाय राहिले कान । नेत्रा पाझरें[1] हाले
मान ॥ ४ ॥ अंगकांति परतली[2] । चिरगुटा
ऐसी जाली ॥ ५ ॥ आड पडे जिव्हा लोटे ।
शब्द नये मुखा वाटे ॥ ३ ॥ लांब लोंबताती
अंड । भरभरा वाजे गांड ॥ ७ ॥ तुका ह्मणे
आतां तरी । स्मरा वेंगी हरी हरी ॥ ८ ॥

१६३ वृद्धपणीं न पुसे कोणी । विटंबणी[3]
देहाची ॥ १ ॥ नवद्वारें जाली मोकळीक ।
गांड सरली वाजती ॥ २ ॥ दंत दाढा गळे
थुंका । लागे नाका हनुवटी ॥ ३ ॥ शब्द नये
मुखावाटा । करिती चेष्टा पोरें तीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे अजून तरि । स्मरे श्रीहरी सोड-
वील ॥ ५ ॥

१६४ ओले मातीचा भरंवसा । कां रे ध-
रिशी मानसा[4] ॥ १ ॥ डोळे चिरींव चांगले ।
वृद्धपणीं सरक्या झाले ॥ २ ॥ नाक सरळ
चांगलें । येउन हनवटीं लागलें ॥ ३ ॥ तुका

---

१ गळ. २ मुरडली. ३ विटंबना. ४ माणसा.

ह्मणे आलें नाहीं । तंव हरिला भज रे कांहीं४

१६५ बहु टाळाटाळी । होतां भोंवताहे कळी ॥१॥ बरें नव्हेल शेवटीं । भय असों द्यावें पोटीं ॥२॥ मुरगाळितां कान । घुस मांडील सावधान ॥ ३ ॥ अबोलपणा[1] तुका । ऐसें कोणी लेखूं[2] नका ॥ ४ ॥

१६६ देवावरी भार । वृत्ति अयाचित सार ॥ १ ॥ देह देवाचें सांभाळी । सार योजे यथाकाळीं ॥ २ ॥ विश्वासीं निर्धार । विस्तारील विश्वंभर ॥ ३ ॥ तुका ह्मणे व्हावें । बळ एकचि जाणावें ॥ ४ ॥

१६७ वाघें उपदेशिला कोल्हा । सुखें खावों द्यावें मला ॥१॥ अंतीं मरसी तें न चुके । मज कां मारितोसी भुकें ॥ २ ॥ येरू ह्मणे भला भला । निवाडु[3] तुझ्या तोंडें झाला ॥ ३ ॥ देह तों जाणार । घडेल हा परउपकार ॥ ४ ॥ येरू ह्मणे मनीं । ऐसें जावें समजोनि ॥ ५ ॥ गांठी पडली ठका ठका । त्याचें वर्म[4] बोले तुका ॥ ६ ॥

---

१ मुकेपणा. २ समजूं नका. ३ न्याय.

१६८ दुधाळ गाढवी जरी जाली पाहे। पावेल ते काय धेनुसरी[1] ॥ १ ॥ कागाचिया गळां पुष्पांचिया माळा। हंसाची तो कळा काय जाणे ॥ २ ॥ मर्कटें अंघोळी लावियेले टिळे। ब्राह्मणांचे लीळे[2] वर्तू नेणें ॥ ३ ॥ जरी तो ब्राह्मण जाला कर्मभ्रष्ट। तुका ह्मणे श्रेष्ठ तिहीं लोकीं ॥ ४ ॥

१६९ भक्तिप्रेमसुख नेणवे आणिकां। पंडित वाचकां ज्ञानियासी ॥ १ ॥ आत्मनिष्ठ जरी जाले जीवन्मुक्त। तरी भक्तिसुख दुर्लभ त्यां ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपा करिल नारायण। तरिच हें वर्म[3] पडे ठायीं ॥ ३ ॥

१७० बसतां चोरापाशीं तैसी होय बुद्धि। देखतांचि चिंधी[4] मन धांवे ॥ १ ॥ व्यभिचाऱ्यापासीं बैसतां क्षणभरी। देखतांचि नारी मन धांवे ॥ २ ॥ प्रपंचाचा छंद टाकुनियां गोंवा। धरावें केशवा हृदयांत ॥ ३ ॥ साडुनियां देई संसाराची बेडी। कीर्तनाची गोडी

१ कामधेनूची योग्यता. २ कर्में. ३ खूण. ४ वस्तू.

धरावी गा ॥ ४ ॥ तुका ह्मणे तुला सांगतों मी एक । रुक्मिणीनायक मुखीं गावा ॥ ५ ॥

१७१ शिकवणेसाठीं वाटते तळमळ[1] । पुढें येईल काळ फोडों डोई[2] ॥ १ ॥ तेव्हां त्यासी काय देशील उत्तर । मळवूनी अंतर ठेवितोसी ॥ २ ॥ येर्थीचिया सोंगें भोरपियाचे परी । होईल तें दुरी शृंगारिलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे कां रे राखिलें खरकटें । रागेल्याचे तंटे रागेलें का ॥ ४ ॥

१७२ समर्थाचे सेवे बहु असे हित । विचार हृदयांत करुनी पाहे ॥ १ ॥ वरकडा[3] ऐसा नव्हे हा समर्थ । क्षणेंचि घडित सृष्टि नासे ॥ २ ॥ ज्याची कृपा होतां आपणा ऐसें करी । उरों नेदी उरी दरिद्राची ॥ ३ ॥ ऐशालागीं मन वोळगे[4] अहर्निशीं । तेणें वंद्य होशी ब्रह्मादिकां ॥ ४ ॥ तुका ह्मणे हेंचि आहे पैं मुद्दल । सत्य माझा बोल हाचि माना ॥ ५ ॥

१७३ सकळ हे माया नागवे कवणा ।

---

१ कळकळ. २ डोकें. ३ दुसऱ्या. ४ तळमळें.

भांबाविलें जना दाही दिशा ॥ १ ॥ आशा तृष्णा दंभे[1] लागलीं हीं पाठीं। नेदी बैसों हाटीं मोह ठायीं ॥२॥ काय क्रोध घरा लावितील आगी। निंदा हिंसा दोघी पळतां खाती॥३॥ लाज पुढें उभी राहिली आडवी। ते करी गाढवी थोर घांत[2] ॥ ४ ॥ तुका ह्मणे चिंता घाली गर्भवासीं। ओढोनियां फाशीं चहूंकडे५

१७४ यमाचे हे पाश नाटोपती कोणातें। आह्मां दिनानाथें रक्षियेलें ॥ १ ॥ यम नेतां तुह्मां रक्षील हे कोण। तुह्मां धन्य धन्य कोण ह्मणती ॥ २ ॥ संतसज्जनमेळा पवित्र संतकीर्ति। त्यांनीं उत्तम स्थिति सांगितली ॥३॥ तेंचि धरोनि चित्तीं तुका हित करी। यमासी पांपरी हाणे आतां ॥ ४ ॥

१७५ धनवंत एक बहिर आंधळे । शुभ्र कुष्ट काळे भोग अंगीं[3] ॥ १ ॥ प्रारब्धाची गति न कळे विचित्र। आहे हातीं सूत्र विठोबाचे ॥ २ ॥ आणीक रोगांचीं नावें घेऊं किती।

---

१ सोंग. २ नुगसान. ३ देहीं.

अखंड असती जडोनियां ॥ ३ ॥ तुका ह्मणे नष्ट संचिताचें दान । पावे आतां पण सुख नेदी ॥ ४ ॥

१७६ धरिल्या देहाचें सार्थक करीन । आनंदें भरीन तिन्ही लोक ॥ १ ॥ लावीन निशाण जावया वैकुंठा । माजवीन पेठा कीर्तनाच्या ॥ २ ॥ नामाचिया नौका करीन सहस्रवरि । नावाडा श्रीहरि पांडुरंग ॥३॥ भाविक हो येथें धरा रे आंवांका । ह्मणे दास तुका शुद्धयाति ॥ ४ ॥

१७७ हे तों टाळाटाळी । परि भोंवता हा कळी ॥ १ ॥ बरें नव्हेलें शेवटीं । भय असों द्यावें पोटीं ॥ २ ॥ मुरगाळिल कान । गोसमाळी सावधान ॥ ३ ॥ धन्य ह्मणे आतां । येथें नुघवां माथां ॥ ४ ॥ अबोलणा तुका । ऐसें कांहीं लेखूं नका ॥ ५ ॥

१७८ अग्नि हा पाचारी कोणासी साक्षेपें । हिंवें तोचि तापे जाऊनियां ॥ १ ॥ उदक ह्म-

१ वाईट. २ गाजवीन. ३ धीर. ४ न होईल.

णे काय या हो मज प्यावें । तृषित तो धांवे सेवावया ॥ २ ॥ काय वस्त्र ह्मणे या वो मज नेसा । आपुले स्वइच्छा जग वोढी ॥ ३ ॥ तुक्या स्वामी ह्मणे काय मज स्मरा । आपु-ल्या उद्धारा लागूनियां ॥ ४ ॥

१७९ हितावरी यावें । कोणी बोलिलों या भावें ॥१॥ नव्हे विनोद[1] उत्तर । केले रंजवा-या चार ॥ २ ॥ केली आटीआटी[2] । अक्षरांची देवासाठीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे खिजों । नका जागा येथें निजों ॥ ४ ॥

१८० पिकवावें धन । ज्याची आस करी जन ॥ १ ॥ पुरोनि उरे खातां देतां । नव्हे खंडण मवितां ॥२॥ खोलीं पढे ओलीं बीज। तरीच हातां लागे निज ॥ ३ ॥ तुका ह्मणे धनी । विठ्ठल अक्षरें या तिन्ही ॥ ४ ॥

१८१ नका दंतकथा येथें सांगों कोणी । कोरडे[3] ते मानी बोल कोण ॥ १ ॥ अनुभव येथें पाहिजे साचार । न चलती चार[4] आ-

१ थट्टा. २ भास. ३ निष्फळ. ४ चाळे.

ह्मांपुढें ॥ २ ॥ निवडी वेगळें क्षीर[1] आणि पाणी । राजहंस दोन्ही वेगळालीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे येथें पाहिजे जातीचें । येरा गाबाळाचें नाहीं काम ॥ ४ ॥

१८२ स्तुती अथवा निंदा करावी देवाची । अधम तो वेंची[2] व्यर्थ वाणी ॥ १ ॥ आइकोनि होती बहिर हे बोल । वेचूनि ते मोल नरका जाती ॥ २ ॥ इहलोकीं थुंका पडे तोंडावरी । करणें अघोरीं[3] वास लागे ॥ ३ ॥ तुका ह्मणे माप वाचे ऐसें निकें । भरलें नरकें निंदेसाठीं ॥ ४ ॥

१८३ आपणा लागे काम वाण्याघरीं गुळ । त्याचें यातिकुळ काय कीजे ॥१॥ उकरड्यावरी वाढली तुळसी । टाकावी ते कैसी त्यागुणें ॥ २ ॥ गाईचा जो भक्ष अमंगळ खाय । तिचें दूध काय सेवूं नये ॥ ३ ॥ तुका ह्मणे काय सालपटासी काज[4] । फणसांतील बीज काढुनि घ्यावें ॥ ४ ॥

---

१ दूध. २ खर्चीं. ३ नरकीं. ४ काम.

१८४ तीर्थाचिये पंथें[1] चाले तो निदैव। पाविजे तो ठाव अंतराय ॥ १ ॥ ह्मणऊनि भलें निश्चळाचि स्थळीं। मनाचिये मुळीं बैसोनियां ॥ २ ॥ संकल्पारूढ तें पराधीन जिणें। कार्येचि कारणें वाढतसे ॥ ३ ॥ तुका ह्मणे कामा नाहीं एक मुख। जिरवितां सुख होतें पोटीं ॥ ४ ॥

१८५ अहंकार[2] तो नासा भेद। जगीं निंद्य ओंवळा ॥ १ ॥ नातळे तो धन्य त्यासी। जाला वंशीं दीपक[3] ॥ २ ॥ करावितो आत्महत्या नेदी सत्या आदळों ॥ ३ ॥ तुका ह्मणे गुरगुरी। माथां थोरी धरोनि ॥ ४ ॥

१८६ पाडावी ते बरी। गांठी धुरेसवें खरी ॥ १ ॥ नये मरों लंडीपणें। काय बापुडें तें जिणें ॥ २ ॥ लुटावें भांडार। तरी जया नाहीं पार ॥ ३ ॥ तुका ह्मणे नांवें। कीर्ति आगळीनें जिआवें ॥ ४ ॥

१८७ भजनेंचि जालें। मग जीवाचें काय

१ वाटेनें. २ क्रोध. ३ दिवा.

आलें ॥ १ ॥ येऊं नेदावी पुढती । आड भयाची ते जाती ॥ २ ॥ करीत सरोबरी[1] । कांहीं न ठेवावी उरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे शूर । व्हावें धुरेसींच धूर ॥ ४ ॥

१८८ भूक पोटापुरती । तृष्णा[2] भरवी वाखती । करवी फजीती । हांवें भार वाढला ॥ १ ॥ कुळिकेसी लांस फांस । डोई दाढी बोडवी दोष । अविहित नाश । करवी वचन चुकतां ॥ २ ॥ विधिसेवनें विहितें । कार्यकारणापुरतें । न बाटे जो चित्तें । अधर्मांच्या तो त्यागी ॥ ३ ॥ आज्ञा पाळणें ते सेवा । भय धरोनियां जीवा । तुका ह्मणे ठेवा । ठेविला तो जतन ॥ ४ ॥

१८९ आवडीची सलगी पूजा । विषम दुजा भाव तो ॥ १ ॥ ऐसीं उफराटीं वेमें[3] । कळों भ्रमें न येती ॥ २ नलगे समाधान मोल रुचती बोल प्रीतीचे ॥ ३ ॥ तुका ह्मणे एका जीवें । सूत्र व्हावें गुंतलें ॥ ४ ॥

---

१ बरोबरी २ तहान. ३ खुणा.

१९० शिजल्यावरी जाळ । वांयां जाय
तें मूळ ॥ १ ॥ ऐसा वारावा[1] तो श्रम । अ
शयीं नाहीं काम ॥ २ ॥ सांभाळावें वर्म ।
चिताच्या[2] काळें धर्म ॥ ३ ॥ तुका ह्मणे क
ऐसें कारणाचे वेळे ॥ ४ ॥

१९१ उभा ऐल थडी[3] । तेणें घालूं नये उ
॥ १ ॥ पुढें गेल्याचे उपाय । करावे ते के
काय ॥ २ ॥ दिसतें आहारीं । नये जाऊं
शावरी ॥ ३ ॥ आळसाची धाडी । तुक
ह्मणे बहु नाडी ॥ ४ ॥

१९२ काय करूं सांगतांही न कळे वर्म
उपस्थित भ्रम उमजवितो ॥ १ ॥ मन आधी
ज्याचें आलें होइल हातां । तयावरी सत्त
केली चाले ॥ २ ॥ अभुकेचे अंगीं चवी न
सवाद । मिथ्या ऐसा वाद दुराग्रह ॥ ३ ॥
तुका ह्मणे आप राखावें आपणा । संकोचों
चि कोण नये आतां ॥ ४ ॥

१९३ मुख्य आधीं विषयत्याग । विधि-

---

१ नाहिसा करावा. २ योग्य काळें. ३ अलिकडे.

भाग पाळणें ॥ १ ॥ मन पावे समाधान। हेंचि दान देवाचें ॥ २ ॥ उदासीन वृत्ति देहीं। चाड[1] नाहीं पाळणें ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं भय। सम सोय विषमाची ॥ ४ ॥

१९४ हेंचि सार हेंचि सार[2]। मूळ बीज रे आइका ॥ १ ॥ आवडीनें आवडी उरे। जें ज्या झुरे[3] तें त्यासी ॥२॥ प्रेमाचिया सूत्र दोरी। नाहीं उरी उरवी ॥ ३ ॥ तुका ह्मणे चिंतन बरें। आहे खरें खऱ्यापें ॥ ४ ॥

१९५ मायबाप सवें नये धनवित्त। करावें संचित भोगावें तें ॥ १ ॥ ह्मणऊनि लाभ काय तो विचारीं। नको चालीवरी[4] चित्त ठेवूं ॥ २ ॥ आयुष्य शेवटीं सांडूनि जाणार। नव्हेचि साचार शरीर हें ॥ ३ ॥ तुका ह्मणे काळें लाविये़लें माप। जमा धरी पापपुण्याची हे ॥ ४ ॥

१९६ कैसा होतो कृपावंत। बहुसंत सांगती ॥ १ ॥ पुसणें नाहीं याती कूळ। लागों

---

१ काळजी. २ तत्व. ३ कळवळे. ४ रूढींवरीं.

वेळ नेदावी[1] ॥२ ऐसी काय जाणों किती । उतरती उतरले ॥३॥ दावी वैकुंठींच्या वाटा । पाहातां मोठा संपन्न[2] ॥ ४ ॥ अभिमान तो नाहीं अंगीं । भक्तालागीं न बैसे ॥ ५ ॥ तुका ह्मणे आळस निद्रा । नाहीं थारा त्या अंगीं ॥ ६ ॥ आलें द्यावें भलत्या काळें । विठ्ठल बळें आगळा ॥ ७ ॥

१९७ हित नाहीं ठावें जननीजनका । दाविला लौकिकाचार तिहीं ॥ १ ॥ अंधळ्याचे काठी लागले अंधळें । घात एका वेळे पुढें-मागें ॥ २ ॥ न धरावी चाली करावा विचार वरील आहार[3] गळीं लावी ॥ ३ ॥ तुका ह्मणे केला निवाडा रोकडा । राउत हा घोडा हातोहातीं ॥ ४ ॥

१९८ यासी कोणी ह्मणे निंदेचीं उत्तरें । नागवला खरें तोचि एक ॥१॥ आडें[4] वाटे जातां लावी नीट सोई । धर्मनीत तेही ऐसी आहे २ नाइकतां सुखें करावें ताडण । पाप नाहीं पुण्य

१ न देई. २ सधन. ३ गोष्टी. ४ भलत्या वाटेनें.

असे फार ॥ ३ ॥ जन्म व्याधि[1] फार चुकतील दुःखें । खंडावा हा सुखें मान त्याचा ॥ ४ ॥ तुका ह्मणे निंब दिलियावांचून । अंतरीचा शीण कैंवी जाय ॥ ५ ॥

१९९ निवडे जेवण शेवटींच्या घांसें । होय त्याच्या ऐसें सकळही ॥ १ ॥ न पाहिजे जाला बुद्धीचा पालट । केली खटपट जाय वायां ॥ २ ॥ संपादिलें[2] होय धरिलें तें सोंग । विटंबना व्यंग पडिलिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे वर्म नेणतां जो रांधी । पाववी ते बुद्धि अवकळा.४

२०० फटकाळ देंव्हारा फटकाळ अंगारा । फटकाळ विचारा चालविलें ॥ १ ॥ फटकाळ तो देव फटकाळ तो भक्त । करावितो घात आणिकां जीवां ॥ २ ॥ तुका ह्मणे अवघें फटकाळ हें जन । अनुभवी खूण जाणतील॥३॥

२०१ ढेंकणाचे संगें हिरा जो भंगला । कुसंगें नाडला[3] तैसा साधु ॥ १ ॥ ओढाळाच्या संगें सात्विक नासलीं । क्षण एक नाउ-

---

१ दुःखें. २ बतावणी. ३ फसला.

लीं समागमें ॥२॥ डांकाचे संगतीं सोनें हि
जालें । मोल तें तुटलें लक्ष कोडी ॥ ३ ॥ वि
षानें पक्वान्नें गोड कडू जालीं । कुसंगानें
लीं तैसी परी ॥ ४ ॥ भावें तुका ह्मणे सत
ग हा बरा । कुसंग[2] हा फेरा चौऱ्याशींचा ॥
२०२ लागपाठ केला । आतां वांटा नि
त्याला ॥ १ ॥ करा जोडीचा ह्व्यास[3] । अ
दुरील घरास ॥ २ ॥ फोडिलीं भांडारें । 
होरलीं एकसरें ॥ ३ ॥ अवधियां पुरतें । 
का ह्मणे घ्यावें हातें ॥ ४ ॥
२०३ सरें आह्मांपाशीं एक शुद्धभाव
नाहीं तरी वाव उपचार ॥ १ ॥ कोण मा
वरी रसाळ बोलणें । नाहीं जाली मनें अ
ळखी तों ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां जाणिवे
दुःख । न पाहों त्या मुख दुर्जनाचें ॥ ३ ॥
२०४ देवाच्या निरोपें पिटितों डांगोर
लाजे नका थारा देऊं कोणी ॥ १ ॥ मोडि
या रांडें सुपंथ मारग[4] । चालविले जग य

२ दुष्टसंग. ३ निजध्यास. ४ वाट.

पंथें ॥ २ ॥ परिचारीं[1] केली आपुलीच रूढी । पोटींची ते कुंडी[2] ठावी नाहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे आणा राउळा धरून । फजित करून सोडूं मग ॥ ४ ॥

२०५ कोरडिया ऐशा सारूनियां गोष्टी । करा उठाउठीं हित आधीं ॥ १ ॥ खोळंबला राहे आपुला मारग । पहावी ते मग तुटी[3] कोठें ॥२॥ लौकिकाचा आड येईल पसारा । मग येरझारा दुःख देती ॥ ३ ॥ तुका ह्मणे डांख लागे अळंकारें । मन नव्हे खरें पुटाविण ॥४॥

२०६ काळाचे सारिखीं वाहाती क्षेत्रें । करितां दुसरें फळ नाहीं ॥ १ ॥ ऐसें करत्यानें ठेविलें करून । भरिलें भरून माप नेमें ॥ २ ॥ शीतउष्णकाळीं मेघ वरुषावे । वरुषतां वाव होय शीण ॥ ३ ॥ तुका विष अमृताचे किडे । पालट न घडे जीणें तया ॥ ४ ॥

२०७ प्रेम नये सांगतां बोलतां दावितां । अनुभव चित्ता चित्त जाणे[4] ॥ १ ॥ कांसवीचें

---

१ दासी. २ कपट. ३ तूट. ४ ओळखे.

बाळ वाढे कृपादृष्टीं । दुधा नाहीं भेटी अंग-संगें ॥ २ ॥ पोटामध्यें कोणें सांगितलें सर्पा। उपजत लपा ह्मणऊनि ॥ ३ ॥ बोलों नेणें परी जाणे गोड क्षार[1] । अंतरीं विचार त्यासी ठावा ॥ ४ ॥ तुका ह्मणे बरें विचारावें मनीं । आणिक भल्यांनीं पुसों नये ॥ ५ ॥

२०८ क्षोभ[2] आणि कृपा मातेची समान । विभाग जतन करूनि ठेवी ॥ १ ॥ क्षणभंगुर तें उपजली चिंता । खरी अखंडता आवडीची ॥ २ ॥ शिकवूं जाणे ते गोमटियासाठीं । लोभें नाहीं तुटी निश्चयेंसी ॥ ३ ॥ अवघेंचि मिथ्या समया आरतें । देतां तो उचितें काळ जाणे ॥ ४ ॥ न करी वेव्हार नेदी गांजूं कोणा । भेडसावी तान्हें बाऊ आला ॥ ५ ॥ तुका ह्मणे करी जिवाची जतन[3] । दचकूनि मन जवळी आणी ॥ ६ ॥

२०९ राहिलों निराळा । पाहों कवतुक डोळां ॥ १ ॥ करूं जगाचा विनोद[4] । डोळां

१ खार. २ राग. ३ संगोपन. ४ थट्टा.

पाहोनियां छंद ॥ २ ॥ भुलिया संसारें । आलें डोळ्यांसी मांजिरें ॥ ३ ॥ तुका ह्मणे माथा । कोणी नुचली सर्वथा ॥ ४ ॥

२१० जीवें व्हावें साठीं । पडे संवसारें तुटी ॥ १ ॥ ऐशीं बोलिलों वचनें । सवें घेउनी नारायणें ॥ २ ॥ येणें नाहीं जाणें । केलें कोणा न मागणें ॥ ३ ॥ नाहीं जन्मा आलों । करील ऐसें नेदीं बोलों ॥ ४ ॥ ठाव पुसी सेणें । तुका ह्मणे खुंटों येणें ॥ ५ ॥

२११ सुखें न मनीं अवगुण । दुःख भोगी त्याचें कोण ॥ १ ॥ हें कां ठायींचें न कळे । राती करा झांकुनि डोळे ॥ २ ॥ चालोनि आड वाटे । पायीं मोडविले कांटे ॥ ३ ॥ तुका ह्मणे कोणा बोल ठेवितो शहाणा ॥ ४ ॥

२१२ गोड नांवें क्षीर । परी साकरेचा धीर ॥ १ ॥ तैसें जाणा ब्रह्मज्ञान । बापुडें तें भक्तीविण ॥ २ ॥ रुची नेदी अन्न । ज्यांत न सतां लवण ॥ ३ ॥ आंधळ्याचे श्रम । शिक-

---

१ धुंदी. २ ताटातूट. ३ स्वताचें. ४ मीठ.

विल्याचेंचि नाम ॥ ४ ॥ तुका ह्मणे तारा। नांव तंबुऱ्याच्या सारा ॥ ५ ॥

२१३ आर्तभूतांप्रति । उत्तम योजाव्या त्या शक्ति ॥ १ ॥ फळ आणि समाधान । तेथें उत्तम कारण ॥ २ ॥ अल्पें[1] तो संतोषी । स्थळीं सांपडे उद्देसीं ॥ ३ ॥ सहज संगम । तुका ह्मणे तो उत्तम ॥ ४ ॥

२१४ कीर्तनाची गोडी । देव निवडी[2] आपण ॥ १ ॥ कोणी व्हारे अधिकारी । त्यासी हरि येईल ॥ २ ॥ वैराग्याचें बळ । साही खळ जिणावे[3] ॥ ३ ॥ उरेल ना उरी । तुका करी बोभाट ॥ ४ ॥

२१५ चालावा पंथ तो पाविजे त्या ठायां। ऐकिल्या वायां वारता त्या ॥ १ ॥ ऐका जी वोजे पडतसें पायां । भावाचि तें जाया वाट नव्हे ॥ २ ॥ व्याली कुमारीचा अनुभवें अनुभव । सांगतां तो भाव येत नाहीं ॥३॥ तुका ह्मणे येथें पाहिजे आरालें । निंब निवळलें तरि भासे ॥ ४ ॥

१ थोडक्यांत. २ ओळखी. ३ जिंकावे.

२१६ गावें ह्मणउनि गीत। धरूनि राहे तैसें चित्त ॥ १ ॥ हेंचि थोर अवघड आहे। अन्न देखोनि भूक राहे ॥ २ ॥ ऐकावी ह्मणूं कथा। राहे तैसें धरुनि चित्ता ॥ ३ ॥ तुका ह्मणे धणी। व्हे जेविल्यावांचुनी ॥ ४ ॥

२१७ गंगेचिया अंताविण काय चाड१। आपुलें तें कोडें२ तृषेपाशीं ॥ १ ॥ विठ्ठल हे मूर्ति साजिरी सुंदर। घालूं निरंतर हृदयपुटीं ॥ २ ॥ कारण तें असे नवनीता३-पाशीं। गाबाळ तें सोसी येर कोण ॥ ३ ॥ बाळाचे सोईतें घांस घाली माता। अट्टाहा४-स चिंता नाहीं तया ॥ ४ ॥ गाऊं नाचों करूं आनंदसोहळा। भावाचि वेगळा नाहीं हातां ५ तुका ह्मणे अवघें जालें एकमय। परलोकीं-ची काय चाड आतां ॥ ६ ॥

२१८ चिंतिलें तें मनींचें जाणे। पुरवी खुणे अंतरींचें ॥ १ ॥ रात्री न कळे दिवस न कळे। अंगीं खेळे दैवत हें ॥ २ ॥ नबसियाचे

१ योग्यता. २ इच्छा ३ लोण्यापाशीं. ४ त्रास.

पुरे नवस । भोगी त्यास भिन्न नाहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे समचि देणें । समचरण उभा असे ॥ ४ ॥

२१९ लागलिया मुख स्तनां । घाली पान्हा माउली ॥ १ ॥ उभयतां आवडीं लाडें । कोडें कोड[1] पुरतसे ॥ २ ॥ मेळवितां अंगें अंग । प्रेमें रंग वाढतो ॥ ३ ॥ तुका ह्मणे जड भारी । अवघें शिरीं जननीचे[2] ॥ ४ ॥

२२० पाठीं पोटीं देव । कैंचें हरिदासां भेव ॥ १ ॥ करा आनंदें कीर्तन । नका आशंकित[3] मन ॥ २ ॥ एथें कोठें काळ । करील देवापाशीं बळ ॥ तुका ह्मणे धनी । सपुरता काय वाणी ॥ ४ ॥

२२१ नये जरी कांहीं । तरी भलतेंचि वाही ॥ १ ॥ ह्मणविल्या दास । कोणी न धरी वेठीस[4] ॥ २ ॥ समर्थाच्या नांवें । भलतैसें विकावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे सत्ता । वरी असते बहुतां ॥ ४ ॥

---

१ इच्छा. २ आईचें. ३ शंकीत. ४ बेगारीस.

२२२ ज्याची खरी सेवा[1] । त्याच्या भय काय जीवा ॥१॥ करितां स्वामीसवें वाद । अधिक अधिक आनंद ॥ २ ॥ असावा तो धर्म । मग साहों जातें वर्म ॥ ३ ॥ वदे वाग्देवी[2] । तुका विठ्ठलीं गौरवी ॥ ४ ॥

२२३ भाव देवाचें उचित[3] । भाव तोचि भगवंत ॥ १ ॥ धन्य धन्य शुद्ध जाती । संदेह कैंचा तेथें चित्तीं ॥ २ ॥ बहुत बराडी । देव जवळी आवडी ॥ ३ ॥ तुका ह्मणे हें रोकडें । लाभ अधिक रिचो खडें ॥ ४ ॥

२२४ अवगुणांचे हातीं । आहे अवघी फजीती ॥ १ ॥ नाहीं पात्रासवें चाड । प्रमाण तें फिकें गोड ॥ २ ॥ विष तांब्या वाटी । भरली लावूं नये होंटीं[4] ॥ ३ ॥ तुका ह्मणे भाव । शुद्ध बरा सोंग वाव ॥ ४ ॥

२२५ जैसें तैसें राहे देवाचें हें देणें । यत्न करितां तेणें काय नव्हे ॥ १ ॥ दासां कृपासिंधु नुपेक्षी सर्वथा । अंतरींची व्यथा कळे

---

१ चाकरी. २ वाणी. ३ योग्य. ४ ओंठास.

त्यासी ॥२॥ मागों नेणें परी माय जाणे वर्म[१] । बाळा नेदी श्रम पावों कांहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज अनुभव अंगें । वचन वाउगें[२] मानेना हें ॥ ४ ॥

२२६ नव्हती माझे बोल । अवघें करितो विठ्ठल ॥ १ ॥ कांहीं न धरावी खंती । हित होईल धरा चित्तीं ॥ २ ॥ खोटी ते अहंता[३] । वाट टाकिली सांगतां ॥ ३ ॥ ज्याचें तोचि जाणे । मी मापाडें तुका ह्मणे ॥ ४ ॥

२२७ पोटीं जन्मती रोग । तरि कां ह्मणावे आप्तवर्ग ॥ १ ॥ रानीं वसती औषधीं । तरि कां ह्मणाव्या निपराधी ॥ २ ॥ तैसें शरीराचें नातें । तुका ह्मणे सर्व आप्तें ॥ ३ ॥

२२८ गंधर्वनगरीं क्षण एक राहावें । तेंचि पैं करावें मूळक्षेत्र ॥ १ ॥ खपुष्पाची पूजा बांधोनि निर्गुणा । लक्ष्मीनारायणा तोषवावें२ वंध्यापुत्राचा लग्नाचा सोहळा[४] । आपुलिया डोळां पाहों वेगीं ॥ २ ॥ मृगजळा पोई घा-

---

१ खुण. २ अनुचित. ३ अहंकार. ४ समारंभ.

लूनि सज्ञाना । तापलिया जना निववावें ॥ ४ ॥ तुका ह्मणे मिथ्या देहेंद्रियकर्में । ब्रह्मार्पण ब्रह्म होय बापा ॥ ५ ॥

२२९ पाण्या निघाली गुजरी । मन ठेविलें दो घागरीं ॥ चाले मोकळ्या पदरीं । परी लक्ष तेथें ॥ १ ॥ वावडी उडाली अंबरीं । हातीं धरोनियां दोरी । दिसे दुरिच्या दुरी । परी लक्ष तेथें ॥ २ ॥ चोर चोरी करी । ठेव ठेवी वनांतरी । वर्ततसे चराचरीं । परी लक्ष तेथें ॥ ३ ॥ व्यभिचारिणी नारी । घराश्रम करी । परपुरुष जिव्हारीं । परी लक्ष तेथें ॥ ४ ॥ तुका ह्मणे असों । भलतिये व्यापारीं । लक्षसर्वेश्वरीं । चुकों नेदी ॥ ५ ॥

२३० अर्थेंविण पाठांतर कासया करावें । व्यर्थचि मरावें घोकूनियां ॥ १ ॥ घोकूनियां काय वेगीं अर्थ आहे । अर्थरूप राहे होऊनियां ॥२॥ तुका ह्मणे ज्याला अर्थीं आहे भेटी । नाहीं तरी गोष्टी बोलों नका ॥ ३ ॥

---

१ तोषवावे. २ वावटळ. ३ आकाशांत.

२३१ बरवे दुकानीं बैसावें । श्रवण मनन असावें ॥ १ ॥ सार[1]असारचीं पोतीं । ग्राहक पाहोनि करा रितीं ॥ २ ॥ उगेचि फुगवूं नका गाल । पूर्ण सांठवावा माल ॥ ३ ॥ सत्य तराजू पैं धरा । नका कृत्रिम[2] विकरा ॥४ तुका झाला वाणी । चुकवूनि चौऱ्यार्शींच्या खाणी ॥ ५ ॥

२३२ गंगा न देखे[3] विटाळ । तेंचि रांजणींही जळ ॥ १ ॥ अल्प महद्रा नव्हे सरी । विटाळ तो भेद धरी ॥ २ ॥ काय खंडिली भूमिका । वर्ण पायरिकां[4] लोकां ॥ ३ ॥ तुका ह्मणे अगीविण । बीजें वेगळीं तों भिन्न ॥४॥

२३३ अभिमानाची स्वामिनी शांती । महत्व घेती सकळ ॥ १ ॥ कळोनि हें न कळे वर्म । तरि श्रम पावती ॥२॥ सर्व सत्ता करितां धीर । वीर्यावीर्य आगळा ॥ ३ ॥ तुका ह्मणे तिखट तिखें । मृदसखें आवडी ॥ ४ ॥

२३४ ज्यानें ज्यानें जैसें घ्यावें । तैसें व्हावें

१ बरें वाईट. २ खोटें. ३ लागें. ४ पायरीच्या.

कृपाळें ॥१॥ सगुणनिर्गुणांचा ठाव । विटे पाव धरियेले ॥ २ ॥ अवघें साकरेचें अंग । नये व्यंग निवडितां ॥ ३ ॥ तुका ह्मणे जें जें करी तें तें हरी भोगिता ॥ ४ ॥

२३५ नव्हों वैद्य आह्मी अर्थाचे [1]भुकेले । भलते द्यावे पाले भलत्यासी ॥ १ ॥ कुपथ्य करूनि [2]विटंबावे रोगी । काय हे [3]सलगी भीड त्याची ॥ २ ॥ तुका ह्मणे लासूं फांसूं देऊं डाव । सुखाचा उपाव पुढें आहे ॥ ३ ॥

२३६ आह्मांपाशीं सरे एक शुद्ध भाव । चतुराई जाणींव नलगे कळा ॥ १ ॥ सर्वजाण माझा स्वामी पांडुरंग । तया अंगसंग गोपाळासी ॥ २ ॥ तुका ह्मणे कर्में धर्में नये हातां । तयावरि सत्ता भाविकांची ॥ ३ ॥

२३७ अधिकार तैसा करूं उपदेश । साहे ओझें त्यास तेंचि द्यावें ॥ १ ॥ मुंगीवरी भार गजाचें [4]पालाण । घालितां ते कोण कार्यसिद्धि ॥२॥ तुका ह्मणे फांसे वागुरा कुऱ्हाडी । प्रसंगीं तों काढी पारधी तो ॥ ३ ॥

---

१ हपापलेले. २ विघडवावें. ३ मैत्रीं. ४ पाय.

२३८ करावें गोमटें ॥ बाळा माते तें उमटे ॥ १ ॥ आपुलिया जीवाहुनी । असे वाल्हें तें जननी ॥२॥ वियोग तो तिस । त्याच्या उपचारें तें विष ॥ ३ ॥ हरणी चुकली पाडसा । धुंडाळी ती दाही दिशा ॥ ४ ॥ रानीं हिंडों गेली गाय । घरीं वत्स वाट पाहे ॥ ५ ॥ तुका ह्मणे पायें । डोळा सुखावे ज्या न्यायें ॥६

२३९ नाहीं कोणी दिस जात वांयांविण । साध्य नाहीं शीण लटिकाची ॥ १ ॥ एकाचिये माथां असावें निमित्त । नसो नाहीं हित कपाळीं तें ॥ २ ॥ कांहीं एक तरी बोलायाचा जागा । नेदिती वाउगा उभा ठाकों ॥ ३ ॥ तुका ह्मणे वर्मे कळों येती कांहीं । ओळखी जे नाहीं होईल ते ॥ ४ ॥

२४० कौलें भरियेली पेठ । निग्रहाचे खोटे तंट ॥ १ ॥ ऐसें माता जाणे वर्म । बाळा वाढवितां धर्म ॥ २ ॥ कामावितां लाहो कसे । तांतडीनें काम नासे ॥ ३ ॥ तुका ह्मणे खडे । देतां अक्षर तें जोडे ॥ ४ ॥

---

१ शोधी. २ वासरूं. ३ कारण.

२४१ वैरागरापाशीं रत्नाचिया खाणी । हेचि घ्यावी धणी फावेल तों ॥ १ ॥ येथें नाहीं तर्कवितर्कांची चाड । होतसे निवाड खऱ्याखोट्यां ॥ ५ ॥ डगाच सारावा वाडिला तो ठाव । वाढितिया भाव कळतसे ॥ ३ तुका ह्मणे नव्हे टांचणीचें पाणी । येथें झरवणी जैशा तैसें ॥ ४ ॥

२४२ सोसें वाढे दोष । झाला पालटेना कस ॥ १ ॥ ऐसें बरवें वचन । करितां तें नारायण ॥ २ ॥ असे प्रारब्ध नेमें । श्रमचि उरे श्रमें ॥ ३ ॥ सुख देते शांती । तुका ह्मणे धरितां चित्तीं ॥ ४ ॥



# तुकारामाची गाथा.

## भाग दुसरा.

---

### संतपर अभंग.

१ अमृत तें प्रेम जिव्हा ओलावली । मनाची राहिली वृत्ति पायीं ॥ १ ॥ सकळही तेथें बोळलीं मंगळें । वृष्टि केली जळें आनंदाच्या ॥ २ ॥ सकळ इंद्रियें जालीं ब्रह्मरूप । ओतलें स्वरूप तया माजीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे जेथें वसे भक्तराव । तेथें नांदे देव नारायण ४

२ अंगें अनुभव जाला मज । संतरजचरणांचा ॥ १ ॥ सुखी जालों या सेवनें । दुःख नेणें यावरी ॥ २ ॥ निर्माल्याचें तुळसीदळ । विष्णुजळ चरणींचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे भवसार । करूनि फार मिश्रित ॥ ४ ॥

३ अवघे चुकविले सायास । तप राशी जीवा नाश ॥ १ ॥ जीव देउनियां बळी । अ-

वर्षी तारिलीं दुर्बळीं । केला भूमंडळीं । माझीं थोर पवाडा ॥ २ ॥ कांहीं नुमगे याची गती । लुटवितो जया हातीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे भक्तराजा । कोण वर्णी पार तुझा ॥ ४ ॥

४ अभिनव सुख तरि या विचारें । विचारावें बरें संतजनीं ॥ १ ॥ रुपाच्या आठवें दोन्ही आपण । वियोग तो क्षण होत नाहीं ॥२॥ पूजा तरि चित्तें कल्पा तें ब्रह्मांड । अहाच तो खंड एकदेशी ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझा अनुभव यापरी । डोई पायांवरी ठेवीतसें ४

५ अनंत लक्षणें वाणितां अपार । संतांचें तें घर सांपडेना ॥१॥ जये घरीं संत राहाती आपण । तें तुह्मां ठिकाणें आतुडेना ॥ २ ॥ ठिकाण धरूनी पाहावे ते संत । उगाच आकांत करूं नये ॥ ३ ॥ संत होऊनियां संतांसी पाहावें । तरिच तरावें तुका ह्मणे ॥ ४ ॥

६ अवघा भार वाटे देवा । संतसेवा न घडतां ॥ १ ॥ कसोटी हे असे हातीं । सत्य भूतीं भगवंत ॥ २ ॥ चुकलोंसा दिसे पंथ ।

गेले संत तो ऐसा ॥ ३ ॥ तुका ह्मणे सोंग वार्था । कारण या अनुभवें ॥ ४ ॥

७ आरुष माझी वाणी बोबडीं उत्तरें । केली ते लेंकुरें सलगी पार्यी ॥ १ ॥ करावें कवतुक संतीं मायबापीं । जीवन देउनि रोपीं विस्तारिजे ॥ २ ॥ आधारें वदली प्रसादाची वाणी । उच्छिष्टसेवनीं तुमचिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे हेचि करितों विनंती । मागेन पुढतीं सेवादान ॥ ४ ॥

८ आतां तुह्मी कृपावंत । साधु संत जिवलग ॥ १ ॥ गोमटें तें करा माझें । भार ओझें तुह्मांसी ॥ २ ॥ वंचिलें तें पायांपाशीं । नाहीं यासी वेगळें ॥ ३ ॥ तुका ह्मणे सोडिल्या गांठी । दिली मिठी पायांसी ॥ ४ ॥

९ आज्ञा पाळुनियां असें एकसरें । तुमचीं उत्तरें संतांचीं हीं ॥ १ ॥ भागवूनि देह ठेवियेला पार्यी । चरणांवरि डोई येथूनचि २ येणें जाणें हें तों उपाधीचें मूळ । पूजा ते सकळ अकर्तव्य ॥ ३ ॥ तुका ह्मणे असे चर-

णींचा रज । पदींच सहज जेथें तेथें ॥ ४ ॥

१० आपुलिया हिता जो असे जागता । धन्य मातापिता तयाचिया ॥ १ ॥ कुळीं कन्यापुत्र होती जीं सात्विक । तयाचा हरिख वाटे देवा ॥ २ ॥ गीता भागवत करिती श्रवण । अखंड चिंतन विठोबाचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज घडो त्यांची सेवा । तरी माझ्या दैवा पार नाहीं ॥ ४ ॥

११ आले संत पाय ठेविती मस्तकीं । इहीं उभय लोकीं सरता केलों ॥ १ ॥ वंदीन पाउलें लोळेन चरणीं । आजि इच्छा धणी फिटईल ॥ २ ॥ अवघीं पूर्व पुण्यें जालीं सानुकूळ । अवघेंचि मंगळ संतभेटी ॥३॥ तुका ह्मणे कृतकृत्य जालों देवा । नेणें परि सेवा डोळां देखें ॥ ४ ॥

१२ आजिचें हें मज तुह्मीं कृपादान । दिलें संतजन मायबापीं ॥ १ ॥ आलीं मुखावाटां अमृतवचनें । उत्तीर्ण तीं येणें नव्हे जन्में॥२॥ तुका ह्मणे तुह्मी उदार कृपाळ । शृंगारिलें बाळ कवतुकें ॥ ३ ॥

१३ आवडीची न पुरे धणी । प्रीत मनीं बैसली ॥ १ ॥ नित्य नवा कळवळा । मायबाळामध्यें तो ॥ २ ॥ सुख सुखा भेटों आलें । होय वाल्हें पोटींचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे ब्रह्मानंदें । संतवृंदें चरणापें ॥ ४ ॥

१४ आलिंगनें घडे । मोक्ष सायुज्यता जोडे ॥ १ ॥ ऐसा संतांचा महिमा । जाली बोलायाची सीमा ॥ २ ॥ तीर्थें पर्वकाळ । अवघीं पायांपें सकळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । त्यांची केली पावे सेवा ॥ ४ ॥

१५ आह्मां सोइरे हरिजन । जनीं भाग्य निकंचन ॥ १ ॥ ज्याच्या धैर्या नाहीं भंग । भाव एकविध रंग ॥ २ ॥ भुके तान्हे चित्तीं । सदां देव आठविती ॥ ३ ॥ तुका ह्मणे धन । ज्याचें निक नारायण ॥ ४ ॥

१६ आह्मी नाचों तेणें सुखें । वाजवूं टाळी गातां मुखें ॥ १ ॥ देव कृपेचा कोंवळा । शरणागता पाळी ळळा ॥ २ ॥ आह्मां जाला हा निर्धार । मागें तारिले अपार ॥ ३ ॥ तुका ह्मणे संतीं । वर्म दिलें आह्मां हातीं ॥ ४ ॥

१७ उदकीं कालवी शेण मलमूत्र। तो होय पवित्र कासयानें ॥ १ ॥ उद्धारासी ठाव नाहीं भाग्यहीना । विन्मुख चरणां संतांचिया ॥ २ ॥ दुखवी तो बुडे सांगडीचा ताफा । अतित्याई पापाचीच मूर्ति ॥ ३ ॥ तुका ह्मणे जेव्हां फिरतें कपाळ । तरि अमंगळ योग होतो ॥ ४ ॥

१८ उजळलें भाग्य आतां । अवघी चिंता वारली ॥ १ ॥ संतदर्शनें हा लाभ । पद्मनाभ जोडला ॥ २ ॥ संपुष्ट हें हृदयपेटी । करूनि पोटीं सांठवूं ॥ ३ ॥ तुका ह्मणे होता ठेवा । तो या भावा सांपडला ॥ ४ ॥

१९ उत्तम त्या याति । देवा शरण अनन्यगति ॥ १ ॥ नाहीं दुजा ठाव । कांहीं उत्तम मध्यम भाव ॥ २ ॥ उमटती ठसे । ब्रह्मप्राप्ति अंगीं दिसे ॥ ३ ॥ भाविक विश्वासी । तुका ह्मणे नमन त्यांसी ॥ ४ ॥

२० उदासीनाचा देह ब्रह्मरूप । नाहीं पुण्य पाप लागत त्या ॥ १ ॥ अनुताप अंगीं

अग्निचिया ज्वाळा । नाहीं मृगजळा विझों येत ॥ २ ॥ दोष ऐशा नांवें देहाचा आदर । विटलें अंतर अहंभावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे जाय नासोनियां खंती । तंव्रचि हे चित्तीं बद्धता ते ॥ ४ ॥

२० उपकारी असे आरोणि उरला । आपुलें तयाला पर नाहीं ॥ १ ॥ लाभावरि घ्यावें सांपडलें काम । आपला तो श्रम न विचारी ॥ २ ॥ जीव ऐसें देखे आणिकां जीवांसी । निखळचि रासी गुणांचीच ॥ ३ ॥ तुका ह्मणे देव तयाचा पांगिला । न भंगे संचला धीर सदां ॥ ४ ॥

२२ एका हातीं टाळ एका हातीं चिपळिया । घालिती हुंमरी एक वाहातातीं टाळिया ॥ १ ॥ मातले वैष्णव नटती नाना छंदें । नाहीं चाड मोक्षपदें भजनीं आवडी ॥ २ ॥ हाका अरोळिया गीत वाद्यें सुखसोहळे । जाय तें न कळे केव्हां रजनी दिवस ॥ ३ ॥ तीर्थी नाहीं चाड न लगे जावें वनांतरा ।

तुका ह्मणे हरिहरात्मकचि पृथिवी ॥ ४ ॥

२३ ऐका हें वचन माझें संतजन । विनवितों जोडून कर तुह्मां ॥ १ ॥ तर्क करूनियां आपुल्या भावना । बोलतिया जनां कोण वारी ॥ २ ॥ आमुच्या जीवींचा तोचि जाणे भावो । रखुमाईचा नाहो पांडुरंग ॥३॥ चित्त माझें त्याचे गुंतलेंसे पायीं । ह्मणऊनि कांहीं नावडे त्या ॥ ४ ॥ तुका ह्मणे मज न साहे विनंती । खेद होय चित्तीं भंग मना ५

२४ करणें तें देवा । हेंचि एक पावे सेवा ॥ १ ॥ अवघें घडे येणें सांगा । भक्त देवाचें तें अंगा ॥ २ ॥ हेंचि एक वर्म । काग बोलिला तो धर्म ॥ ३ ॥ तुका ह्मणे खरें । खरें त्रिवाचा उत्तरें ॥ ४ ॥

२५ करितां या सुखा । अंतपार नाहीं लेखा ॥ १ ॥ माथां पडती संतपाय । सुख कैवल्य तें काय ॥ २ ॥ ऐसा लाभ नाहीं । दुजा विचारितां कांहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे गोड । तेथें पुरे माझें कोड ॥ ४ ॥

२६ कल्पतरु त्या नव्हती बाभुळा । पुरव- ती फळा इच्छितिया ॥ १ ॥ उदंड त्या गाई ह्मैसी आणि शेळ्या । परि त्या निराळ्या कामधेनू ॥ २ ॥ तुका ह्मणे देव दाखविल दृष्टी । तया सवें भेटी थोर पुण्य ॥ ३ ॥

२७ कळेल हे खुण । तरि दावी नारायण ॥ १ ॥ सत्य संतापाशीं राहे । येरां भय आड आहे ॥ २ ॥ अणुचिया ऐसें । असे भरलें प्र- काशें ॥ ३ ॥ इंद्रियांचे धनी । ते हे जाती समजूनि ॥ ४ ॥ तर्क कुतर्क वाटा । नागवण घटापटा ॥ ५ ॥ तुका ह्मणे ल्यावें । डोळां अंजन बरवें ॥ ६ ॥

२८ काय नाहीं माता गौरवीत बाळा । काय नाहीं लळा पाळीत ते ॥ १ ॥ काय नाहीं त्याची करीत ते सेवा । काय नाहीं जीवा गोमटें तें ॥ २ ॥ अमंगळपणें कांटाळा न धरी । उचलोनी करीं कंठीं लावी ॥ ३ ॥ लेववी आपुले अंगें अळंकार । संतोषा ये फार देखोनियां ॥ ४ ॥ तुका ह्मणे स्तुति

योग्य नाहीं परी । तुह्मां लाज थोरी अंकिताची ॥ ५ ॥

२९ काय माझी संत पाहाती जाणीव । सर्व माझा भाव त्यांचे पायीं ॥ १ ॥ कारण सरतें करा पांडुरंगीं । भूषणाची जगीं काय चाड ॥ २ ॥ बोबड्या उत्तरीं म्हणे हरिहरि । आणीक भिकारी नेणें दुजें ॥ ३ ॥ तुका म्हणे तुम्ही विठ्ठलाचे दास । करितों मी आस उच्छिष्टाची ॥ ४ ॥

३० काय वाणूं आतां न पुरे हे वाणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥ थोरींव सांडिली आपुली परिसें । नेणें शिवों कैसें लोखंडासी ॥ २ ॥ जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति [illegible]ष्टविती उपकारें ॥ ३ ॥ भुतांची दया [illegible]वल संतां । आपुली ममता नाहीं दे[illegible]
[illegible]का म्हणे सुख पराविया सुखें ।
[illegible]से ॥ ५ ॥

[illegible] संतांचे उपकार ।
[illegible] १ ॥ काय द्यावें

त्यांचें व्हावें उतराई । ठेवितां हा पायीं जीव थोडा ॥ २ ॥ सहज बोलणें हित उपदेश । करूनि सायास शिकविती ॥ ३ ॥ तुका ह्मणे वत्स धेनुवेचा चित्तीं । तैसे मज येती सां· भाळीत ॥ ४ ॥

३२ कीर्ति चराचरीं आहे तैसी आहे । भे- टुनि त्वां काय द्यावें आह्मां ॥ १ ॥ घेउनि ध- रणें बैसति उपवासी । हा हाट आह्मांसी नाहीं तैसा ॥ २ ॥ तांतडी तयांनीं केली वि- टंबना । आह्मां नारायणा काय उणें ॥ ३ ॥ नाहीं मुक्ति चाड वास वैकुंठींचा । पिकली- से वाचा रामनामें ॥ ४ ॥ तुका ह्मणे काय व्हावें उतराई । जीव ठेवूं पायीं संतांचिया ५

३३ कुळींची हे कुळदेवी । केली ठावी संतांनीं ॥ १ ॥ बरवें जालें शरण गेलों । उग- विलों संकटीं ॥ २ ॥ आणिला रूपाही बळें । करूनि खळें हरिदासीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे स· मागमें । नाचों प्रेमें लागलों ॥४॥

३४ कृपाळू सज्जन तुह्मी संत जन । हेंचि

कृपादान तुमचें मज ॥ १ ॥ आठवण तुह्मीं द्यावी पांडुरंगा । कींव माझी सांगा काकुळती ॥२॥ अनाथ अपराधी पतितां आगळा। परि पायां वेगळा नका करूं ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुह्मी निरविल्यावरी । मग मज हरि उपेक्षीना ॥ ४ ॥

३५ केला कईवाड संतांच्या आधारें। अनुभवें खरें कळों आलें ॥ १ ॥ काय जीवित्वाची धरूनियां आशा । व्हावें गर्भवासा पात्र भेणें ॥ ॥ २ ॥ अबाळीनें जावें निश्चितीच्या ठायां । रांडा रोटा वायां करूं नये ॥ ३ ॥ तुका ह्मणे बळी देतां तें निधान । भिकेसाठीं कोण राज्य देतो ॥ ४ ॥

३६ कोटि जन्म पुण्य साधन साधिलें । तेणें हातां आलें हरिदास्य ॥ १ ॥ रात्रीं दिवस ध्यान हरीचें भजन । कायावाचामन भगवंतीं ॥ २ ॥ ऐसिया प्रेमळा ह्मणताती वेडा । संसार रोकडा बुडविला ॥ ३ ॥ एकवीस कुळें जेणें उद्धरिलीं । हे तों न कळे खोली

भाग्यमंदा ॥ ४ ॥ तुका ह्मणे त्याची पायधुळी मिळे । भवभय पळे वंदितांची ॥ ५ ॥

३७ कोण त्याचा पार पावला धुंडिता । पुढें विचारितां विश्वंभरा ॥ १ ॥ अणुरेणु सूक्ष्मस्थूळा पार नाहीं । श्रुती नेती त्याही खुंटलिया ॥ २ ॥ फळांत कीटक येवढें आकाश । ऐसीं तरुवरास अनेक किती ॥ ३ ॥दाविलें अनंतें अर्जुनासि पोटीं । आणीक त्या सृष्टी कृष्णलोक ॥४॥ तुका ह्मणे लागा संतांचिया कांसे । ठाव घेतां कैसे वांचा जीवें ॥ ५ ॥

३८ कोण पुण्य कोणा गांठी । ज्यासी ऐसियांची भेटी ॥ १ ॥ जिहीं हरि धरिला मनीं । दिलें संसारासी पाणी ॥ २ ॥ कोण हा भाग्याचा । ऐसियासी बोले वाचा ॥३॥ तुका ह्मणे त्याचे भेटी । होय संसारासी तुटी ॥४॥

३९ कोण पुण्य फळा आलें । आजि देखिलीं पाउलें ॥ १ ॥ ऐसें नेणें नारायणा । संतीं सांभाळिलें दीना ॥ २ ॥ कोण लाभ-

काळ । दीन आजिचा मंगळ ॥३॥ तुका ह्म- णे जाला । लाभ सहज विठ्ठला ॥ ४ ॥

४० कोणा पुण्यें याचा होईन सेवक । जीं- हीं इंद्रादिक दुराविले ॥ १ ॥ ऐसें वर्म मज दावीं नारायणा । अंतरींच्या खुणा प्रगटो- नी ॥ २ ॥ बहु अवघड असे संतभेटी । तरि जगजेठी करुणा केली ॥ ३ ॥ तुका ह्मणे मग नयें वृत्तीवरी । सुखाचे शेजारीं पहुडईन ४

४१ खळ सदां क्षुद्र दृष्टीं । करी कष्टी स- ज्जना ॥ १ ॥ करिती आपुलाले परी । धणी- वरी व्यापार ॥ २ ॥ दया संतां भांडवल । वें- ची बोल उपकार ॥ ३ ॥ तुका ह्मणे आपुला- लें । उसंतिलें ज्यांणीं तें ॥ ४ ॥

४२ गंगा आली आह्मांवरी । संतपाउलें साजिरीं ॥ १ ॥ तेथें करीन मी अंघोळी । उ- डे चरणरजधुळी । येती तीर्थावळी । पर्व- काळ सकळ ॥ २ ॥ पाप पळालें जळालें । भवदुःख दुरावलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे धन्य जालों । सप्तसागरांत न्हालों ॥ ४ ॥

४३ गंगाजळा पाहीं पाठी पोट नाहीं । अवगुण तो कांहीं अमृतासी ॥ १ ॥ रवि दीप काळिमा काय जाणे हिरा । आणिकां तिमिरां नाश तेणें ॥ २ ॥ कर्पूरकांडणी काय कोंडा कणी । सिंधू मिळवणीं काय चाले ३ परीस चिंतामणि आणिकांचा गुणी । पालटे लागोनि नव्हे तैसा ॥ ४ ॥ तुका ह्मणे तैसे जाणा संतजन । सर्वत्र संपूर्ण गगन जैसें ५

४४ गुणांचाचि सांठा । करूं नवजों आणिका वाटा ॥ १ ॥ करिती छंद नानापरी । भरोन शिणती आडभरी ॥ २ ॥ नेमली पंगती । आह्मां संतांची संगती ॥ ३ ॥ तुका ह्मणे लिळा येर कवतुक पाहे डोळां ॥ ४ ॥

४५ गुरुचिया मुखें होईल ब्रह्मज्ञान । न कळे प्रेमखुण विठोबाची ॥ १ ॥ वेदांतें विचारा पुराणांतें पुसा । विठोबाचा कैसा प्रेमभाव ॥ २ ॥ तुका ह्मणे सांडा जाणीवेचा शीण । विठोबाची खूण जाणती संत ॥ ३ ॥

४६ घातलें दुकान । देती आलियासी

दान ॥ १ ॥ संत उदार उदार । भरलें अनंत भांडार ॥ २ ॥ मागत्याची पुरे । धणी आणिकांसी उरे ॥ ३ ॥ तुका ह्मणे पोतें । देवें भरिलें नव्हे रितें ॥ ४ ॥

४७ चंदनाचे हात पायही चंदन । परिसा नाहीं हीन कोणी अंग ॥ १ ॥ दीपा नाहीं पाठीं पोटीं अंधकार । सर्वांगीं साखर अवघी गोड ॥ २ ॥ तुका ह्मणे तैसा सज्जनापासून । पाहातां अवगुण मिळेचि ना ॥ ३ ॥

४८ चिंतनें सरे तो धन्य जणा काळ । सकळ मंगळ मंगळांचें ॥ १ ॥ संसारसिंधु नाहीं हरिदासां । गर्भवास कैसा नेणती ते ॥ २ ॥ जनवन ऐसें कृपेच्या सागरें । दाटला आभारें पांडुरंग ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा भक्तांचें बंधन । दाखविलें भिन्न परी एक ॥४॥

४९ चिंता नाहीं गांवीं विष्णुदासांचिये । घोष जयजयकार सदां ॥ १ ॥ नारायण घरीं सांठविलें धन । अवघेंची वाण तया पोटीं ॥ ॥ २ ॥ सवंग सकळां पुरे धणी वरी । सेवा-

वया नारी नर बाळा ॥ ३ ॥ तुका ह्मणे येणें आनंदी आनंदु । गोविंदें गोविंदु पिकविला ४

५० चोरासी चांदणें वेश्येसी सेजार । परिसासी खापर काय होय ॥ १ ॥ दुधाचे आधणीं वैरिले पाषाण । कदा काळीं जाण पाक नव्हे ॥ २ ॥ तुका ह्मणे जरि पूर्वपुण्यें सिद्धि । तरिच राहे बुद्धि संतसंगीं ॥ ३ ॥

५१ जडलों तों आतां पायीं । होऊं काई वेगळा ॥ १ तुह्मीं संतीं कृपा केली । गंगे चाली ओघाची ॥ २ ॥ सांभाळिलों मायबा- पा । केलों तापावेगळा ॥ ३ ॥ वोरसें या जीव धाला । तुका ठेला मौन्येंची ॥ ४ ॥

५२ जायाचें शरीर जाईल क्षणांत । कां हा गोपीनाथ पावेचि ना ॥ १ ॥ तुह्मी संत सारे कृपेचे सागर । माझा निरोप फार सांगा देवा ॥२॥ अनाथ अज्ञान कोणी नाहीं त्याला । पायांपें विठ्ठला ठेवीं मज ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसी करा निरवण । मग तो रक्षण करील माझें ॥ ४ ॥

५३ जन्मा आलों त्याचें । आजि फळ जालें साचें ॥ १ ॥ तुह्मीं सांभाळिलें संतीं । भय निरसली खंती ॥ २ ॥ कृतकृत्य जालों । इच्छा केली ते पावलों ॥ ३ ॥ तुका ह्मणे काळ । आतां करूं न शके बळ ॥ ४ ॥

५४ जाणे भक्तीचा जिव्हाळा । तोचि दैवाचा पुतळा ॥ १ ॥ आणिक नये माझ्या मना । हो कां पंडित शाहाणा ॥ २ ॥ नामरूपीं जडलें चित्त । त्याचा दास मी अंकित ॥ ३ ॥ तुका ह्मणे नवविध । भक्ति जाणे तोचि शुद्ध ॥ ४ ॥

५५ जिचें पीडे बाळ । प्राण तियेचा विकळ ॥१॥ ऐसा मातेचा स्वभाव । सूत्र दोरी एक जीव ॥ २ ॥ सुखाची विश्रांति । उमटे मातेचिया चित्तीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे संत । तुह्मीं बहु कृपावंत ॥ ४ ॥

५६ जैसें तैसें बाळ मातेसी आवडे । बोलतां बोबडे शब्द गोड ॥ १ ॥ आपुले आवडीं लेववी खाववी । पाहोनियां जीवीं सुख

वाढे ॥ २ ॥ तुका ह्मणे काय देऊं परिहार । काय तें साचार जाणतसें ॥ ३ ॥

५७ जुंझार ते एक विष्णुदास जगीं । पापपुण्य अंगीं नातळे त्यां ॥ १ ॥ गोविंद आसनीं गोविंद शयनीं । गोविंद त्यां मनीं बैसलासे ॥ २ ॥ ऊर्ध्व पुंड्र भाळीं कंठीं शोभे माळ । कांपिजे कळिकाळ तयां भेणें ॥ ३ ॥ तुका ह्मणे शंखचक्रांचे श्रृंगार । नामामृतसार मुखामाजीं ॥ ४ ॥

५८ जे कां रंजले गांजले । त्यांसि ह्मणे जो आपुले ॥ १ ॥ तोचि साधु ओळखावा । देव तेथेंचि जाणावा ॥२॥ मृदु सबाह्य नवनीत । तैसें सज्जनाचें चित्त ॥ ३ ॥ ज्यासि आपंगिता नाहीं । त्यासि धरी जो हृदयीं ॥ ४ ॥ दया करणें जे पुत्रासी । तेचि दासा आणि दासी ॥ ५ ॥ तुका ह्मणे सांगूं किती । तोचि भगवंताची मूर्ति ॥ ६ ॥

५९ जें ज्याचें जेवण । तेंचि याचकासी दान ॥ १ ॥ आतां जाऊं चोजवीत । जेथें बै-

सतील संत ॥ २ ॥ होतीं घालीं पोटें । मागें उरलीं उच्छिष्टें ॥ ३ ॥ तुका ह्मणे धांव । पुढें खुंटईल हांव ॥ ४ ॥

६० जेथें जावें तेथें कपाळ सरिसें । लाभ तो विशेषें संतसंगें ॥ १ ॥ पूर्व पुण्यें जरि होतीं सानुकूळ । अंतराय मूळ नुपजे तेथें ॥ ॥ २ ॥ भाग्य तरी नव्हे धन पुत्र दारा । निकट वास बरा संतांपायीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे हेचि करावी मिरासी । बळी संतांपाशीं द्यावा जीव ॥ ४ ॥

६१ जेथें वैष्णवांचा वास । धन्य भूमी पुण्य देश ॥ १ ॥ दोष नाहीं ओखदासी । दूत सांगे यमापाशीं ॥ २ ॥ गरुडटकयांच्या भारें । भूमि गर्जे जयजयकारें ॥ ३ ॥ सहज तयां जनां छंद । वाचे गोविंद गोविंद ॥ ४ ॥ तुळसीवनें रंगमाळा ॥ अवघा वैकुंठ सोहळा ॥५॥ तुका ह्मणे भेणें । काळ नये तेणें रानें ६

६२ ज्यासी आवडी हरिनामाची । तोचि एक बहु शुचि ॥ १ ॥ जपतो हरिनाम बीज ।

तोचि वर्णांमाजीं द्विज ॥ २ ॥ तुका ह्मणे व-र्णधर्म । अवघे आहे सम ब्रह्म ॥ ३ ॥

६३ झंविली महारें । त्याचीं व्याली असे पोरें ॥ १ ॥ करी संतांचा मत्सर । कोपें उ-भारोनि कर ॥ २ ॥ बीज तैसें फळ । वरी आलें अमंगळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे ठावें । ऐसें जालें अनुभवें ॥ ४ ॥

६४ तरिच होय वेडी । नग्न होय घडफुडी ॥ १ ॥ काय बोलाचें गौरव । आंत वरी दोन भाव ॥ २ ॥ मृगजळा न्याहाळितां । तान न-वजाये सेवितां ॥ ३ ॥ न पाहे आणिकांची आस । शूर बोलिजे तयास ॥ ४ ॥ तुका ह्मणे या लक्षणें । संत अळंकार लेणें ॥ ५ ॥

६५ तीर्थाटणें एकें तपें हुंबरती । नाथि-ले धरिती अभिमान ॥ १ ॥ तैसे विष्णुदास नव्हती साबडे । एकाचिया पडे पायां एक २ अक्षरें आणिती अंगासी जाणीव । इच्छा ते गौरव पूज्य व्हावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे विधि-निषेधाचे डोहीं । पडले त्यां नाहीं देव कधीं ४

६६ तीर्थे फळती काळें जन्में आगळिया। संतदृष्टी पाया हेळामात्रें ॥ १ ॥ सुखाचे सुगम वैष्णवांचे पाय। अंतरींचें जाय महाभेव २ काळेंही न सरे तपें समाधान। कथे मूढजन समाधिस्त ॥ ३ ॥ उपमा द्यावया सांगतां आणीक। नाहीं तिन्ही लोक धुंडाळितां ॥४॥ तुका ह्मणे मी राहिलों येणें सुखें। संतसंगें दुःख नासावया ॥ ५ ॥

६७ तुह्मीं पाय संतीं। माझे ठेवियेले चित्तीं ॥ १ ॥ आतां बाधूं न शके काळ। जालीं विषम शीतळ ॥ २ ॥ भय नाहीं मनीं। देव वसे घरीं रानीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे भय। आतां स्वप्नींही तें नये ॥ ४ ॥

६८ तुह्मी संत मायबाप कृपावंत। काय मी पतित कीर्ती वानूं ॥ १ ॥ अवतार तुह्मां धराया कारण। उद्धरावे जन जड जीव ॥२॥ वाढविलें सुख भक्ति भाव धर्म। कुळाचार नाम विठोबाचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे गुण चंदनाचे अंगीं। तैसे तुह्मी जगीं संतजन ॥ ४ ॥

६९ तृषाकाळीं उदकें भेटी । पडे मिठी आवडीची ॥ १ ॥ ऐसियाचा हो कां संग । जिवलग संतांचा ॥ २ ॥ मिष्टान्नाचा योग भुके । ह्मणतां चुके पुरेसें ॥ ३ ॥ तुका ह्मणे माते बाळा । कळवळा भेटीचा ॥ ४ ॥

७० तेंच किती वारंवार । बोलों फार बोलिलें ॥ १ ॥ आतां माझे दंडवत । तुमच्या संत चरणांसी ॥ २ ॥ आवडी ते नीच नवी । जाली जीवीं वसती ॥ ३ ॥ तुका ह्मणे बरवें जालें । घरा आलें बंद्रींचें ॥ ४ ॥

७१ ते माझे सोयरे सज्जन सांगाती । पाय आठविती विठोबाचे ॥१॥ येरां मान विधि पाळणापुरतें । देवाचीं तीं भूतें ह्मणोनियां ॥२॥ सर्व भावें जालों वैष्णवांचा दास । करीन त्यांच्या आस उच्छिष्टाची ॥ ३ ॥ तुका ह्मणे जैसे मानिती हरिदास । तैसी नाहीं आस आणिकांची ॥ ४ ॥

७२ तेथें सुखाची वसती । गाती वैष्णव नाचती । दिंड्या पताका झळकती । गर्जती

हरिनामें ॥ १ ॥ दोषां जाली घेघेमारी । पळ-
ती भरले दिशा चारी । न येती माघारीं ।
नाहीं उरी परताया ॥ २ ॥ विसरोनि देवप-
णा । उभा पंढरीचा राणा । विटोनि निर्गुण ।
रूप धरिलें गोजिरें ॥ ३ ॥ पोट सेवितां न
धाये । भूक भुकेलीच राहे । तुका ह्मणे पाहें ।
कोण आस मुक्तीची ॥ ४ ॥

७३ त्यांचिया चरणां माझे दंडवत । ज्यांचें
धनवित्त पांडुरंग ॥ १ ॥ येथें माझा जीव पा-
वला विसांवा । ह्मणऊनि हांवा भरलासे ॥२॥
चरणींचे रज लावीन कपाळा । जीं पदें रा-
उळा सोई जाती ॥ ३ आणिक तीं भाग्यें येथें
कुरवंडी । करूनियां सांडी इंद्रापेसी ॥ ४ ॥
वैष्णवांचे घरीं देवाची वसति । विश्वास हा
चित्तीं सत्यभावें ॥ ५ ॥ तुका ह्मणे सखे
हरिचे ते दास । आतां पुढें आस नाहीं
दुजी ॥ ६ ॥

७४ त्रिविध कर्मांचे वेगळाले भाव । निव-
डूनि ठाव दाखविला ॥ १ ॥ आलिंग्राचा झा-

डा राहिल्याचा ठाव । सुख गौरव संतां अं-
गीं ॥ २ ॥ हिशेबें आलें तें सकळांसी प्रमाण ।
तेथें नाहीं आन चालों येत ॥ ३ ॥ तुका ह्मणे
नाहीं पापपुण्य खंती । झाड्याची हुजती हा-
तां आली ॥ ४ ॥

७५ दसरा दिवाळी तोचि आह्मां सण ।
सखे संतजन भेटतील ॥ १ ॥ अमुप जोडल्या
सुखाचिया राशी । पार या भाग्यासी न दि-
से आतां ॥ २ ॥ धन्य दिवस आजि जाला
सोनियाचा । पिकली हे वाचा रामनामें॥३॥
तुका ह्मणे काय होऊं उतराई । जीव ठेवूं
पायीं संतांचिये ॥ ४ ॥

७६ दासां सर्व काळ । तेथें सुखाचा क-
ल्लोळ ॥ १ ॥ जेथें वसती हरिचे दास । पुण्य
पिके पापा नाश ॥ २ ॥ फिरे सुदर्शन । घेऊ-
नियां नारायण ॥ ३ ॥ तुका ह्मणे घरीं । होय
ह्मणियारा कामारी ॥ ४ ॥

७७ देवाची पूजा हे भूतांचें पाळण । म-
त्सर तो शीण बहुतांचा ॥ १ ॥ रुसावें फुगा-

वें आपुलियावरी । उरला तो हरि सकळही ॥ २ ॥ तुका ह्मणे संतपण याचि नांवें । जरि होय जीव सकळांचा ॥ ३ ॥

७८ दुष्ट भूषण सज्जनाचें । अलभ्य लाभ पुण्य त्याचें ॥ १ ॥ धन्य ऐसा परउपकारी । जाय नरका आणिकांवरी ॥ २ ॥ मळ खाये संवदणी । करी आणिकांची उजळणी ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्याचा । प्रीतीं आदर करा साचा

७९ देवाचा भक्त तो देवासीच गोड । आणिकांसी चाड नाहीं त्याची ॥ १ ॥ कवणाचा सोइरा नव्हेच सांगाती । अवघियां हातीं अंतरला ॥ २ ॥ निष्काम वेडें ह्मणती बापुडें । अवघियां सांकडें जाला कैसा ॥ ३ ॥ माझें ऐसें तया न ह्मणती कोणी । असे रानीं वनीं भलते ठायीं ॥ ४ ॥ प्रातःस्नान करी विभूतिचर्चन । देखोनियां जन निंदा करी ५ कंठीं तुळसीमाळा बैसोनि निराळा । ह्मणती या चांडाळा काय जालें ॥ ६ ॥ गातां शंका नाहीं बैसे भलते ठायीं । शिव्या देती

आईबाप भाऊ ॥ ७ ॥ घरीं बाइल ह्मणे कोठें व्याली रांड । बरें होतें षंढ मरता तरी ॥८॥ जन्मोनि जाला अवघियां वेगळा । ह्मणोनि गोपाळा दुर्लभ तो ॥ ९ ॥ तुका ह्मणे जो संसारा रुसला । तेणेंचि टाकिला सिद्ध पंथ१०

८० देवासी अवतार भक्तांसी संसार । दोहींचा विचार एकपणें ॥ १ ॥ भक्तांसी सोहळे देवाचिया अंगें । देव त्यांच्या संगें सुख भोगी ॥ २ ॥ देवें भक्ता रूप दिलासे आकार भक्तीं त्याचा पार वाखाणिला ॥ ३ ॥ एका अंगीं दोन्ही जालीं हीं निर्माण । देवभक्तपण स्वामिसेवा ॥ ४ तुका ह्मणे येथें नाहीं भिन्न भाव । भक्त तोचि देव देव भक्त ॥ ५ ॥

८१ धनें वित्तें कुळें । अवघियानें तें आगळें ॥ १ ॥ ज्याचे नारायण गांठीं । भरला हृदय संपुटीं ॥ २ ॥ अवघेंचि गोड । त्याचे पुरलें सर्व कोड ॥ ३ ॥ तुका ह्मणे अस्त । उदय त्याच्या तेजा नास्त ॥ ४ ॥

८२ धन्य ते संसारीं । दयावंत जे अंतरीं

॥ १ ॥ येथें उपकारासाठीं । आले घर ज्यां वैकुंठीं ॥ २ ॥ लटिकें वचन । नाहीं देहीं उदासीन ॥ ३ ॥ मधुरा वाणी ओंठीं । तुका ह्मणे वाव पोटीं ॥ ४ ॥

८३ धन्य दिवस आजी दर्शन संतांचें । नांदे तयां घरीं दैवत पंढरीचें ॥ १ ॥ धन्य पुण्यरूप कैसा जाला संसार । देव आणि भक्त दुजा नाहीं विचार ॥ २ ॥ धन्य पूर्व पुण्य वोडवलें निरुतें । संतांचें दर्शन जालें भाग्यें बहुतें ॥ ३ ॥ तुका ह्मणे धन्य आह्मां जोडली जोडी । संतांचे चरण आतां जीवें न सोडीं५

८४ धन्य आजि दिन । जालें संताचें दर्शन ॥ १ ॥ जाली पापातापा तुटी । दैन्य गेलें उठाउठीं ॥ २ ॥ जालें समाधान । पायीं विसांवलें मन ॥ ३ ॥ तुका ह्मणे आले घरा । तोचि दिवाळीदसरा ॥ ४ ॥

८५ धन्य काळ संतभेटी । पायीं मिठी पडिली तो ॥ १ ॥ संदेहाची सुटली गांठी । जालें पोटीं शीतळ ॥ २ ॥ भवनदीचा जा-

ला तारा । या उतारा प्रसादें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मंगळ आतां । कोण दाता याहूनि ॥४॥

८६ धरावा तो बरा । ठाव वसतीचा थारा ॥ १ ॥ निजल्या जागविती । निज पूरवूनि देती ॥ २ ॥ एक वेवसाव । त्यांचा संग त्यांचा जीव ॥ ३ ॥ हितें केलें हित । ग्वाही एक एकां चित्त ॥ ४ ॥ विषमाच कांहीं । आड तया एक नाहीं ॥ ५ ॥ तुका ह्मणे बरीं । घरा येतील त्यापरी ॥ ६ ॥

८७ ध्यानीं योगीराज बैसले कपाटीं । लागे पाठोपाठीं तयांचिया ॥ १ ॥ तान भूक त्यांचें राखे शीत उष्ण । जाले उदासीन देहभाव ॥ २ ॥ कोण सखें तया आणीक सोयरें असे त्यां दुसरें हरीविण ॥ ३ ॥ कोण सुख त्यांच्या जीवासि आनंद । नाहीं राज्यमद घडी तयां ॥ ४ ॥ तुका ह्मणे विष अमृतासमान । कृपा नारायण करितां होय ॥ ५ ॥

८८ न करावी स्तुति माझी संतजनीं । होईल या वचनीं अभिमान ॥ १ ॥ भारें भवन-

दी नुतरवे पार। दुरावती दूर तुमचे पाय २ तुका ह्मणे गर्व पुरवील पाठी। होईल माझ्या तुटी विठोबाची ॥ ३ ॥

८९ नमावे पाय हें माझें उचित। आशीर्वादें हित तुमचिया ॥ १ ॥ कृपेचा वोरस न समाये पोटीं। ह्मणोनि उफराटीं वचनें हीं २ तुमची उष्टावळी हें माझें भोजन। झाडावें अंगण केरपुंजे ॥ ३ ॥ परि ऐसें पुण्य नाहीं माझे गांठीं। जेणें पडे मिठी पायांसवें ॥ ४ ॥ तुका ह्मणे राहे आठवण चित्तीं। ऐसी कृपा संतीं केली तुह्मीं ॥ ५ ॥

९० न मानावी चिंता तुह्मीं संतजनीं। हिरा स्फटिकमणी केंवि होय ॥ १ ॥ पडिला प्रसंग स्थळा त्या सारिखा। देखिला पारिखा भाव कांहीं ॥ २ ॥ बहुतांसी भय एकाचिया दंडें। बहुत या तोंडें वचनासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं वैखरी बा सर। करायाचे चार वेडे वेडे ॥ ४ ॥

९१ न लगे चंदना सांगावा परिमळ। व-

नरूपतिमेळ हाकारूनी ॥ १ ॥ अंतरीचें धांवे स्वभावें बाहेरी । धरितां ही परी आवरेना २ सूर्य नाहीं जागें करीत या जना । प्रकाश किरणा कर म्हून ॥ ३ ॥ तुका ह्मणे मेघ नाचवी मयूरें । लपवितां खरें येत नाहीं ॥ ४ ॥

९२ नव्हे हें गुरुत्व मेघवृष्टि वाणी । ऐकावी कानीं संतजनीं ॥ १ ॥ आरुष हा शब्द देवाचा प्रसाद । करविला वाद तैसा केला ॥ २ ॥ देहपिंड दान दिला एकसरें । मुळींचें तें खरें टांकसाळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे झरा लागला नवनीत । सेविलिया हित पोट धाय ॥ ४ ॥

९३ नव्हती ते संत करितां कवित्व । संतांचे ते आप्त नव्हती संत ॥ १ ॥ येथें नाहीं वेष सरतें आडनांवें । निवडे घावडाव व्हावा अंगीं ॥ २ ॥ नव्हती ते संत धरितां भोंपळा । पांघरती वाकळा नव्हती संत ॥ ३ ॥ नव्हती ते संत करितां कीर्तन । सांगतां पुराणें नव्हती संत ॥ ४ ॥ नव्हती ते संत वे-

दाच्या पठणें । कर्म आचरणें नव्हती संत ॥
॥ ५ ॥ नव्हती संत करितां तप तीर्थाटन ।
सेविलिया वन नव्हती संत ॥ ६ ॥ नव्हती
संत माळामुद्रांच्या भूषणें । भस्मउध्दूलनें
नव्हती संत ॥ ७ ॥ तुका ह्मणे नाहीं निरस-
ला देहे । तोंवरी हे अवघे संसारिक ॥ ८ ॥

९४ नाहीं संतपण मिळत हें हाटीं ॥ हिं-
डतां कपाटीं रानीं वनीं ॥ १ ॥ नये मोल दे-
तां धनाचिया राशी । नाहीं तें आकाशीं पा-
ताळीं तें ॥ २ ॥ तुका ह्मणे मिळे जिवाचिये
साटीं । नाहीं तरी गोष्टी बोलों नये ॥ ३ ॥

९५ नाहीं साजत हा मोठा । मज अळं-
कार खोटा ॥ १ ॥ असें तुमचा रजरेण । सं-
तां पायींची वहाण ॥ २ ॥ नाहीं स्वरूपीं ओ-
ळखी भक्तिभाव करीं देखीं ॥ ३ ॥ नाहीं शू-
न्याकारीं । क्षर ओळखी अक्षरीं ॥ ४ ॥ नाहीं
विवेक या ठायीं । आत्मा अनात्मा तें काई ५
कांहीं नव्हे तुका । पायां पडेन हें ऐका ॥६॥

९६ निजसेजेची अंतुरी । पादलिया कोण

मारी ॥ १ ॥ तैसा आह्मांसी उबगतां । तुका विनवितो संतां ॥२॥ मूळ मांडीवरी हागलें । तें बा कोणें रे त्यागिलें ॥ ३ ॥ दासी कामासी चुकली । ते बा कोणें रे विकली ॥ ४ ॥ पांडुरंगाचा तुका पापी । संतसाहें काळासी दापी ॥ ५ ॥

९७ नेणों काय नाड । आला उचित काळा आड ॥ १ ॥ नाहीं जाली संतभेटी । येवढी हानी काय मोठी ॥ २ ॥ सहज पायांपाशीं । जवळी पावलिया पेसी ॥ ३ ॥ चुकी जाली आतां काय । तुका ह्मणे उरली हाय ४

९८ परमेष्ठिपदा । तुच्छ करिती सर्वदा ॥ ॥ १ ॥ हेंचि ज्यांचें धन । सदा हरीचें स्मरण ॥ २ ॥ इंद्रपदादिक भोग । भोग नव्हे तो भवरोग ॥३॥ सार्वभौम राज्य । त्यांसि कांहीं नाहीं काज ॥ ४ ॥ पाताळींचें आधिपत्य । तें तों मानिती विपत्य ॥ ५ ॥ योगसिद्धिसार । ज्यांसि वाटे तें असार ॥६॥ मोक्षायेवढें सुख। सुख नव्होंचे तें दुःख ॥ ७ ॥ तुका ह्मणे हरीविण । त्यांसि अवघा वाटे शीण ॥ ८ ॥

९९. पवित्र तो देह वाणी पुण्यवंत। जो वदे अच्युत सर्व काळ ॥ १ ॥ तयाच्या चिंतनें तरतील दोषी। जळतील राशी पातकाच्या ॥२॥ देव इच्छी रज चरणींची माती। धांवत चालती मागें मागें ॥ ३ ॥ काय त्यां उरलें वेगळें आणीक। वैकुंठनायक जयां कंठीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे देवभक्तांचा संगम। तेथें ओघ नाम त्रिवेणीचा ॥ ५ ॥

१०० पवित्र तें कुळ पावन तो देश। जेथें हरिचे दास घेती जन्म ॥ १ ॥ कर्मधर्म त्यांचें जाला नारायण। त्यांचेनी पावन तिन्ही लोक ॥२॥ वर्णअभिमानें कोण झाले पावन। ऐसें द्या सांगून मजपाशीं ॥ ३ ॥ अंत्यजादि योनी तरल्या हरिभजनें। तयाचीं पुराणें भाट जालीं ॥ ४ ॥ वैश्य तुळाधार गोरा तो कुंभार। धागा हा चांभार रोहिदास ॥ ५ ॥ कबीर मोमीन लतिफ मुसलमान। सेना न्हावी जाण विष्णुदास ॥ ६ ॥ कान्होपात्र खोदु पिंजारी तो दादु। भजनीं अभेदू हरिचे पायीं

॥ ७ ॥ चोखामेळा वंका जातीचा माहार । त्यासी सर्वेश्वर ऐक्य करी ॥ ८ ॥ नामयाची जनी कोण तिचा भाव । जेवी पंढरीराव तियेसवें ॥९॥ मैराळ जनक कोण कुळ त्याचें । महिमान तयांचें काय सांगों ॥ १० ॥ याता-यातीधर्म नाहीं विष्णुदासां । निर्णय हा ऐसा वेदशास्त्रीं ॥ ११ ॥ तुका ह्मणे तुह्मीं विचारावे ग्रंथ । तारिले पतित नेणों किती ॥ ११ ॥

१०१ पाप ताप दैन्य जाय उठाउठीं । जालिया भेटी हरिदासांची ॥ १ ॥ ऐसें बळ नाहीं आणिकांचे अंगीं । तपें तिर्थें जगीं दानें व्रतें ॥ २ ॥ चरणींचे रज वंदी शूळपाणी । नाचती कीर्तनीं त्यांचे माथां ॥ ३ ॥ भव तरावया उत्तम हे नाव । भिजों नेदी पाव हात कांहीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे मन जालें समाधान । देखिले चरण वैष्णवांचे ॥ ५ ॥

१०२ पाठीवरी भार । जातो वाहूनिया खर ॥१॥ संत नेतील त्या ठायां । माझी आधीन त्यां काया॥२॥ मोटे चौफळ । अंगीं उच्छिष्टाचें बळ

अंगसंगीं ॥ २ ॥ जोडोनियां कर । उभें असावें समोर ॥ ३ ॥ तुका ह्मणे संत । तुह्मी मी बहु पतित ॥ ४ ॥

१०६ पुण्य फळलें बहुतां दिवसां । भाग्यउदयाचा ठसा । जालों सन्मुख तो कैसा । संतचरण पावलों ॥ १ ॥ आजि फिटलें माझें कोडें । भवदुःखाचें सांकडें । कोंदाटलें पुढें । परब्रह्म सांवळें ॥ २ ॥ आलिंगनें संतांचिया । दिव्य जाली माझी काया । मस्तक हा पायां । वरी त्यांच्या ठेवितां ॥ ३ ॥ तुका ह्मणे धन्य जालों । सुखें संतांचिया धालों । लोटांगणीं आलों । पुढें भार देखोनी ॥ ४ ॥

१०७ पुनीत केलें विष्णुदासीं । संगें आपुलिया दोषी ॥ १ ॥ कोण पाहे तयांकडे । वीर विठ्ठलाचे गाढे । अशुभ त्यांपुढें । शुभ होउनियां ठाके ॥ २ ॥ प्रेमसुखाचिया राशी । पाप नाहीं ओखदासी ॥३॥ तुका ह्मणे त्यांनीं । केली वैकुंठ मेदिनी ॥ ४ ॥

१०८ पूजा समाधानें । अतिशयें वाढे शीण

॥३॥ न संडी मारग । येथें न चोरूनि अंग॥४॥ आपुलिया सत्ता । चालविती नाहीं चिंता ॥ ॥ ५ ॥ कळवळिला तुका । घराचार येथें नका ॥ ६ ॥

१०३ पायां पडावें हें माझें भांडवल । सरती हे बोल कोठें पायीं ॥ १ ॥ तरि हे सलगी कवतुक केलें । लडिवाळ धाकुलें असे बाळ ॥ २ ॥ काय उणें तुह्मां संतांचिये घरीं । विदित या परी सकळही ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझें उचित हे सेवा । नये करूं ठेवाठेवी कांहीं ॥ ४ ॥

१०४ पाहुणे घरासी । आजी आले हृषीकेशी ॥ १ ॥ काय करूं उपचार । खोप मोडकी जर्जर । कण्या द्रद्र । पाण्यामाजीं रांधिल्या ॥ २॥ घरीं मोडकिया बाजा । वरी वाकळाच्या शेजा ॥ ३ ॥ मुखशुद्धि तुळसीदळ । तुका ह्मणे मी दुर्बळ ॥ ४ ॥

१०५ पाळितों वचन । परि बहु भीतें मन ॥ १ ॥ करितों पायांशीं सलगी । नये बैसों

अंगसंगीं ॥ २ ॥ जोडोनियां कर । उभें असावें समोर ॥ ३ ॥ तुका ह्मणे संत । तुह्मी मी बहु पतित ॥ ४ ॥

१०६ पुण्य फळलें बहुतां दिवसां । भाग्यउदयाचा ठसा । जालों सन्मुख तो कैसा । संतचरण पावलों ॥ १ ॥ आजि फिटलें माझें कोडें । भवदुःखाचें सांकडें । कोंदाटलें पुढें । परब्रह्म सांवळें ॥ २ ॥ आलिंगनें संतांचिया । दिव्य जाली माझी काया । मस्तक हा पायां । वरी त्यांच्या ठेवितों ॥ ३ ॥ तुका ह्मणे धन्य जालों । सुखें संतांचिया धालों । लोटांगणीं आलों । पुढें भार देखोनी ॥ ४ ॥

१०७ पुनीत केलें विष्णुदासीं । संगें आपुलिया दोषी ॥ १ ॥ कोण पाहे तयांकडे । वीर विठ्ठलाचे गाढे । अशुभ त्यांपुढें । शुभ होउनियां ठाके ॥ २ ॥ प्रेमसुखाचिया राशी । पाप नाहीं ओखदासी ॥३॥ तुका ह्मणे त्यांनीं । केली वैकुंठ मेदिनी ॥ ४ ॥

१०८ पूजा समाधानें । अतिशयें वाढे शीण

॥ १ ॥ हें तों जाणा तुह्मी संत । आहे बोलिली ते नीत ॥ २ ॥ पाहिजे तें केलें । सहज प्रसंगीं घडलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे माथा । पायीं ठेवीं तुह्मां संतां ॥ ४ ॥

१०९ पूजा पुज्यमान । कथे उभे हरिजन ॥ १ ॥ ज्याची कीर्ति वाखाणिती । तेथें ओतिली ते मुर्ती ॥ २ ॥ देहाचा विसर । केला आनंदें संचार ॥ ३ ॥ गेला अभिमान । लाज बोळविला मान ॥ ४ ॥ शोक मोह चिंता । यांची नेणती ते वार्ता ॥ ५ ॥ तुका ह्मणे सखे । विठोबाच ते सारिखे ॥ ६ ॥

११० प्रमाण हें त्याच्या बोला । देव भक्ताचा अंकिला ॥ १ न पुसतां जातां नये । खालीं बैसतांही भिये ॥ २ ॥ अवघा त्याचा होत । जीव भावाही सहित ॥ ३ ॥ वदे उपचाराची वाणी । कांहीं माग ह्मणऊनि ॥ ४ ॥ उदासीनाच्या लागें । तुका ह्मणे धांवे मागें५

१११ प्रारब्ध क्रियमाण । भक्तां संचित नाहीं जाण ॥ १ ॥ अवघा देवचि जाला पा-

हीं । भरोनियां अंतर्बाहीं ॥ २ ॥ सत्त्वरजतम बाधा । नव्हे हरिभक्तांसि कदा ॥ ३ ॥ खाय बोले करी । अवघा त्यांच्या अंगें हरी ॥ ४ ॥ देवभक्तपण । तुका ह्मणे नाहीं भिन्न ॥ ५ ॥

११२ प्रेम देवाचें देणें । देहभाव जाय जेणें ॥ न धरावी मनें । शुद्धी देशकाळाची ॥ १ ॥ मुक्तलज्जाविरहित । भाग्यवंत हरिभक्त । जाले वोसंडत । नामकीर्तिपवाडे ॥२॥ जोडी जाली अविनाश । जन्मोनि जाले हरिचे दास । त्यांस नव्हे गर्भवास । सौरस परब्रह्मीं ॥ ३ ॥ हेचि वाहाती संकल्प । पुण्यप्रसंगाचे जप । तुका ह्मणे पाप । गांवीं नाहीं हरिजना ॥ ४ ॥

११३ बरवी हे वेळ सांपडली संधि । साह्य जाली बुद्धि संचितासी ॥ १ ॥ येणें पंथें माझीं चालिलीं पाउलें । दरुशन जालें संतां पायीं ॥ २ ॥ त्रासिलें दरिद्रें दोषां झाला खंड । त्याचि काळें पिंड पुनीत जाला ॥ ३ ॥ तुका ह्मणे जाला अवघा व्यापार । आली वेरझार फळासी हे ॥ ४ ॥

११४ बरवें देशावर जालें । काय बोलें बोलावें ॥ १ ॥ लाभें लाभ दुणावला । जीव धाला दर्शनें ॥ २ ॥ भाग्यें जाली संतभेटी । आवडी पोटीं होती ते ॥ ३ ॥ तुका ह्मणे श्रम केला । अवघा आला फळासी ॥ ४ ॥

११५ बहुतां जन्मींचें संचित । सबळ होय जरि बहुत । तरीचि होय हरिभक्त । कृपावंत मानसीं ॥ १ ॥ ह्मणवी ह्मणियारा तयांचा । दास आपुल्या दासांचा । अनुसरले वाचा । काया मनें विठ्ठलीं ॥ २ ॥ असे भूतदया मानसीं । अवघा देखे हृषीकेशी । जीवें न विसंबे त्यासी । मागें मागें हिंडतसे ॥ ३ ॥ तुका ह्मणे निर्विकार । शरणागतां वज्रपंजर । जे जे अनुसरले नर । तयां जन्म चुकलें ॥४॥

११६ बोल बोलतां वाटे सोपें । करणी करितां टीर कांपे ॥ १ ॥ नव्हे वैराग्य सोपारें । मज बोलतां न वाटे खरें ॥ २ ॥ विष खावें ग्रासोग्रासीं । धन्य तोचि एक सोसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे करूनि दावी । त्याचे पाय माझे जीवीं ॥ ४ ॥

११७ बोलिलों ते धर्म अनुभव अंगें । काय पांडुरंगें उणें केलें ॥ १ ॥ सर्व सिद्धि पायीं वोळंगती दासी । इच्छा नाहीं ऐसी व्हावें कांहीं ॥ २ ॥ संतसमागमें अळंकार वाणी । करूं हे पेरणी शुद्ध बीजा ॥ ३ ॥ तुका ह्मणे रामकृष्णनामें गोड । आवडीचें कोड माळ ओंवूं ॥ ४ ॥

११८ बोलिलों जैसें बोलाविलें देवें । माझें तुह्मां ठावें जातिकुळ ॥ १ ॥ करा क्षमा कांहीं नका धरूं कोप । संत मायबाप दीनावरि २ वाचेचा चालक जाला दावी वर्म । उचित ते धर्म मजपुढें ॥३॥ तुका ह्मणे घडे अपराध नेणतां । द्यावा मज आतां ठाव पायीं ॥ ४ ॥

११९ ब्रह्मज्ञान जरी कळे उठाउठीं । तरि कां हिंपुटीं वेदशास्त्रें ॥ १ ॥ शास्त्रांचें भांडण जप तीर्थाटण । पूर्वीचें भ्रमण याचसाठीं २ याचसाठीं जप याचसाठीं तप । व्यासेंही अमुप ग्रंथ केले ॥ ३ ॥ याचसाठीं संतपाय हे सेवावे । तरिच तरावें तुका ह्मणे ॥ ४ ॥

१२० ब्रह्मज्ञान दारीं येतें काकुळती । अव्हेरिलें संतीं विष्णुदासीं ॥ १ ॥ रिघों पाहे माजीं बळें त्याचें घर । दवडिती दूर ह्मणोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें न चले सायास । पडिलें उदास त्याच्या गळां ॥ ३ ॥

१२१ भक्त ऐसे जाणा जे देहीं उदास । गेले आशापाश निवारूनि ॥ १ ॥ विषय तो त्यांचा जाला नारायण । नावडे धन जन माता पिता ॥ २ ॥ निर्वाणीं गोविंद असे मागें पुढें । कांहींच सांकडें पडों नेदी ॥ ३ ॥ तुका ह्मणे सत्य कर्मा व्हावें साह्य । घातलिया भयें नरका जाणें ॥ ४ ॥

१२२ भक्तांचा महिमा भक्तचि जाणती । दुर्लभ या गति आणिकांसी ॥ १ ॥ जाणोनि नेणते जाले तेणें सुखें । न बोलोनि मुखें बोलताती ॥ २ ॥ अभेदूनि भेद राखियेला अंगीं । वाढावया जगीं प्रेमसुख ॥ ३ ॥ टाळघोष कथा प्रेमाचा सुकाळ । मूढ लोकपाळ तरावया ॥ ४ ॥ तुका ह्मणे हें तों आहे तयां ठावें । जिहीं एक्या भावें जाणीतलें ॥ ५ ॥

१२३ भक्तां समागमें सर्वभावें हरि। सर्व काम करी न सांगतां ॥ १ ॥ सांठवला राहे हृदयसंपुष्टीं। बाहेर धाकुटी मूर्ति उभा ॥२॥ मागण्याची वास पाहे मुखाकडे। चिंतिल्या रोकडे मनोरथ ॥ ३ ॥ तुका ह्मणे जीव भाव देवापायीं। ठेवूनि ते कांहीं न मागती ॥ ४ ॥

१२४ भक्तांचीं सांकडीं स्वयें सोशी देव। त्यांपाशीं केशव सर्वकाळ ॥ १ ॥ जये ठायीं कीर्तन वैष्णव करिती। तेथें हा श्रीपति उभा असे ॥ २ ॥ तुका ह्मणे देव सर्वांठायीं जाला। भरुनी उरला पांडुरंग ॥ ३ ॥

१२५ भक्तांहूनि देवा आवडतें काइ। त्रिभुवनीं नाहीं आन दुजें ॥ १ ॥ नावडे वैकुंठ क्षीराचा सागर। धरोनि अंतर राहे दासा ॥ ॥ २ ॥ सर्वभावें त्याचें सर्वस्वेंही गोड। तुळसीदळ कोड करुनी घ्यावें ॥ ३ ॥ सर्वस्वें त्याचा ह्मणवी विकिला। चित्त घावें बोला सांगितल्या ॥ ४ ॥ तुका ह्मणे भक्तिसुखाचा बांधिला। आणीक विठ्ठला धर्म नाहीं ॥ ५ ॥

